# सिंह सेनापति



राहुल सांकृत्यायन

लोक-साहित्य
८७ शिवाजी पार्क, मुंबई २८

१९४५ कीमत सव्वातीन रुपये

# सिंह सेनापति



राहुल सांकृत्यायन

लोक-साहित्य

८७ शिवाजी पार्क, मुंबई २८

१९४५

# दोन शब्द

'जीनेके लिये' ('जगायसाठीं') या कादंबरीनंतरची ही माझी दुसरी कादंबरी. ती विसाव्या शतकांतली आहे, आणि ही इसवी सनापूर्वीं ५०० या काळांतली. मानवसमाजाच्या उष:कालापासून आजतागायतपर्यंतचा विकास वीस गोष्टींच्या रूपानें ('वोल्गा से गंगा' या ग्रंथांत) लिहिण्याचा मी संकल्प केलेला होता. या गोष्टींपैकीं एक गोष्ट या बुद्ध काळांतलीहि होती. ती लिहिण्याचा प्रसंग आला तेव्हां माझ्या लक्षांत आलें कीं सगळे तपशील एका गोष्टींत मांडतां येण्याजोगे नाहींत. म्हणून हा '**सिंह सेनापति**' कादंबरीच्या स्वरूपांत आपणासमोर हजर होत आहे.

'सिंह सेनापति'च्या समकालीन समाजाचें चित्रण करतांना मी ऐतिहासिक कर्तव्य व औचित्य पालन करण्याची पूर्ण खबरदारी घेतलेली आहे. त्या काळांतील गणांची (प्रजातंत्राची) माहिती देणारीं साधनें पाली व संस्कृत वाङ्मयांत, जास्त प्रमाणांत तिबेटी वाङ्मयांत आणि कांहीं प्रमाणांत जैन साहित्यांतहि उपलब्ध आहेत. मी त्यांचा उपयोग करण्याचा प्रयत्न केला आहे. खाणें-पिणें, हास-विलास इत्यादि बाबतींत या कादंबरींतील कित्येक प्रसंग आजच्या काळाशीं तुलना करतां निराळे आढळतील, पण हा वेगळेपणा प्राचीन साहित्यांत लिखित स्वरूपांत प्रत्यक्षच उपलब्ध आहे.

सेंट्रल जेल, हजारीबाग,
२७–५–४२.

राहुल सांकृत्यायन.

# अनुक्रमणिका

# विषय-प्रवेश

वैशालीच्या प्रजातंत्राविषयीं माहिती देणारीं अशीं फारच थोडी लिखित साधनें उपलब्ध आहेत. ती वाचतांना मला सारखें वाटे की या बाबतींत आणखी माहिती मिळाली असती तर बरे झालें असतें. मृतांचा आत्मा शरीरापासून अलग होऊन प्रेत-लोकांत आमचे भोंवती घिरट्या घालतो असे मानणारे माझ्याच मित्रांत काहीजण आहेत; आणि त्याच्याशी बोलणारे महापुरुषहि हजर आहेत. माझा आत्म्यावरच विश्वास नाहीं, तर प्रेतात्मा व प्रेतलोक याचे मला काय होय ? तरीहि हरसुराम ब्रह्म * यांना पूज्य मानणारे बाबू रामदास गौड याच्या परीक्षेची ही चागली संधी आहे असे पाहून मी वैशाली गणातील ( प्रजातंत्रातील ) काही व्यक्तीची नावें दाखवून म्हटले—"यापैकी एखाद्याला बोलावून तुम्ही वैशाली गणाच्या इतिहासासंबंधी काहीं माहिती मिळवलीत तर आपल्या प्रेत-विद्या प्रचाराचे कार्य सर्वांत जास्त माझीच लेखणी करील. मात्र लक्षात ठेवा, प्रेतात्मा जर काही खोटेनाटे सांगेल तर माझ्याजवळ पुरावे आहेत." त्यावर गौडजींनी इकडच्या तिकडच्या गप्पा सुरू केल्या. त्यांचा साराश इतकाच की भूत-प्रेत विद्येवर अंध विश्वास ठेवणारे कित्येक मोठमोठेहि लोक आहेत. जाऊं द्या, ही एक गंमत केली म्हणा, किंवा असेहि म्हणा की गौडजीची भूत-प्रेतविद्या म्हणजे काय चीज आहे हे मित्राना दाखवले.'

गौडजीची जीवनयात्रा संपल्यानंतर पुष्कळ वर्षांनी एकाएकीं एक आश्चर्यकारक घटना झाली. माझे आई बाप गरीब शेतकरी होते. बाळपणापासूनच मला मारून मुटकून नाजूक बनवण्याचा प्रयत्न केला होता. माता-पित्याची इच्छा नसूनहि मी शारीरिक कष्टाना नालायक ठरलों. ही दुर्बलता माझ्या सोन्यासारख्या शरीराला मातीमोल करीत आहे, ही जाणीव मला तरी त्यावेळी कुठे होती ? आणि जाणीव झाली तेव्हा बैल गेला नि झोंपा केला अशी स्थिती झाली. तरीहि या प्रौढ वयात पायांवर पाय ठेवून बसणे मला आवडत नाही. इतर कामाशिवाय रोज मी जमीन खणण्याचें काम करतों. हाच व्यायाम मला जास्त आवडतो. कारण यात व्यायाम होऊन शिवाय भूमातेची सेवाहि होते.

---

* उत्तरेकडील एक प्रसिद्ध ज्योतिषी.

त्यावेळीं छपरा जिल्ह्यांत एका मित्राकडे मी उतरलों होतों. सकाळच्या प्रहरीं मी त्याच्याकडून एक कुदळ घेऊन त्याच्या शेताजवळच्या पडीक जमिनींत खणूं लागलों. जमीन कठीण व मुरमाड होती. त्यामुळें व्यायाम तर चांगलाच होणार होता. कुदळीचा घाव टणकपणामुळें उशी घेऊन वर येई. सुक्या बाभळीवर कुऱ्हाड मारली म्हणजे ती जशी नुसती सालच काढते तसें त्या जमिनींत कुदळीनें वरवर नुसतें टोकरल्यागत होत होतें. माझ्या मित्रानेंहि जरा हात चालवून देखल्या देवा दंडवत केले. व तें निष्फळ ठरल्यावर तो काही तरी बहाणा करून मला त्या कामापासून परावृत्त करूं लागला पण मला माझा नेम पुरा करायचा होता. आणि माझे हातहि आता इतके टणक झाले आहेत की त्यांच्यावर फोड येऊंच शकत नाहींत. शेवटी निरुपाय होऊन त्याने बाजूला बैठक मारली. आणि त्याचवेळीं मध्येंच जमीन मऊ लागल्यामुळे माझा घाव खोल गेला आणखी दोन घाव घातल्यावर माझी कुदळ पृष्ठभागापासून दीड हात खोल गेली. जमिनीच्या पृष्ठभागावर मानवी वस्तीचे काहीच चिन्ह नव्हते. पण तेथें मात्र खापराच्या भाड्याचे कांहीं तुकडे आढळले. मला पुराणवस्तु संशोधनाची आवड—थोडासा नादच—आहे. तीन फूट खोलीवरील ही वस्तु ६०० वर्षांपूर्वीची नसली तरी ४०० वर्षांपूर्वीची नक्कीच आहे असे मला वाटले. यावरून मैळभर लांबी-रुंदीच्या पडीक जमिनीवर मानवी वस्तीचें चिन्ह आज नसलें तरी तेथें पूर्वीं केव्हा तरी मानवी वस्ती होती असेंहि वाटले. माझें कुतूहल वाढले. मी पुढच्या अंगाला कुदळ चालवण्या ऐवजी तिथल्या तिथेच खोल उकरूं लागलो. दोन फूट आणखी खालीं गेल्यावर वस्तीच्या खुणा बेपत्ता झाल्या. या पांच फुटाच्या थरामध्यें हजार नाही तरी आठशें वर्षांपूर्वींच्या—म्हणजे मुसलमानांची स्वारी आली त्या काळांत वस्ती असलेल्या पण दरम्यान जन-शून्य झालेल्या—भूमीला माझे पाय लागले. पुराने वाहून आलेला कोऱ्या मातीचा थर पाहून माझी जिज्ञासा कमी न होता उलट वाढली मात्र. त्या दिवशीं मी तेवढ्यावरच काम बंद केलें पण जातांना "उद्यां मला इथेंच व्यायामाला यायचं आहे," असें मित्राला सांगून ठेवले.

रात्री विचार करूं लागलों - पूर्वीची मही किंवा आजची गंडकी आतां जरी पात्र बदलून कित्येक कोस उत्तरेकडे हटून वहात आहे, तरी ही सर्व जमीन एका काळची तिचीच पायधूळ आहे. महीचा प्रवाह एके काळी आणखी दक्षिणेकडून वहात असला पाहिजे. अन् म्हणून ही जमीन पूर्वी दुसऱ्याच कारणानें प्रसिद्धहि असेल. असो! आणखी कांहीं फूट खालीं खणलें पाहिजे. म्हणजे कदाचित पुरानें वाहून आलेल्या मातीच्या थराखालीं पुन्हां वस्तीच्या खाणाखुणा सांपडतीलहि. कुणी सांगावें?

दुसऱ्या दिवशीं मी आपलें खोदणें सहा फूट व्यासाच्या विहिरीसारख्या आकारांत पूर्ण केलें. खालच्या अंगाला जमीन नरम होती. खड्ड्यांत एका जागीं आणखी दीड फूट खोल खणून पाहिले. तर काय! पुन्हां भांडी, विटा, खापराचे तुकडे! या शिवाय दोन सुंदर मातीची खेळणी व काचेच्या पेल्याचे तुकडेही सांपडले. प्रथमपासूनच दोन फुटांखालीं वस्तीची ओळख देणाऱ्या ज्या ज्या महत्वाच्या वस्तु मिळत गेल्या, त्यांचे मी दर सहा इंचाचे हिशोबानें वेगवेगळे गट करून फक्त त्या त्या थराची यादी करीत गेलो. खालच्या अंगाला आठ फुटांवर गुप्तकालीन (इसवी सनाच्या चवथ्या शतकातील) थर सांपडला. त्यातील वस्तु तर मला आणखीच आकर्षक वाटल्या. त्यामुळे नुसत्या व्यायामासाठी नव्हे तर पुरातत्त्वाच्या जिज्ञासेने माझा त्या जमिनीशी दृढ संबंध जडला. परंतु इतके खोल खणणे व तिथली माती काढून बाहेर फेकून देणे ही दोन्ही कामें माझ्या एकट्याच्याने होणारी नव्हती. ही माझी अडचण माझ्या मित्राच्या लक्षात आली. कारण माझ्या गप्पा व माझे लेख ह्याच्या योगानें त्यालाहि पुरातत्त्वाबद्दल थोडी थोडी आपुलकी वाटूं लागली होती. आणि मी बोलण्याचें अगोदर तोच म्हणाला—"आणखी खोल खणायचं म्हणजे माणसांची मदत पाहिजे. कारण आणखी थोडं खाली गेलं की इथं पाणी लागेल. माणसाना तर इथं तोटा नाहीच, अन् मजुरीच्या बाबतीत तूं संकोच करूं नको. किती माणसं हवीत तेवढं साग म्हणजे झालं."

मी म्हटलें—"सध्या फक्त पाच मजबूत व जरा समजूतदार अशी माणसं सहा आणे रोजावर मिळतील, नाही? पण अट ही की मजुरी मी देईन."

माझ्या मित्राला माझ्या शक्तीची व अडचणीची पूर्ण कल्पना होती. म्हणून त्यानें माझी अट साफ नामंजूर केली. दुसरे दिवशी मी एकटाच तिथे गेलो तो पाच मजबूत इसम कुदळी-टोपल्या घेऊन तेथे हजर. पण मी माझी अट सोडण्यास तयार नव्हतो. पण तो म्हणाला—"अरे अट कसली धरून बसतोस? चल, ही बघ मी टेप सुद्धां घेतली. दर सहा इंचाच्या थरातील वस्तूंचा ढीग करून नंबर लावून तो अलग ठेवायला लावतों आणि वस्तीच्या खाणाखुणा सापडेपर्यंत खणण्याचं काम चालूं ठेवूं या. अन् त्यातूनहि काही चूक झाली तर तुझ्यावर जबाबदारी. सगळ्या पाप-पुण्याचा तूंच धनी."

आता थोडा देखील अनमान करणें म्हणजे निव्वळ मूर्खपणा ठरला असता. मी भिंतीजवळ दोन्ही टोकाला सहा इंच खोलीचे दोन समतल खड्डे खणले. प्रथम त्या खड्ड्यातील तळापासूनची सारी माती काढून तळ साफ करून माती वर फेंकून द्यायची. अन् अशा प्रमाणेच सहा सात इंच खालीं खोल खणीत जायचे, हें मी मजुरांना समजावून सांगितलें.

सहा सहा इंच खालीं खोल जाणें म्हणजेच शंभर शंभर वर्षांपूर्वीच्या इतिहासाकडे क्रमाक्रमानें मागें जाणें, असा यांतला मतलब होता. व गंगा-गंडकीच्या खोऱ्यांतील जमीन इतकी टणक-जाड असण्याचें कारण तरी हेंच. जणुं काय आम्हीं चवथ्या शतकांतून तिसऱ्यांत, मग दुसऱ्यांत ... ... ... असे मागें मागें चाललों होतों.

आतां मला खणण्याचा व्यायाम करतां येईना. कारण जमिनीतून वर येणाऱ्या प्रत्येक टोपलीवर मला लक्ष ठेवावें लागे. मानवनिर्मित वस्तु एकत्र करणें, मातीची पारख करणें, व सर्वांची संगतवार नोंद ठेवणें, शिवाय मजुरांना संभाळून कुदळ चालविण्याची सूचनाहि देणें–ही सगळीं कामें करावी लागलीं. वस्तु पुष्कळ व त्यांतल्या बऱ्याचशा महत्त्वाच्या अशा हातीं लागल्या. त्यांतल्या त्यांत इसवी सनापूर्वीच्या पहिल्या शतकांतल्या थरांतील विशेष होत्या. इकडे गावांत अशी कंडी उठली कीं "इथें कुणा प्राचीन राजाचा खजिना पुरलेला आहे, आणि त्याचे 'बीजक' * पंडितजींचे जवळ आहेत व त्यावरूनच म्हणे ते ही उकराउकरी करवीत आहेत." या अफवेला आमच्या मजुरांचाहि हातभार विशेषेंकरून होता. या अफवेनें मला फारच घाबरवून सोडलें. कारण रात्रीं जर कुणाला इकडे यायची लहर लागली आणि कुदळ चालवायसाठीं सर्वांनीच जर भाऊगर्दी केली, व वाटेल तशी माती उकरून तिची फेंकाफेंक केली, तर होईल काय? कंपोज केलेल्या पुस्तकाच्या टाईपाची विस्कटाविस्कट होऊन त्याची जशी पै होते तसा प्रकार होऊन माझ्या झालेल्या कामावर सपशेल पाणी फिरेल. हें माझ्यावरचें मोठें संकट मित्राच्याहि लक्षात आलें. त्यानें त्याच दिवशीं एक तंबू ठोकून तेथे वस्ती करायची ठरवली. मला तरी याहून ज्यास्त काय हवें होतें? आंधळा मागतो एक डोळा, आणि देवानें दिले दोन.

आता ती व्यायामाकरता खणली जात असलेली पडीक जमीन पुराणवस्तुसंशोधनाचें उत्खननक्षेत्र बनली. तासभर रात्र असतांना व्यायामाकरता मी त्याच पड जमिनीच्या दुसऱ्या टोकाला खणत असें; रात्रीं कंदिलापुढें बसून दिवसभरांत निवडून काढलेल्या वस्तूंची यादी करीत असें. आणि त्या संगतवार लावून, त्यांवर खुणेचीं अक्षरें व आंकडे घालून पेटींत क्रमवार ठेवण्याचें काम माझा मित्र करीत असे. हें काम संपल्यावर एखाद दुसऱ्या विशिष्ट वस्तूबद्दल मी त्याला माहिती देई. "सहा इंच खोल गेलें कीं एक शतक मागे जायला मिळते," या विधानावर त्याचा विश्वास नसे. परंतु आतां कित्येक थरांमधून माती काच व दोन दगडांचे तुकडे यांवर अक्षरेंहि सांपडलीं. मी ओझाजींचा 'पुरालिपि' हा ग्रंथ मागवलेला होता.

* 'बीजक' म्हणजे धान्यागार, रत्नभांडार, यांची तपशीलवार माहिती असलेले कागदपत्र.

तो आल्यावर त्यांतून कांहीं अक्षरांचें साद्दश्य जेव्हां मी त्याला दाखवलें, तेव्हां त्याची खात्री झाली. इतकेंच नव्हे तर खोदाई बद्दलची त्याची उत्सुकता माझ्याहूनहि जास्त वाढली.

आणखी मागच्या काळांतील शतकांमध्यें घुसल्यावर आम्हांला आणखीहि पुष्कळ महत्वाच्या वस्तू मिळाल्या. परंतु त्या स्वतंत्र ग्रंथाचा विषय आहेत. ती सामुग्री पाहिल्यावर बालसूर्यापुढें चांदण्या जशा निष्प्रभ ठरतात तशी स्थिति होते. शिवाय असें कीं माझ्या चालू कामाच्या दृष्टीनें त्या वस्तू अप्रासंगिकहि आहेत.

पंधरा फूट खालीं गेल्यावर माती जास्तच ओलसर लागूं लागली. तेवढ्या खोलांत मिळालेल्या महत्वाच्या वस्तूंमध्यें सागाच्या लांकडावर कोरलेले कोरीव काम सांपडलें. पाणी वर येण्याची भीति वाटूं लागली. मी स्वतः खालीं उतरून पुढच्या सहा इंची थराच्या निरीक्षणाकरतां कुदळ चालवूं लागलों. कांही तरी कठीण वस्तूवर कुदळीचा आवाज झाला. म्हणून मी त्याच कुदळीनें हळूं हळूं जमीन कोरूं लागलों. तेथे विटांची फरशी केल्यासारखी जमीन दिसली. मी त्या विहिरीच्या दुसऱ्या टोंकाला जाऊन पाहिलें. तों तेथेहि तशाच विटा बसवलेल्या दिसल्या. मी त्यांतील एक वीट उचलण्याचा प्रयत्न केला. पण ती कट्कन् तुटली. ती जोडून पाहिली, तों ती दीड फूट लांबरुंद व एक इंच जाड अशा टाईलप्रमाणें झाली. मला वाटत होतें कीं मौर्यकालीन ख्रिस्तपूर्व तिसऱ्या अगर चौथ्या शतकांतील थराच्याहि खालच्या या विटा आहेत. पण त्या काळच्या आतांपर्यंत सांपडलेल्या विटांपेक्षां या वेगळ्या आहेत.

त्या दिवशीं मी तेवढ्यावरच काम बंद केले. व विटेचे तुकडे वर आणून न्याहाळूं लागलों. त्यांवर अस्पष्ट अशीं कांही अक्षरे खोदलेली दिसलीं. मी स्वतःवरच चिडलो. आत्मप्रौढीची मला चीड आहे. मला असें वाटूं लागले कीं ही अक्षरें खरोखरी या विटांवर खोदलेलीं नसावींत. पण माझ्या मनानेंच जणूं अशी समजूत करून घेतली कीं तीं त्यांवर उमटलेलीं असावींतच. कारण पुन्हां पाहिलें तर अक्षरें दिसत नव्हतीं.

सकाळीं ते विटांचे तुकडे थोडे कठीण झाले होते. या विटा खूपच काळजीपूर्वक काढल्या पाहिजेत असें मी ठरवलें. त्याकरतां मी लांकडाचे समतल तक्ते दोरीनें बांधून तराजूच्या पारड्यांप्रमाणें तयार केले. मी माझ्या मित्राला म्हटलें– " आज आपण दोघेच हें काम करूं या. आणि मजुरांना विहिरीजवळची माती लांब नेऊन टाकण्याचं काम देऊं. " हा नवा हुकूम ऐकतांच, या विटा त्याच पुरलेल्या संपत्तीच्या तळघराच्या असाव्यात आणि म्हणून आपल्याला तेथून दूर घालवण्याकरतां हा नुसता बहाणा आहे, अशी मजुरांची आणखीनच खात्री झाली.

मी पहिल्या थराच्या विटा तक्त्यावर ठेवून हळूं हळूं वर पाठवण्यास सुरवात केली. दोन तीन खेपा झाल्यावर माझा मित्र वरून एकदम ओरडला–" या विटांवर अक्षरं खोदलेलीं आहेत. " खालीं उजेड थोडा होता म्हणून वर आलों. पाहिलें तों खरोखरीच ब्राम्ही अक्षरे आहेत. अन् तींहि सगळ्याच विटांवर. आतां मात्र खात्री झाली कीं या विटा नसून कोणत्या तरी पोथीचीं पानें आहेत. मी दुसऱ्या थराच्या विटा काढून पाहिल्या तर त्यांवरचीं अक्षरें पुष्कळच स्पष्ट कोरलेलीं होतीं व त्या मजबूतहि होत्या. त्या जरा संभाळूनच मी आणल्या.

तुम्ही हे छापलेलें पुस्तक जितकें सहज वाचूं शकतां तितक्याच सहजपणानें मी अशोकाचे ब्राम्ही शिला-लेख वाचूं शकतों. म्हणून मीं प्रथम एका विटेवरील दोन्हीं बाजूंना खोदलेल्या ओळींचे नागरी लिपींत रूपांतर केलें. जरी कांहीं अक्षरें अशोककालीन अक्षरांपेक्षां वेगळीं असून वाचण्यास कठीण वाटली, तरी सर्व विटा-वरचीं अक्षरें स्पष्ट होतीं. भाषाहि अशोकाच्या शिला-लेखांपेक्षां थोडी भिन्न होती. परंतु त्याच्या अगोदरच्याहि कित्येक पिढ्यांतील भाषांशीं माझा परिचय होता. आणि ती अशोककालापेक्षा थोडीशीच मागची असल्यानें मला फारशी कठीण वाटली नाहीं. म्हणून थोड्याशा प्रयत्नानें ती मला आत्मसात् करतां आली. अशा प्रकारें भाषेच्या शंका लिपीच्या सहाय्यानें व लिपीच्या अडचणी भाषेच्या मदतीनें नाहीशा करीत करीत मी सर्व विटांवरचा मजकूर लिहून काढला. विटेच्या एकेका बाजूवर सोळा सोळा ओळी होत्या व प्रत्येक ओळींत सव्वीस--सत्तावीस अक्षरें होतीं. अर्थात एका विटेवर सुमारे एक हजार अक्षरें ( किंवा पंधरा श्लोक ) होती.

त्यावेळी माझ्या मनाची जी काय अवस्था झाली ती विचारूंच नका –आनंद माझ्या हृदयांत मावतां मावेना. आनंदाची परिसीमा म्हणजे काय याचा मला त्या वेळीं अनुभव आला. त्याच्या भरांत मी जे हावभाव केले त्यांवरून व मी लिहीत होतों तो मजकूर पाहून त्या विटांचें महत्व माझ्या मित्राच्या लक्षांत आलें. लिहिणें संपतांच मी त्या विटा उन्हांत तशाच राहूं देऊन तंबूंत गेलों, आणि मित्राची उत्सुकता पाहून म्हणालों–" या विटा नसून कोणत्यातरी पुस्तकाचीं ही पानं आहेत. लेखकानं कागद शाईच्या ऐवजीं ओल्या विटांवर लोह-लेखणीनं हें पुस्तक स्वतः लिहिलं वा लिहविलं. नंतर त्या वाळवून भाजून वाटोळ्या कड्याच्या आकारांत इथं गाडून टाकल्या. या कड्यांत किती विटा आहेत तें आपल्याला अजून पुढं समजायचं आहे. या पृष्ठावर जें लिहिलं आहे त्यावरून असा पत्ता लागतो कीं लेखकानं आपल्या भोंव-तींच्या सुंदर वस्तूंचं सुंदर पण अकृत्रिम भाषेत वर्णन केलं आहे. हं, इथं दोन नांवं आहेत, तीं माझ्या परिचयाचीं आहेत, एक ' इट्टका-घर ' आणि दुसरं ' शीह '. बुद्धाचे वेळीं ' इट्टका-घर ' हें वैशाली गणांतील ( वज्जी देशांतील ) एका चांगल्या

प्रमुख वसाहतीचं नांव होतं. याचा शब्दशः अर्थ 'विटांचं घर' असा आहे. इथंच 'शीह' (=सिंह) ची 'कम्मन्त' (=शेती) होती. वैशाली गणाच्या सेनापतीचं नांवहि सिंह असं आहे. पण हा सिंह म्हणजे तोच का दुसरा कोणी हें आतां सांगतां येणार नाहीं. तसंच या पुस्तकाचा लेखक सिंहच असेल का दुसरा कोणी, हेंहि सांगतां येणार नाहीं. कांहीं का असेना, या बत्तीस ओळींत जसं वर्णन आहे तशीच धर्ती जर सगळ्या ग्रंथाची असेल तर जगांतल्या मोठमोठ्या आविष्कारांमध्यें त्याची गणना होईल यांत शंका नाहीं."

वाचक हो! पुस्तकासंबंधीं जास्त माहिती करून घेण्याऐवजी खुद्द पुस्तकच वाचण्यासाठीं तुम्ही उतावीळ होऊन राहिले असाल. आणि या उतावळेपणाला खुद्द मीहि बळी पडलों आहे. म्हणूनच मूळ ग्रंथाचें प्रकाशन करायच्या किती तरी अगोदर हा अनुवादित 'सिंह सेनापति' आपल्यापुढें उपस्थित होऊन राहिला आहे, हेंहि आपल्या लक्षांत येईलच. पण थांबा हं, आणखी एक दोन गोष्टी ऐकण्यापुरता धीर धरा. सर्व पुस्तक लिहून त्याचा अनुवाद झाल्यावर ग्रंथकार हा दुसरा कोणी नसून वैशालीच्या प्रजातंत्राचा महान सेनापति स्वतः 'सिंह' हाच आहे याबद्दल संदेह राहिलेलाच नाही. त्याने हें आत्मचरित्र म्हणून लिहिलें असले तरी त्या वेळच्या जगाचें एक सजीव वर्णन या पुस्तकाच्या रूपाने आपल्या पुढें ठेवलें आहे. त्या बरोबरच त्याच्या जीवनासंबंधीहि कांही गोष्टी आल्या आहेतच. दुःखाची गोष्ट ही कीं 'सिंह'च्या चरित्रापैकीं कांहीं 'विटा' अक्षर-शून्य झाल्या आहेत. तथापि आपल्या पुढे जें आहे तें कांहीं कमी संतोषजनक नाहीं. पुस्तकाचे वरचे सबंध वर्तुळ तर वाचतां येण्याजोगे राहिलेलें नाहींच त्या बरोबरच मधल्या कांही कांही अर्धवट भाजलेल्या 'विटा' वाचतां येण्या जोग्या नाहींत. त्यामुळे आपणांस पुस्तकात ठिकठिकाणी रिकामी जागा दिसेल. विटांवर नंबरहि दिलेले आहेत असें पुढल्या विटा पाहिल्यावर कळून आलें. मात्र हे नंबर–ही अनुक्रमणिका–आंकड्यांत लिहिलेले नसून अक्षरी आहेत. आपल्यांतच नव्हे तर सर्व जगांत रूढ असलेल्या आजकालच्या आंकड्याचा आविष्कार फक्त तेरा चौदाशें वर्षांपूर्वी खुद्द भारतांतच पहिल्याने झाला. यामुळें त्यांचा या पुस्तकातला अभाव स्वाभाविकच आहे. शेवटीं सांगायचें म्हणजे हें कीं अडीच हजार वर्षांनंतर 'सिंह सेनापति' ला ( हें मी ठेवलेले नांव आहे. मूळ पुस्तकांत नांव कोठेंच आढळलें नाही; त्याचप्रमाणें प्रकरणाचे मथळे व आंकडेहि माझेच आहेत.) तत्कालीन वैशाली भाषेतून हिन्दींत फक्त अनुवाद करून आपल्यापुढे ठेवत आहें. मी स्वतःचे असें जें कांहीं जोडलें आहे तें चतुष्कोणी कंसांत घातले आहे. जेथल्या विटा लुप्त झाल्या आहेत तेथे ( ×××× ) असे चिन्ह आहे. जिथलीं अक्षरें वाचतां येत नाहीत तेथें (... ... ... ..) असें चिन्ह आहे. हं. पण प्राचीन भौगो-

लिक नांवांच्या ऐवजीं कुठें कुठें वाचकांच्या सोईकरतां आधुनिक नांवें दिलीं आहेत. मात्र ही मूळ नांवें मूळ पुस्तक प्रसिद्ध झाल्यावर वाचकांना कळतीलच. सिंहकालीन रीति-रिवाजांत आजच्या हिन्दुधर्माच्या अगदीं उलट गोष्टी या ग्रंथांत दिसून येतील. म्हणून माझी हिन्दु वाचकांना अशी प्रार्थना आहे कीं या करतां आपण मला खुशाल शिव्या द्या; पण एवढें लक्षांत ठेवा कीं आज-कालच्या कित्येक हिन्दु लेखकांप्रमाणें मी सत्याशीं दगलबाजी करण्यास तयार नाहीं. मी सिंह सेनापतीशी बेइमानी करूंच शकत नाहीं. आपल्याला माझ्या सत्यतेचा संदेह असेल तर आपण पाटण्याला जा आणि या सोळाशें विटा 'पटना म्युझियम' मध्ये पाहून या. आणखी थोडा धीर धराल तर या विटाचे फोटो व त्या अक्षरांचे नागरी लिपीतील परिवर्तनासह छापलेलें पुस्तक आपल्याकडे चालून येईल. सत्यापुढें मला आजकालच्या संकुचित हिन्दु मनोवृत्तीची पर्वा नाहीं. मला फक्त सत्याचीच पर्वा आहे—

"कालो ह्ययं निरवधिर्विपुला च पृथ्वी"

— संपादक

( १ )

# आचार्य बहुलाश्व

××× [ दुसऱ्या सोबत्यांचे ] मागून आचार्यांसमोर जाण्याची माझी पाळी आली. आचार्य बहुलाश्वांनीं विचारलें—" बाळ, तुझं नाव नि गोत्र काय बरं ? "

" गोत्र काश्यप, आणि नांव सिंह. " असें सांगतानाच मी गेंड्याच्या कातड्याची ढाल आचार्यांपुढें ठेवली.

ठिकठिकाणीं लोखंडाचे खिळे बसवलेली ती ढाल हातांत घेऊन आचार्यांनीं सांगितलें— " फारच सुंदर आहे ही ढाल, अन् त्याचबरोबर चांगली मजबूतहि आहे. "

" माझ्या वडिलांनीं स्वतः गेंड्याची शिकार केली होती. त्याच्याच केलेल्या ढालींपैकीं ही एक आहे. "

" बाळ सिंह, तर मग तुझ्या पित्याला तक्षशिलावासींची आवड ठाऊक आहे तर. अन् म्हणूनच ती एवढ्या तत्परतेनं संभाळून पाठवली त्यांनीं. होय ना ? "

" पण गुरुजी, माझे वडील तर तेरा वर्षांपूर्वींच वारले. मी त्यावेळीं सारा पांचच वर्षांचा होतों. "

" अरेरे ! पिताहीन पुत्राचे हाल नि दुःख मला चांगलंच ठाऊक आहे. माझे वडील गेले त्यावेळी मी आठच वर्षांचा होतों. पण मला तिघे वडील भाऊ व आई होती. तुझी पण आई आहे ना ? "

" हो तर, मला ती जीवाविशेष मानते. मी तिचा पहिलाच मुलगा. माझे वडील गेल्यावर तिनं दुसरं लग्न केलं. पण तिच्या नव्या यजमानांनीं मला पित्याची उणीव भासूं दिली नाहीं. त्यांच्याच आशीर्वादानं मी आतांपर्यंत थोडंफार शिकलों."

" तर मग मुला, मला वाटतं तुला फी देऊन शिकणं जड जाईल. हरकत नाहीं; तुझ्यासारख्या नादार शिष्यांकरतांच आचार्य बहुलाश्वाचं घर खुलं ठेवलेलं आहे. "

" आचार्यांच्या या असीम कृपेबद्दल मी कोणत्या शब्दांनीं कृतज्ञता व्यक्त करूं?"

" तशी कांहींच जरूरी नाहीं. माझ्या विद्येचं चांगलं चीज कर म्हणजे झालं."

" गुरुजी, त्याकरतां मी कसून प्रयत्न करीन. आणि वैशालींत आचार्य महालींचा योग्य शिष्य होण्यांत मीं जसं यश मिळवलं, तसंच इथंहि करीन. "

" म्हणजे तूं वैशाली गणाचा निवासी आहेस तर! पूर्वेकडल्या वज्जी देशाहून आलास? माझा मित्र व गुरुबन्धु आचार्य महाली लिच्छवी याचा तूं शिष्य आहेस? मग फारच छान झालं. बाळ सिंह, तूं तक्षशिलेला आपली वैशालीच समज बरं. पूर्वेकडे आम्हांला अभिमान वाटण्याजोगी एक वैशालीच आहे. बाकीचे तर सगळे रजुल्लेच आहेत. कुरु, पाचाल, वत्स, कोसल, मगध, हीं सारीं रजुल्लीं आहेत. तिथलं आर्यत्व नष्ट झालेलं आहे. तिथं खांद्यावर मस्तक सरळ ठेवून चालणारा पुरुष आहे कुठं? हे रजुल्ले स्वतःला देव म्हणवून घेतात अन् आर्यहि म्हणवून घेतात. आर्यांचं नातं बरोबरीच्या भाईभाईचं असूं शकेल; त्यांच्यात कुणीहि देव अगर रजुल्ला नाही होऊं शकत. सतलजच्या अलीकडे कुठं कुणी रजुल्ला दिसला तुला? "

" नाही आचार्य! "

" खरं आहे बाळ! आमच्या सप्तसिंधूंत पाहिजे तर मल्लमध्ये जा अगर मद्रमध्यें जा, किंवा या पूर्व गांधारमध्यें जा. सगळीकडे तुला गणशासनच दिसेल. इथं कुणीहि रजुल्ला नाहीं. कुणापुढं गोंडा घोळायची जरूर नाही. वैशालीप्रमाणंच तक्षशिला व सागल [ सियालकोट ] मध्यें गणाची-संघाची-हुकुमत आहे. पूर्वेकडे वैशाली हें रजुल्ल्याच्या समुद्रांत एक गण-द्वीप आहे. होय एकच.—शाक्य, कोलिय, मल्ल हे नांवापुरतेच गण आहेत. कोसलचा रजुल्ला, काय बरं त्याचं नाव? "

" गुरुजी, प्रसेनजित्! "

" बरोबर, प्रसेनजितच. तो इथं आमचे आचार्य भूरिश्रवा यांच्याजवळ शिकत होता. अगदींच मंदबुद्धीचा होता तो. पैसा होता ना त्याच्याजवळ. नाहीतर तो तक्षशिलेचा विद्यार्थी होऊंच शकला नसता. आणि खरंच, पूर्वेकडून आलेल्या विद्यार्थ्यांमध्यें बंधुल मल्ल व महाली यांच्याविषयीं आमच्या आचार्यांना फार अभिमान वाटे. आणि मलाहि आपले धाकटे गुरुबन्धु या नात्यानें त्यांच्याबद्दल तितकाच अभिमान वाटे. "

" बंधुल मल्ल आपले गुरुबंधु म्हणतां आचार्य! आजकाल तर कोसलचे सेनापति आहेत ते. "

" धिक्कार असो! रजुल्ल्यांची चाकरी करण्यापेक्षां उपाशी मरणं काय वाईट? विष खाणं काय वाईट? खरं कीं नाहीं बाळ सिंह? "

" होय गुरुजी, आम्हां गण-पुरुषांच्या बाबतींत कमीत कमी एवढी तरी अपेक्षा असायला हरकत नव्हती. "

" बाळ सिंह, आम्ही आमच्या पूर्वेकडील गणांतल्या बंधूंबरोबर लिहिणं वाचणं इत्यादि सर्वच बाबतींत विशेष संघट्टन ठेवतों, सर्वांशीं विशिष्ट वर्तनानं वागतों, ते कां म्हणून? आम्ही त्यांना पूर्वेकडील आमचेच ध्वजधारी समजतों म्हणूनच ना? आम्ही स्वतंत्र मानव आहोंत, आर्य आहोंत, आणि हरएक आर्यानं स्वतंत्र असावं अशी आमची इच्छा आहे, म्हणूनच ना? आमच्या पूर्वजापैकीं कांहीं भाऊबंद पूर्वेकडे गेले आणि त्यांनीं आर्यांची परंपरा सोडून कुरु पांचालांच्या गणांचे—जनांचे—जागीं रजुल्ल्यांना कायम केलं. त्या दिवसापासून आम्ही त्याना पतित मानूं लागलों. ते स्वतःला आर्य म्हणवून घेऊन खुशाल आपण डांगोरा पिटत राहोत; पण आम्ही त्यांना आर्य समजत नाहीं. आर्यांचा देश हाच आहे, आर्यांचा धर्म इथंच प्रचलित आहे. आर्यांचं खरं वर्ण-स्वरूप इथंच सांपडेल. काय बरं म्हणत होतों मी? हं, बरं का बाळ! पूर्वेकडील गणांतल्या लोकांकडे आम्ही प्रेमदृष्टीनं पाहतों, याचं कारण तरी हेंच. त्यांची वर्ण-रूपादि संपत्ति आमच्याप्रमाणंच आहे. महाली लिच्छवी आमच्यासारखाच होता. बंधुल मल्ल देखील असाच होता. प्रसेनजितचं तोंड बघायचा अवकाश की तो संकर वर्णाचा आहे हें समजून येत असे."

" होय गुरुजी! राजे कामुक असतात. आणि कामवश झाल्यामुळं आर्य, अर्ध-आर्य, अनार्य इत्यादि कसलेच भेदभाव ते राखत नाहीत. म्हणून त्याच्या रक्तांत अनार्य-धारा मिसळली आहे. ते वीर्याची प्रधानता मानतात."

" तोंड बघा या मानणाऱ्याचं. कुठून तरी एकदा बाध् फुटला म्हणजे पिढ्यान् पिढ्या सुरक्षित ठेवलेली वैशिष्ट्यं, वर्ण-संपत्ति धुळीला मिळते. ज्या बोटाला साप चावतो, तें बोट आपण कापून टाकतों, ज्या फांदीला कीड लागते ती आपण झाडावर राहूं देत नाही. इथले सर्व स्त्री-पुरुष गौरवर्ण आहेत. सर्वांचे केंस अग्निज्वालेप्रमाणं पिंगल अगर पांढुरके आहेत. सर्वांचे डोळे नीलवर्ण किंवा सुवर्णवर्ण आहेत. यांत भिन्नता नाहीं, याचं कारण तरी तेंच. आतां तूंच सांग, तुझ्या अगोदर पूर्वेकडचे ते तिघे तरुण माझ्यापुढं आले होते; त्यांच्यामध्यें ही वर्ण-संपत्ति तुला दिसली का?"

" पण गुरुजी! त्याला दुसरीहि कारणं आहेत. पूर्वेकडे अनार्य– वा अर्ध-आर्य– लोकांची संख्या पुष्कळ आहे. ते जरी आर्यांच्या आधीन असले तरी आर्य-रुधिर दूषित करण्यास एवढी बहुसंख्या पुरेशी आहे."

" मग तुझं रक्त कसं दूषित झालं नाही? बाळ, तुला माझ्या रोहिणी शेजारीं उभा केला तर तूं तिचा भाऊ नाहींस असं कोण म्हणेल? तिच्या सारखेच पिंगट केस, तसेच निळे घारे डोळे; महाली पण मला तसाच दिसला. बंधुल मल्लहि पण तसाच."

" पण त्याकरतां आम्हांला पूर्वेकडील गणवाल्यांशीं फार कडक प्रतिबंधानं वागावं लागतं. आम्ही आई अगर बाप या दोहोंपैकीं कोणत्याच बाजूनं बाहेरील संबंध येऊं देत नाहीं. आम्ही आपल्या किंवा आपल्यासारख्या गणाच्या बाहेर विवाहसंबंध ठेवत नाहीं. मात्र याचा अर्थ असा नव्हें कीं आमच्या इथं अर्ध-आर्य नाहींतच. अनार्य काळ्या दासी आमच्या घरोघरीं पुष्कळच दिसतात."

" ही मोठी धोक्याची गोष्ट आहे बरं बाळ ! भयंकर धोका आहे हा. आर्य-रक्त अनार्य क्षेत्रांत जाईल, आणि तिथूनच आर्यांची अवनति सुरू होईल. आमच्या इथं पहा, आमच्याकडे दास-प्रथा नाही. थोडेसे अनार्य कर्मकर – नोकर – आहेत. त्याना आमच्या गण-शासनांत काही अधिकार नाहीं. पण त्याच बरोबर आम्ही त्यांचं शरीर ही खरेदी-विक्रीची वस्तु नाही समजत. आणि असे अनार्य सतलजच्या अलीकडे तूं फारच थोडे पाहिले असशील. अच्छा, राहूं देत या गोष्टी. वैशाली गण तर ठीक आहे ? सौम्य महालींची प्रकृति चांगली आहे ना ?"

"होय गुरुजी, वैशालीची भूमी समृद्ध आहे. तिच्या खाचरांतून गंधशाली भात पिकतं. तिथल्या गाईचं दूध–तूप–मांस लिच्छवीची शरीरं धष्ट-पुष्ट बनवतं. मल्ल, शाक्य, कोलिय हे गण कोशल राजाचे चरणी लीन झालेले पाहून मगधराज बिंबिसार यानं वैशालीचीहि मान वांकवायचा विचार केला होता.दक्षिण आणि उत्तर– अंग ( अंगुत्तराय ) हे देश जिंकल्यानंतर त्यानं वैशालीच्या वैभवावर धाड घालायचा विचार केला होता. पण अजून लिच्छवींचीं खड्गं तीक्ष्ण आहेत. अजून त्यांचे भाते शर-शून्य झालेले नाहीत. अजून लिच्छवींचं रक्त गरमच आहे. लिच्छवींनीं आपल्या बाहुबलाच्या जोरावर मगधराजाचा असा जबरदस्त पराजय केला की आज तेरा वर्षं झालीं तरी वैशालीकडे मान वर करून पाहाण्याची देखील त्याला हिम्मत झालेली नाहीं. त्याच युद्धांत माझा पिता मारला गेला."

" तर मग मुला, तूं वीरपुत्र आहेस ! ठीक आहे. माझा गुरुबंधु महाली यानं तुला काय काय शिक्षण दिलं ?"

" गुरुजी ! मी मुष्टि-युद्ध शिकलों आहे. मल्ल-युद्ध व खड्ग-युद्ध जाणतों. तिरंदाजींतील शब्द-वेध व चल-वेध येतो मला. अश्व, रथ, गज, पदाति यांचं आक्रमण-प्रत्याक्रमण या संबंधांतील कौशल्य, त्याच बरोबर व्यूह रचना व दुर्ग-रचना या बाबतींतील माझं ज्ञान प्राथमिक स्वरूपाचं आहे."

" तर मग मुला, अठरा वर्षांच्या वयाला अनुरूप असं जितकं ज्ञान हवं त्या-पेक्षां तूं ज्यास्तच शिकलेला आहेस. परंतु वत्सा, विद्येला अन्त नाहीं; व तिचा अन्त कधीं होणारहि नाहीं. उलट ती दिवसानुदिवस वाढतच जायची. आमच्याकडे पूर्वे-कडचे विद्यार्थी येतात, इतकंच नव्हे तर पश्चिमेकडूनहि येतात. इथं पश्चिम गांधार,

कम्बोज, पर्शु [ पारस ], बबेरू [ बाबिलोनिया ] आणि यवन [ ग्रीस ] इतक्या दूरदूरचे विद्यार्थी आहेत. लांबून येणारे आमचे हे विद्यार्थी नुसते विद्यार्थीच नाहींत तर त्यांच्या जवळूनहि आम्ही बरंचसं नवीन युद्ध-कौशल्य शिकतों. आतां नुकतीच पार्शव राजावर यवनांनीं जी जोराची चढाई केली, तींत त्यांनीं एक अगदीं नवीन डाव-पेंच उपयोगांत आणला. परंतु हें समुद्रांतील युद्ध होतं म्हणून तुमच्या आमच्या गणाला त्याचं महत्व फक्त ज्ञानापुरतंच. पण वत्सा! यावरून हें सिद्ध होतं कीं युद्ध-विद्या दिवसेंदिवस वाढतच राहिलेली आहे. आम्हां तक्षशिलावासीयांना या वाढत असलेल्या अत्यल्प ज्ञानाचंहि फार महत्व आहे. जर आम्ही तेंच तेंच शिळं ज्ञान शिकवत राहिलों, तर तक्षशिलेला स्वतःचं स्थान किती दिवस टिकवतां येईल ? आणि ही सावधगिरी ठेवल्यामुळंच तक्षशिलेनं आपलं स्थान अढळ राखलं आहे. पूर्वेकडे जितक्या दूर वैशाली आहे, तितकीच पश्चिमेकडे पार्शवशहाची राजधानी–पर्शुपुरी–येईल. यवन यापेक्षा पुष्कळ लांब असले तरी ते आमचे मित्र आहेत—शत्रूचा शत्रू आपला मित्र असतो. यवनानीं शहाचा फारच मोठा पराजय केला ही बातमी ज्या दिवशीं आम्हांला कळली, त्या दिवशी आमच्या या पूर्व गंधारामध्ये सर्व ठिकाणीं मोठमोठे उत्सव झाले. आमचा पश्चिम गंधार—सिंधूच्या पलीकडचा प्रदेश—अजूनहि पार्शवांचे हातीं आहे याबद्दल आम्हाला फार वाईट वाटतं. त्यानीं जर यवनाकडून हार खाल्ली नसती तर ते आमच्या तक्षशिलेच्याच बाजूला सरकले असते."

"गुरुजी, जें भय तक्षशिलेला पश्चिमेकडून आहे, तेंच भय वैशालीला मगधाकडून आहे. तक्षशिलेला फक्त एकाच दिशेकडून–पश्चिमेकडून–भय आहे. पण वैशालीच्या पूर्वेकडे व पश्चिमेकडे अशा दोन्ही बाजूंना दुष्ट बिंबिसारचं राज्य आहे. बिंबिसार सध्या स्वस्थ आहे. पण तो पुन्हा एखादेवेळी चढाई करील हें आम्ही लिच्छवि-कुमार जाणून आहोत."

"परंतु मगध देशाचा रजुग्र पार्शव शहापुढं नांगी टाकणारच. इथून तीन चार दिवसाच्या रस्त्यावर सिंधु नदी आहे हें ठाऊक आहे ना तुला ? सिंधूपासून यवनांच्या देशापर्यंत यात्र दुष्टाचा अंमल आहे. आम्ही गंधार-पुत्र लढण्यांत किंवा युद्धविद्येत मुळींच कमी नाहीं. परंतु पार्शवांनीं आमचे निम्मे लोक जिंकून आपल्या अमलाखालीं ठेवले आहेत. हीच आमची सर्वांत मोठी अडचण आहे. आणि हिच्यावर उपायहि सुचत नाहीं. जर सप्तसिंधूंतील सर्व गण एक होतील, तरच कदाचित युद्ध करतां येईल. पण अशी एकी करणं म्हणजे गण-परंपरेला सोडून देणं होय! गणधर्माला तिलांजली देणं होय."

"हीच अडचण आमच्यापुढं देखील आली होती. गुरुजी! शाक्य, कोलिय, मल्ल, हे गण याच कारणामुळं कोसलांचे चरणीं लीन झाले. आपल्या परंपरेविरुद्ध

ते एकी करूं शकले नाहींत. आणि अलग अलग राहून कोसल राजसेनेशीं सामना देणं त्यांच्या आवांक्या बाहेरचं होतं. ”

“ ..........आणि त्याच कोसलाचा सेनापति झाला आहे बंधुल मल्ल ! धिक्कार असो ! ! ”

“ गुरुजी, त्याचा सर्वच धिक्कार करतात ! आतां तो नांवाचा मल्ल राहिला आहे. कोणीहि मल्ल त्याला आपला समजत नाहींत. ”

“ पण बाळ, बंधुल आपला देह विकण्यास कां तयार झाला याचं कांहीं कारण कळलं का ? ”

“ असं म्हणतात कीं, मल्लांनीं तक्षशिलेच्या विद्येची परीक्षा पाहाण्याकरतां एकाच घावांत कापण्यासाठीं सात खुंट पुरले. ”

“ आणि मग ? ”

“ बंधुल मल्लानं ते कापले तर खरे, पण कापतांना त्यांतून ‘ झन्न ” असा आवाज झाला. आणि पाहिलं, तों प्रत्येक खुंटयांत मधोमध लोखंडाचे खिळे बसवलेले होते. ”

“ मल्लांचं हें कृत्य वीरोचित–आर्योचित नव्हतं. ”

“ बंधुल मल्लाला फार राग आला. त्यानं सांगितलं—‘ कुसीनारामध्यें माझं कोणी नाहीं, कुसिनाराशीं मला कांहीं एक कर्तव्य नाही. ’ आणि त्या रागाच्या भरांत त्यानं तक्षशिलेंतील आपला सहपाठी कोसलराज प्रसेनजित् याला स्वतःला विकून घेतलं. नीच पामर बंधुल ! ”

“ आणि तें देखील केव्हां ? तर ज्यावेळीं मल्ल-भूमीला आपलं स्वातंत्र्य परत मिळवण्याकरतां त्याच्या सेवेची जरूर होती त्या वेळीं. ”

“ बाळ, माझी कल्पना नव्हती बंधुल असं कांहीं करील म्हणून. समज तक्ष-शिलेनं माझा अपमान केला, माझं नुकसान केलं; तरीहि तक्षशिलेच्या शत्रूंशीं संगन-मत करणं हें कधीं तरी क्षम्य ठरेल काय ? बा बंधुला ! तूं हें चांगलं केलं नाहींस. तूं आचार्य भूरिश्रवा याच्या नांवाला काळिमा फासलास. बरं, तें जाऊं दे. तुझ्या संबंधीं आणखी कांहीं माहितीची जरूर नाहीं. आज पासून तूं माझ्या शिष्यमालेत आलास. ”

एवढें बोलून नंतर आचार्यांनीं आपल्या मुलीला सांगितलें— “ रोहिणी ! सिंहाला घेऊन जा. त्याला आपला भाऊ मान. याच्या खाण्यापिण्याची व राहण्याची व्यवस्था कर. बाकी सर्व आपल्या आईला विचारून घे. ”

आम्ही बोलत होतों त्यावेळीं रोहिणी आचार्यांच्या जवळ बसली होती. ज्या-वेळीं गुरूजींनीं माझ्या वर्ण-रूपाची तिच्याशीं बहीण-भावाच्या नात्यानें तुलना केली, त्यावेळीं माझी दृष्टी रोहिणीच्या चेहऱ्यावर खिळून राहिली. आणि त्याचवेळीं मला

माझी बहिण सोमा हिची आठवण झाली. सोमा सुद्धां दहाच वर्षांची आहे. तीहि पण हिच्या सारखीच सुवर्णकेशी आहे. तिचें नाकहि असेंच सरळ, कपाळ असेंच मोठें, वर्ण असाच उजळ, डोळे असेच विशाल. हं, पण सोमापेक्षां ही थोडीशी मोठी आहे. सार्था बरोबर ( कारवाना बरोबर ) पायीं चालत मी आठ महिन्यांनीं तक्षशिलेला आलों होतों. मधल्या या काळांत सोमाची गोड आठवण जरा कमी होऊं लागली होती. परंतु रोहिणीला पहातांच ती एकदम हजारपटीनें जागृत झाली. माझ्या समोर रोहिणी बसली होती, परंतु मी तिच्या जागीं सोमालाच मनोमन पहात होतों. गुरुजी व दुसरे कोणीहि जर हें पाहतील तर काय म्हणतील असें वाटून मी स्वतःला सांवरण्याचा प्रयत्न करूं लागलो. गुरूजीच्या मनोरंजक व उपदेशपर गोष्टींनीं जर मला मदत केली नसती तर मला आपले अश्रू आंवरतां आले असते कीं नाहीं शंकाच आहे. मधून मधून रोहिणीकडे जेव्हा माझी दृष्टि जाई त्या त्या वेळीं माझें मन व्याकूळ होई. हा थंडीचा मध्य होता. आणि तक्षशिलेच्या आसपास पहाडांवर बर्फाची शुभ्र चादर पसरली होती.

आचार्यांच्या आज्ञेप्रमाणे रोहिणी माझ्याजवळ येऊन उभी राहिली. तिच्या बरोबर मी मुकाट्यानें निघालों. आचार्य बहुलाश्व हे तक्षशिला गणतंत्रातील एक समृद्ध व संभावित व्यक्ति आहेत. ते गणाचे प्रमुख सेनापति झालेले आहेत. गणसंस्थेंत ( प्रजातंत्र सभेंत ) त्याना मोठा मान आहे. त्यांचा वाडा सात चौकी आहे. पहिल्या चौकांत घोड्यांच्या पागा आहेत. सैंधव ( सिंधूकांठच्या ) घोड्याची इतकी वाखाणणी का केली जाते याचे कारण येथील घोडे पाहून माझ्या पूर्ण लक्षात आलें. आचार्यांना घोडे बाळगण्याचाच नव्हे तर अवलाद उत्तम करण्याचाहि खूप षोक आहे. तक्षशिलेच्या इतर नागरिकांप्रमाणे आचार्य बहुलाश्व यांच्या कित्येक जमिनी गांवाबाहेर खूप लांबपर्यंत पसरलेल्या आहेत. त्यापैकीं एक कर्मान्त ( जमीन ) घोड्यांच्या चंदीसाठी राखून ठेवलेली आहे. आचार्यांना घोड्यावरून रपेट करण्याची फार हौस आहे. साठ वर्षांच्या वयांतहि ते नियमाने सकाळीं एक तास घोड्यावरून फेरी मारतात. त्या कामाकरतां प्रत्येक वेळीं सोळा घोडे त्यांच्या तबेल्यांत हजर असतात. मी घोड्यांकडे निरखून बघतों हें पाहून रोहिणी म्हणाली-" सिंह भय्या, तुलाहि घोड्यावर स्वार होण्याचा नाद आहे वाटतं ? "

" हो आहे तर, रोहिणी ! आमच्याकडे इथूनच सैंधव घोडे जातात. पण इथले लहान सहान घोडेच तेवढे तिकडे जातात, हें या घोड्याना पाहिल्यावर लक्षांत येतं."

" होय, आमच्या घरूनहि दरवर्षी चाळीस पन्नास घोडे व्यापारी विकत घेतात. अन् बाबा कधींहि उत्तम घोडे विकत नाहींत. "

"तें तर यांच्याकडे बघतांक्षणींच कळतंय. मी वैशालीमध्यें असले घोडे कोणाकडेहि पाहिले नाहींत. एक गोष्ट विचारूं रोहिणी ? तूं घोड्यावर बसायला शिकते आहेस कीं नाहीं ?"

"शिकत्यें आहे तर ! मी या सोळा घोड्यांपैकी वाटेल त्या घोड्यावर बसून रपेट करीन. मी रोज सकाळीं बाबांबरोबर घोड्यावरून रपेट करत्यें."

"माझी धाकटी बहिण सोमा, हिला घोड्यावर बसतां येत नाही म्हणून विचारलं."

"काय सिंहभय्या, तुला लहान बहीणहि आहे ?"

"होय, माझ्या आईची मुलगी. तुझ्यासारखीच आतां ती दहा वर्षांची आहे. आणि तूं ग ?"

"ओहो, किती सारखेपणा ! मींहि दहाच वर्षांची आहे."

"पण ती चणीनं तुझ्यापेक्षां लहान आहे. निदान माझा तरी अंदाज असा आहे. गेल्या आठ महिन्यात ती थोडीशी वाढलीहि असेल.. पण सोमा फारच कमी बोलकी आहे."

"म्हणजे मी जास्त बोलत्यें वाटतं ?" असें म्हणून रोहिणी थोडीशी रुसलीहि.

तिच्या पाठीवर सुवर्णतंतूंप्रमाणें विखुरलेल्या केंसांवरून हात फिरवीत मी म्हटले- "नाहीं बरं रोहिणी, मी तुझ्याशीं सोमाची तुलना करताना तिला मुकी म्हणत होतों. पोरीच्या जातीनं मुकं असणं मला आवडत नाहीं. बरं आहे, मीहि एखादे दिवशीं तुझ्या बरोबर घोडदौड करायला येईन हं."

"तर मग सिंहभय्या ! तूं त्या अगदी लाल घोड्यावरच बैस हं. त्याचं नांव आहे रोहित. तो सर्वांत चांगला अन् बाबाचा फार लाडका आहे. तो मला ओळखतो. पहा मी आतां त्याच्या जवळ जात्ये." असें म्हणून रोहिणी रोहितकडे जाऊं लागली. तिला पहाताच तो फुरफुरूं लागला. आणि जवळ जाताच तो रोहिणीचें मस्तक हुंगूं लागला. रोहिणी आनंदानें म्हणाली-"रोहित माझ्यावर प्रेम करतो; बाबा माझ्या कपाळाचं चुंबन घेतात, माझं उपाघ्राण करतात, तें रोहितला कळतं आणि तोहि माझ्या केंसांचं उपाघ्राण करतो. सिंहभय्या, तूं असा माणसाप्रमाणं समजदार घोडा कुठं पाहिला आहेस ?"

मी हंसत म्हणालों- " छे छे ! इतका माणसासारखा तर नाहींच पाहिला मी. अन् तूं कधीं रोहितवर स्वारी केली आहेस ?"

"स्वारी तर केली आहे; पण हें पहा माझा हात उंच करूनहि त्याच्या पाठीवर पोंचत नाहीं. म्हणून चढतांना मला बाबांची मदत घ्यावी लागते."-असें म्हणून म्लान मुखानें रोहिणी माझ्या जवळ आली.

मी तिची हनुवटी वर उचलून म्हटलें-" पण रोहिणी, तूं कांहीं नेहमींच इतकी लहान राहाणार नाहींस. तूं घोड्याच्या पाठीपेक्षांहि उंच होशील. आणि रोहितवर जेव्हां बसायचं असेल तेव्हां तुला उचलून त्याच्या पाठीवर बसवायला मी तर हजर आहेच. "

" पण सिंहभय्या! तुला रोहित आपल्या जवळहि येऊं देणार नाहीं. रोहित अपरिचित माणसाला आपल्या जवळ येऊं देत नाहीं. त्यांतल्यात्यांत ज्यानं त्याची खोडी केली असेल त्याला तर कधींच नाही. हंसूं नको बाबा, रोहित खरोखरच फार समजदार आहे. पण मी तुला एक युक्ति सांगत्यें. रोहितला गव्हाच्या लोंब्या फार आवडतात. त्या त्याला खाऊं घाल. अन् मग तुला पाहून जर तो फुरफुरला, तर तो तुझा मित्र झाला असं खुशाल समज.

" बरं आहे, चल आपण जाऊं या. तुला भूक लागली असेल. आईला भेटवून प्रथम तुझ्या भुकेची व्यवस्था करवते. "

" होय रोहिणी, मला भूक तर लागलीच आहे. पण तिच्यापेक्षां आईच्या दर्शनाची उत्सुकताच मला जास्त आहे. "

" माझी आई फार चांगली आहे. आणि माझ्यासारखीच तुला एक बहीण आहे, आणि माझ्या आईसारखीच तुझीहि आई आहे, हे जेव्हा तिला कळेल तेव्हा ती तुझेहि खूप लाड करील. चल लौकर जाऊं या. " असें म्हणून ती पुढे निघाली.

आचार्य बहुलाश्व [ बहुत घोडेवाले ] हे नांव अगदीं बरोबर आहे.

## ( २ )

# आचार्य-पत्नी

प्रथम आचार्य-पत्नीकडे जायचें होतें. म्हणून आम्ही भराभर चालूं लागलों. गोशाळा व एक छात्रशाळा मागें टाकून सरळ त्यांच्याकडेच गेलों. घराची बांधणी आमच्या वैशालीच्या घरांशीं बरीचशी जुळणारी आहे. तेथल्यासारखेंच आंगण व त्याच्या सभोंवती पडव्या व त्याच्या मागे खोल्या वगैरे ओळींनी आहेत. बहुतेक

घरें दुमजली तरी आहेतच. तबेले व गोठे यांच्या वरच्या माळ्यावर चारा ठेवण्याची जागा. त्याच्याच जवळ दुग्धशाळा व नोकरांची राहण्याची जागा आहे. इथें खरेदी-विक्री होणारे दास-दासी नाहींत, आचार्य बहुलाश्व यांना आर्य-वर्ण-संपत्तीचा फार अभिमान असावा असें वाटतें. त्यांच्या नोकर वर्गात काळे किंवा सांवळे कोणीहि नाहीत. बरेचसे पश्चिम गंधार, पख्त व कम्बोजचेच आहेत. थोडेसे पार्शव [ इराणी ] सुद्धां आहेत. घरांचीं छपरें आमच्या प्रमाणें कौलारू नसून पश्चिम कोसल प्रमाणें समतल आहेत. माती व खडी चोपून हीं धाबी तयार केलेलीं असतात. भिंतीसुद्धां ओबडधोबड दगडांच्या असतात. व त्यावर जाड मातीचा थर लिंपून त्या गुळगुळीत केलेल्या असतात. मी गवंड्यांना भिंती बांधतांना पाहिलें म्हणून बरें, नाहींतर असल्या बिन घडलेल्या लहान मोठ्या ओबडधोबड दगडांच्या इतक्या सुंदर गुळगुळीत व मजबूत भिंती तयार करतां येतात याची मला कल्पनाहि आली नसती. खिडक्या दरवाजासाठी देवदारी लाकूड उपयोगांत आणलें आहे. लाकडांवर तऱ्हेतऱ्हेच्या नकशी-वेलबुट्टी काढण्यांत तक्षशिलेचे तक्षक वैशाली इतकेच हुशार आहेत. आचार्यांच्या निवासापुढील आंगण पुष्कळ मोठें असून त्यांत फुलझाडें लावलेलीं आहेत. आजकाल थंडीमुळे त्यांचीं पानें झडून गेलेली आहेत. मांडवांवर पर्णहीन द्राक्षालता पसरलेली आहे. रोहिणीनें सागितले--" ही मामुली द्राक्षालता नव्हे. प्रख्यात कपिशा द्राक्षालता म्हणतात ती हीच. पिताजींच्या एका शिष्यानं ती कपिशेहून पाठविली आहे. तिचा बहार आतां ओसरलाय. नाहींतर हिचे पांढुरके घोंस हिरव्या पानांच्या गर्दींत तुला दिसले असते. ते किती सुंदर दिसतात म्हणून सांगूं. "

" आणि त्यांची गोडी ? "

" ती सांगून तुला खरी नाहीं वाटणार भय्या ! मी तुला ती खायला देईन तेव्हांच कळेल. "

" पण वाळलेलीं द्राक्षं तितकीं स्वादिष्ट थोडींच असणार ? "

" वाळलेलीं नव्हेत. अगदीं ताज्या सारखीं. "

" पांच महिन्यांपूर्वींचीं द्राक्षं ताज्या सारखीं कशीं होतील ? "

" पहाशील तर खरा. आणि कपिशा द्राक्षांची दारू तर तूं कधींच घेतली नसशील ना ? "

" नाहीं, फक्त उपमा ऐकली आहे. "

" तर मग मी आईला सागून आजच तुला कपिशाचीं द्राक्षं खायला देववीन. अगदीं याच वेलीचीं बरं का ! आणि कापिशायिनी सुरा तर खुद्द कपिशाहूनच आलेली आहे. आमचे व्यापारी धंद्याकरतां दरवर्षीं कपिशेला जातात. आणि तिथून दरवर्षीं शेकडों कुप्या कापिशायिनी सुरा आमच्या घरीं येते. "

" तर मग रोहिणी, तुमच्या घरीं रोज कापिशायिनी सुराच प्यायला मिळते म्हणायची. "

" नाहीं, ती तर व्यापाराची वस्तु आहे. पूर्वेकडचे व्यापारीसुद्धां तक्षशिलेहून कापिशायनी सुरेचे हजारों बुधले घेऊन जातात. काय, तूं अजून तिची चवहि पाहिली नाहींस ? "

" आमच्या तिथं येईपर्यंत ती फारच महाग पडत असावी. आम्ही पूर्वेकडले गणतंत्री लोक, खाणं-पिणं वस्त्र-प्रावरण या बाबतींत फारच साधेपणानं राहतों. "

आचार्य-पत्नींची नजर अगोदरच माझ्याकडे गेली होती. म्हणून आगणातल्या त्या पर्णहीन द्राक्षालतामंडपांत आणखी जास्त थांबणें योग्य नव्हते. मी आचार्य-पत्नीला नमस्कार केला. आणि रोहिणीनें आपल्या स्वभावाला शोभेशा रीतीनें माझी ओळख करून दिली.

" आई, हा सिंह भय्या ! बाबांनी सिंहाला माझा भाऊ-भय्या-म्हणून म्हटलं आहे. आणि हा भाऊच आहे नाहीं तरी माझा. भय्या, इकडे ये, माझ्या जवळ उभा रहा पाहूं ? ओ हो ! मी तुझ्या छातीपर्यंतच लागते आहे. पहा तर खरं आई, बाबांनीं अगदीं बरोबर सांगितलं कीं नाही ? सिंह माझा मोठा भाऊ आहे, नाही का ? "

" होय बाळ, भाऊच आहे हो ! पण त्याला काही खायला-प्यायला घालशील कीं नाही ? कां भाऊ भाऊ म्हणूनच त्याचं पोट भरणार आहेस ? ये बाळ सिंह, तिकडून बाहेरून हातपाय धुवून ये. मग खाता खाता आपण बोलूं या. "

" पण आई, त्याला मी कापिशेयी द्राक्षं देईन म्हणून कबूल केलं आहे बरं का. "

" मग बघत काय बसलीस, जा लौकर एक पिटारी घेऊन ये. "

" आणि आई, संध्याकाळला कापिशेयी सुराहि पण ! " रोहिणीनें उतावळेपणानें सांगितलें.

" हो, हो, कापिशेयी सुरा सुद्धां बरं सगळं आदरातिथ्य तूंच करते आहेस. तूं आपला सिंहाला नुसता सिंह भय्या बनवून ठेवायला मागतेस वाटतं. अन् आईचा मुलगा नाही कां तो ? जा पिटारी घेऊन ये. संध्याकाळीं बहिणभावाला कापिशेयी सुरेचीच मेजवानी होईल हं. अन् तूं रोशनेपाशीं शिकलेला पार्शवी नाचहि करून दाखव. "

रोहिणी कोठीकडे धांवत गेली. मी आंगणांत ठेवलेल्या करपात्रानें पाणी घेऊन हातपाय धुतले. व आचार्य-पत्नी बरोबर जिना चढून वरच्या दिवाणखान्यांत गेलों. इथले जोडे दुहेरी असतात. त्याच्या तळव्यांना पुष्कळसे तुकडे जोडलेले असतात. व ते चामड्याच्या मोज्यांवर घालतात. आचार्य-पत्नीनें तसलाच जोडा घातला होता. मीहि थंडी लागूं नये म्हणून रस्त्याने तसलाच जोडा घातला होता. आम्ही

दारांत जोडे काढून दिवाणखान्यांत गेलों. तेथें सुंदर वेलबुट्टीदार गालिचा पसरला होता. भिंतीवर दोन तीन रंगीत चित्रे टांगलेली होतीं. त्यांतलें एक चित्र आचार्य-पत्नीनें रोहितसारख्या घोड्याचे काढलेले होते. या दालनाची-भोजनगृहाची-सजावट अगदीं साधी होती. याला लागूनच मागच्या बाजूला स्वयंपाकघर होतें. धुराड्यांतून धूर येत होता त्यावरून दोन प्रहरच्या जेवणाची तयारी होत असावी असें दिसत होतें.

आम्ही बैठकीवर बसलों. आचार्य-पत्नीनें आमच्यापुढें एक पांढरी चादर आंथरली. आणि ती खायचे जिन्नस आणायला स्वयंपाकघरांत गेली. तेवढ्यांत रोहिणी खापराची पिटारी घेऊन आली. मला तोंपर्यंत कल्पनाहि नव्हती की पाच महिन्यानंतर देखील अंगूर इतके ताजे राहूं शकतात. दोन चापुटकी गोलाकार झांकणें चिकणमातीनें साधून ती पिटारी बनवलेली होती. रोहिणीनें सांगितलें कीं, कपिशाकडे द्राक्षें अशा तऱ्हेनें पिटारीत बंद करून ठेवण्याची सर्रास चाल आहे. साध्याची माती फोडून वरचें झाकण बाजूला काढल्यावर पाहिले तो दोन दोन बोटें लांबीचे सुंदर मोठमोठे अंगूर आत लावून ठेवलेले. तेवढ्यांत मासाचे शिजवलेले दोन तुकडे, मीठ मसाला, सुरा व थोडीशी मिठाई घेऊन आचार्य-पत्नी तेथे आली. मी रोहिणीला पंक्तीला घेऊन जेवायला बसलों.

" सिंह, आता सांग पाहूं ? तुझी जन्मभूमी कुठं आहे ? " आचार्य-पत्नीनें मातेच्या प्रेमळ आवाजात विचारलें.

मी त्यांच्या प्रश्नाचें उत्तर दिल्यावर त्या म्हणाल्या-" महाली लिच्छवी माझ्या ओळखीचे आहेत. त्यावेळी मी रोहिणीपेक्षाहि लहान होत्यें. महाली माझ्या वडिलांचे शिष्य. म्हणजे भूरिश्रवांचे. ते मला त्यावेळीं फार चांगल्या चांगल्या गोष्टी सांगत असत. "

" सिंह भय्या, तुला येतात का गोष्टी ? तूं मला मोठमोठ्या अन् चांगल्या गोष्टी साग हं. " रोहिणीनें मध्येंच म्हटलें.

" रोहिणी, तूं मला बोलूं सुद्धा देत नाहींस हं. काय म्हणत होत्यें मी, सिंह ? महाली त्या काळीं तक्षशिलेच्या सर्व मुष्टिमल्लात जास्त बलवान् होते. त्याच्या बरोबरीचा जर कोणी थोडासा असेल तर तुझे आचार्यच. बरं, तुझा प्रवास कसा काय झाला ? "

" सार्थाबरोबर आलों मी आई ! वैशालीच्या एका व्यापाऱ्याचा सार्थ साकेतला येत होता. मी साकेतपर्यंत जाण्यासाठी त्याच्याजवळ कांहीतरी काम मागितलं तेव्हां त्यानी नावेंतलं सामान चढवण्या-उतरण्याचं व हत्यारबंद पहारा करण्याचं

काम सांगितलं. व त्याबद्दल साकेतपर्यंत फुकट पोंचवून वरती पंचवीस कार्षापण [ एक नाणे ] द्यायचं ठरवलं. ”

“ तर मग वत्सा ! तूं मजुरी करून इथपर्यंत आलास ? फार त्रास झाला असेल नाहीं. ”

“ साकेतपर्यंत तर मुळींच झाला नाहीं आई ! तो पाण्यांतला प्रवास होता. आम्ही महींतून गंगेंत व गंगेंतून प्रवाहाच्या उलट प्रवास करीत शरयूंत शिरलों. आमच्या सार्थवाहकाच्या ताब्यांत पन्नास नावा व हजारांपेक्षा जास्तच माणसं होतीं. फक्त एका ठिकाणीं शरयूच्या अर्ध्या वाटेंत डाकूंनी हल्ला करायचा बेत केलेला दिसला. परंतु आम्ही संख्येनं जास्त होतों. व आमचे धनुर्धारीहि चागले मजबूत होते. हें पाहून डाकूंनीं दोन चारच बाण मारून जंगलांत पळ काढला. आमच्या घोडेस्वाराना त्यांचा पाठलाग करायला हवा होता. पण त्या जंगलांत त्यांचा ठाव ठिकाण लागणं कठिण होतं. हं, साकेतपासून पुढें मात्र त्रास झाला खरा. श्रावस्तीचे श्रेष्ठी सुदत्त यांचा सार्थ तक्षशिलेला येत होता. या सार्था-बरोबर एक हजार गाड्या, अडीच हजार बैल, व दीड हजार माणसं होती. वाटेंत मोठमोठी जंगलं होतीं. व मोठमोठया नद्या उतरून जावं लागलं. रस्ता तयार करायचा, इतक्या पशूंची व माणसांची अन्न-उदकाची व्यवस्था करायची, व रात्रं-दिवस सशस्त्र राहून पाळीपाळीनं सार्थाची रखवाली करायची—हे फार त्रासाचं काम होतं. मला एका गाडीवर पहाऱ्याचं काम मिळालं होतं. जेवून खाऊन तक्ष-शिलेपर्यंत शंभर कार्षापण म्हणजे फार कमी वेतन होतं परंतु मला ही नोकरी सगळ्यांच्या शेवटीं मिळाली होती; व मी कमी वेतन पत्करल्यामुळं दुसऱ्या काम-गारांचं कांही नुकसाम होणार नव्हतं. ”

“ वैशालीहून इथं यायला किती महिने लागले ? ”

“ आठ महिने आई ! ”

“ तुझं खाणं चालूं दे बाळ ! वासराचं मास गरम गरमच चांगलं लागतं. चाकू आण इकडे, मी तुकडे कापून देतें. अन् हे काय ? लाडू खा ना ! अंगूरच काय खातोस ? ही काय दुर्लभ वस्तु थोडीच आहे ? ”

“ आई, आमच्या पूर्वेकडे लाडू म्हणजे अगदीं रोजची वस्तु आहे. अंगूर मात्र आम्ही दुर्लभच समजतों. वाळलेली द्राक्षं तर मिळूं शकतात. पण असले ताजे अंगूर म्हणजे तिथल्या लोकांना स्वप्नांतच मिळायचे. ”

“ बरं तर बाळ ! त्या गाड्यांच्या सार्थाची हकीगत तर सांग. इतका उशीर कां लागला ? ”

" गाड्या दोन योजनांपेक्षां जास्त चालत नाहींत. अन् शिवाय कुठं घास-चारा मिळाला नाहीं तर लौकर मुक्काम हालवायचा व जिथं सर्व सोई जमतील तिथं चार पांच दिवस थांबून बैल व स्वारीचे घोडे यांना विश्रांति द्यायची. या शिवाय वाटें-तलीं अहिच्छत्र, हस्तिनापूर, इंद्रप्रस्थ यांसारखीं मोठमोठीं शहरं व बाजारपेठा यांतून व्यापारहि करावा लागतो. आमच्या गाड्यांतून रेशमी व सुती कापडाचीच भरती जास्त होती. या शिवाय चंदन, सुवासिक वस्तु, हस्तीदंत, सोनं, मणिकार्य, इत्यादि वस्तुहि होत्या. गंगा यमुना व इतर नद्यांच्या घाटांवर श्रेष्ठी सुदत्त यांच्या कित्येक वखारी ( अनाथपिंडक ) आहेत. तिथून आम्ही आपला खरेदी केलेला माल ठेवीत असूं व विक्री करायचा माल बरोबर नेत असूं. "

" म्हणजे, सुदत्त हा फारच मोठा सार्थवाह दिसतो. "

" होय आई, साऱ्या पूर्वेत तेच मोठे आहेत. त्यांच्या बरोबरीचा श्रेष्ठी सार्थ-वाह यावेळीं तरी कोणी नाहीं. जम्बुद्वीपात इतरत्र कुणी असलाच तर असेल चुकून एखादा. तक्षशिलेत देखील त्यांची वखार आहे. "

" तक्षशिलेंत ? इतक्या लाब ?

" होय, इथंच काय पण पश्चिम समुद्रावर भरुकच्छ ( भडोच ) आणि पूर्व समुद्रावर ताम्रलिप्त यांसारख्या महातीर्थांच्या ठिकाणी त्यांच्या वखारी व मोठमोठे पडावहि आहेत. नद्या जशा समुद्राकडे वहात जातात तसा लक्ष्मीचा प्रवाह यावेळीं श्रावस्तींत सुदत्ताकडे वहात आहे. "

" ठीक पण आपल्या सार्थाची हकिगत तर सांग. "

" श्रेष्ठी सुदत्त यांचा सार्थ इतका बलवान व संघटित असतो की त्याची ध्वजा लांबून पहातांच दरवडेखोर रस्ता सोडून बाजूला होतात. फक्त पांचालच्या जंगलांत एका मोठ्या डाकूनं आम्हाला हटकलं होतं. त्याच्या जवळ पांचशे योद्धे व कित्येक घोडेहि होते. तरीहि त्यांना एक तामच टिकाव धरता आला. तिथंच मला आचार्य महालीच्या दांडपट्टा-कौशल्याचा थोडासा उपयोग करण्याची संधी मिळाली. मी एकट्यानं माझ्या तलवारीला आठ डाकूंच्या रक्ताचं स्नान घातलं. "

" आणि तुला कुठंच जखम झाली नाहीं ? "

" आई, थोडंसं लागलंच कीं, हें पहा हाताला; मनगटाच्या वरच्या बाजूला. " असें म्हणून मी कांबळ्याचा आंगरखा मागे सारून तिथला लाबट वण दाखवला.

रोहिणी मला अंगूर पुसून देत होती. तिनें त्यावर हात फिरवून म्हटलें--" सिंह भय्या, मग रक्त पुष्कळच आलं असेल नाहीं ? "

" नाहीं रोहिणी, तलवारीच्या घावांत रक्तस्रावाची इतकीशी भीती नसते, कारण नस तुटली असली तरीहि दोन्ही शिरा जोडून बांधल्या म्हणजे रक्त तेव्हांच

थांबतं. पण बाणाची जखम जास्त भीतिप्रद असते. कारण त्याचा घावच असा असतो कीं त्या जखमेचं रक्त थांबवणं फार कठीण असतं."

"पण भय्या त्या जंगलांत तुझ्या औषधपाण्याची व्यवस्था करायला कोणीच नसेल ?"

"एवढ्याशा जखमेला औषधपाण्याची काय जरूर ? शिवाय सुदत्तांच्या सार्थांत शल्य–चिकित्सक, विष–चिकित्सक, नेहमीं बरोबर असतात बरं का आई! एका जागीं फक्त हाणामारीची पाळी आली होती. बाकी सर्व प्रवास इथं येईपर्यंत सुरळीत पार पडला. मी ज्याच्या बरोबर आलों तो सार्थ कालच तक्षशिलेला पोंचला. आचार्य महालींनीं सांगितलं होतं, म्हणून मी सरळ इथं आचार्यांच्या गुरुकुलांत येऊन पोंचलों."

"बाळ, हें तुझंच घर आहे बरं!"

× × × × ×

## (३)

# तक्षशिला

तक्षशिला आमच्या वैशालीप्रमाणेच मैदानांत बसलेली मोठी नगरी आहे. आमच्या वैशालीनजीक डोंगर मुळींच नाहीत. पण तक्षशिलेच्या सभोवतीं मात्र पुष्कळ लांबवर हिरवेगार डोंगर आहेत. तक्षशिलेच्या जवळून एक लहानशी नदी वहाते. पण ती लहान असूनहि तिला बारा महिने पाणी असतें. उत्तरेकडच्या नदीचा डोंगरी भाग बांधून काढून मोठा जलाशय तयार केला आहे. तो बराचसा मगधच्या 'सुमागधा' सारखा आहे. याच्यांतून निघालेले कालवे सर्व गांवभर पसरलेले आहेत. त्यांच्या कांठांवर ओळीनें 'सरल' वृक्ष लावलेले आहेत. हेमंतऋतूंत ज्यावेळीं सगळीकडे रुक्ष रुक्ष दिसतें, त्यावेळीं हिमालयातल्या या वृक्षराजाची नैसर्गिक हिरवळ तक्षशिलावासी नरनारींच्या नेत्रांना आनंद देत असते. गांवातील रस्त्यांच्या एका बाजूने वहाणारे हे सरलवृक्षांकित कालवे फारच सुंदर दिसतात. नगरातील वापराबरोबरच बागबगीचे व शेती-वाडी यांनाहि या कालव्यांचे पाणी उपयोगी पडतें. इतकेंच नव्हे तर गांवाबाहेर लांबवर पसरलेले फळबाग हें देखील तक्षशिलेचे एक मनोहर वैशिष्टय

आहे. या बागांतून द्राक्ष, अक्रोड, सफरचंद, रक्तालु, अंजीर इत्यादि नाना प्रकारचे फळवृक्ष लावलेले आहेत. उन्हाळ्यांत या वृक्षांच्या सावलींत बसून खालून वहाणाऱ्या कालव्यांतील नीलवर्ण पाण्याकडे कितीहि पाहिलें तरी तृप्ती होत नाहीं. आमच्या आचार्यांचे पुष्कळसे फळांचे बाग आहेत. त्यांत फळे सुकवणें व सांठवून ठेवणें या करतांहि जागा आहेत. पावसाळ्याच्या आरंभापासून शरदाचे अंतापर्यंत या उद्यानांची शोभा अवर्णनीय असते. कुठे कुठे द्राक्षांचीं कलमें आहेत. मोठाल्या वेलाऐवजी काट छाट करून लहान लहान कलमाच्या आकारांत द्राक्षा ठेवण्याची इथें पद्धत आहे. प्रथम हिरवट तुरे, नंतर पुष्परागाच्या पुष्प-गुच्छाप्रमाणें त्यांचे फळांचे घोंस फारच सुंदर दिसतात. पद्मरागाप्रमाणे लाल-लाल अंजीर आपली शोभा निराळीच दाखवतात. अक्रोडाचे मोठमोठे वृक्ष, त्यांचीं पाने आमच्या रिठ्याप्रमाणें; छायाहि तशीच थंड. अक्रोडाचें लाकूड कोरीव कामाला फार चागलें असतें. फळांचे मोसमांत तक्षशिलेच्या बगिच्याचे दरवाजे प्रत्येक पांथस्थाकरतां खुले ठेवलेले असतात. त्यानें हवी तेवढी फळे तोडून खावीत. हं, पण बांधून घरीं नेणे चांगलें समजत नाहींत.

बागांच्या पलीकडे दूरपर्यंत तक्षशिलेच्या नागरिकांची शेती आहे. आमच्या आचार्यांचीहि पुष्कळ शेतें आहेत. थंडीच्या दिवसांत इथे स्मशान–शांतता दिसते. शेतें ओसाड असतात. व फक्त शेतातील झोपड्यांतून थोडथोडे गाडी–बैल व शेत–कामगार कंटाळवाणें दिवस काढतांना दिसतात. तोच वसंत आला की चहुंकडे नवे चैतन्य दिसतें. नुकत्याच झालेल्या हिमवर्षावानें ओलसर झालेल्या जमिनीत शेकडो नांगर चालू झालेले असतात. आणि नांगऱ्यांची मधूर गाणी व अधून-मधून ऐकूं येणारे ' ट्र ट्र ' असे उद्गार याच्या योगाने सगळा प्रदेश दुमदुमून जातो. नांगरटीच्या दिवसांत आचार्यांबरोबर आम्ही सर्व विद्यार्थी शेतांत जात असूं. नागरणे, गवत बाजूला करणें, निर्जीव मुळे निवडून बाजूला करणें वगैरे कामात मदत करीत असूं. वैशालीमध्यें शेतीच्या कामांत मी चांगलें नांव कमावलें होतें. तो लौकिक मी इथेंहि तसाच कायम राखला. मला आपल्या देशांतलि नांगरणीच्या वेळचीं गाणीं आठवत होतीं. पण तक्षशिलेची भाषा जशी निराळी तशीच इथलीं गाणीहि कितीतरी वेगळीं. म्हणून लोक हंसतील या भीतीने मला माझी गाणीं म्हणायचा संकोच वाटत होता. आपल्या सवंगड्यांबरोबर नांगरतांना त्यांचा लय धरून स्वतःशीं गुणगुणत मात्र होतों. दुसऱ्या वर्षी मी इकडचीं कित्येक गाणीं पाठ केलीं.

दोनप्रहरीं नांगर सोडून नवीन पालवी फुटलेल्या झाडांखालीं आम्ही जरा विश्रांति घेऊन कालव्यांत स्नानें करीत असूं. अधून मधून हे कालवे पुष्करिणीसारखे बांधलेले असत. हा स्नानाचा वेळ होता इतकेंच नव्हे तर या वेळीं आमच्या शारीरिक

गुणदोषांची चर्चा आचार्य करीत असत. आम्ही स्त्री-पुरुष सर्व कपडे काढून कालव्याच्या उंच कांठावरून पाण्यांत उड्या टाकून जलक्रीडा करीत असूं. त्यावेळीं आचार्य म्हणत-" रोहिणी, तुझा कमरेखालचा भाग अलीकडे वाढला आहे. " " सुमेध, तुझ्या पोटऱ्या पिळदार नाहींत. " " अनिरुद्ध, नितंबावर मांसाचा येवढा बोजा कां वाहतोस " " सिंह, तुझं शरीर सर्वांत सुडौल आहे. त्यांत चरबीचं नांवहि नाहीं. शरीरांतील नस नी नस पिळदार भरीव व जोमदार आहे. कामचुकारपणाचा दंड मेदवृद्धी हाच आहे. " " सरस्वती तर अगदीं म्हशीसारखी होत चालली आहे. तिचं पोट तर पहा ! नेहमींचीच जणूं गर्भारशी ! " " सरस्वती, तूं रोज घोडदौडीचा व्यायाम घेत जा. इथं शेतांत घोडे आहेत कीं. "

याप्रमाणें तासन्तास पोहत, उड्या मारीत, एकमेकांवर पाणी उडवीत, ग्रीष्माची दोनप्रहरची वेळ आम्ही घालवीत असूं नंतर दही, मध, सत्तू, एकत्र घोळून पीत असूं. उन्हाळयांत दुपारचें जेवण थोडेंच जात असे. पण संध्याकाळी फार मजा असे. त्यावेळी कामहि फार थोडा वेळ असे. सूर्यास्त होतांच शेतीतील घराच्या सारवलेल्या अंगणांत आम्ही सर्वजण बसत असूं प्रथम निखाऱ्यावर भाजलेले गोमांसाचे तुकडे व सुरा-पात्र पुढे येत. आम्ही मधून मधून मासाचे तुकडे खात असूं, व लाकडी पेल्यांतून सुरा स्वतः पीत व दुसऱ्याना देत असूं. नंतर जेव्हां डोळयांत किंचित लाली चढे, तेव्हां गाणीं सुरू होत. अन् शेवटीं विशिष्ट नृत्य-लास्य; असा आमचा कार्यक्रम असे. आचार्य-पत्नीने हल्लीं पन्नाशी गांठलेली होती. तरीहि पण तिचे नृत्य-कौशल्य पाहून आश्चर्य वाटे. आमच्या सारखे दोन दोन तरुण जवान थकून घामानें चिंब होत; पण तिचे पाय, हात, अंग-विक्षेप जराहि तालाबाहेर जात नसत. किंवा कुठल्याहि तऱ्हेने तिच्या शरीराला शिथिलता येत नसे. व चेहऱ्यावर किंचितहि थकवा दिसत नसे.

आचार्य बहुलाश्व यांनीं मशागत समाप्तीच्या महोत्सवादिवशीं स्वतःचें नृत्यनैपुण्य दाखवलें होतें. शरीराची प्रत्येक पेशीन् पेशी त्यांच्या आज्ञेत आहे असें हें नृत्य पाहून आम्हांला वाटलें. ते म्हणत-" नृत्य म्हणजे व्यायामाचा राजा. हा जन्मापासून मृत्यूपर्यंतचा व्यायाम आहे. तान्हं मूल पाळण्यात पडल्या पडल्या आपले सारे अवयव हलवितं, आणि मेद घालवून स्नायु तयार करतं. ज्ञान झाल्यावर तेंच नृत्य शरीराला चिवट-काटक बनवतं. कुदळ कुऱ्हाड इत्यादींच्या कामानं कांहीं स्नायु पुष्ट होतात. धांवण्याच्या व्यायामानं पाय बळकट व पिळदार होतात. मल्लयुद्ध व मुष्टियुद्ध यांच्या योगानं शरीराचे बरेचसे अवयव सशक्त होतात. परंतु हें नृत्य ! हे पद्धतशीर केल्यानं शरीरांतील नस न् नस बळकट होते, व उन्हानं बर्फ वितळावा तशी चर्बी नाहींशी होते. दुसऱ्या इतर व्यायामांकरतां मनावर जबरदस्ती करावी

लागते. तसं नृत्याचं नाहीं. सर्व शरीराबरोबरच मनहि उल्हसित होतं. दिवसभराच्या श्रमानंतर संध्याकाळीं थोड्याशा दारूबरोबर नृत्य करण्यानं दुसऱ्या दिवसाकरतां उत्साह येतो. मनुष्याला नृत्य हें आवश्यक आहे. ही सरस्वती जी म्हशीसारखी वाढते आहे, त्याचं एक कारण तिची नृत्याविषयीं विरक्ती हेंच आहे."

मशागत समाप्तीचा उत्सव आमच्या वैशालींतहि होत असतो. पण इथला हा उत्सव व उत्साह कांहीं वेगळाच. या दिवसांत खोंड, गवे, डुकरें, मेंढे इत्यादींचे नाना तऱ्हेनें तयार केलेलें मांस, तूप-मद्य घालून गोड व रुचकर केलेल्या पुऱ्या, अपूप, सुगंधी तादूळांची निर्जल खीर, आठ तास शिजत ठेवलेल्या हाडामांसांचें स्वादिष्ट सूप—इत्यादि अनेक प्रकारचे पदार्थ तयार करण्यांत येतात. त्या दिवशीं आचार्यांच्या मद्य-कोषांतील जुन्यांत जुनी दारू उपयोगांत आणली जाते. आणि कापिशेयी सुरेचे कित्येक बुधलेहि रिकामे होतात. आचार्य व सर्व कामगार-परिवार यांचें त्या दिवशीं सहभोजन असतें. सर्व रात्र नृत्य-गानात जाते.

शेती व मळे यांच्या संपत्तीशिवाय व्यापार हेंहि तक्षशिलेच्या नागरिकांचें एक मोठें चरितार्थ-साधन आहे. खुष्कीच्या मार्गाने प्राचीतील [ पूर्व भारतांतील ] वस्तु पार्शव [ इराण ], बाबूल [ बाबिलोनिया ], यवन [ ग्रीस ], इत्यादिकांच्या देशांतून पोचविण्यास मदत करणें हें तक्षशिलेच्या स्थल-सार्थाचे मुख्य काम आहे. श्रावस्ती, राजगृह, कौशांबी, व उज्जयिनी या सर्वापेक्षांहि तक्षशिला जास्त समृद्ध आहे. याचें मुख्य कारण हा व्यवसाय हेच. श्रावस्ती व कौशांबी या शहरीं राजे, राजकुमार, अमात्य, श्रेष्ठी, सार्थवाह, याचे मोठमोठे भव्य प्रासाद आहेत. त्यांच्या या प्रासादांतील ऐश्वर्याची तुलना तक्षशिलेतील साध्या-सुध्या नागरिक भवनांशी होणार नाहीं. पण तक्षशिलेत जी एक गोष्ट आहे ती त्या राजधानींतून दिसणार नाही. इथें भुकेकंगाल नागवेउघडे भिकारी सापडायचेच नाहीत. इथले नागरिक ही गोष्ट फारच लांच्छनास्पद मानतात. काम करण्यास लायक असलेल्या प्रत्येक माणसास काम अगर चरितार्थाचे साधन शोधून देणें नागरिक आपले कर्तव्य समजतात. दास-गुलाम इथे मुळींच नाहींत; कामगार स्त्री-पुरुष अर्थातच आहेत. परंतु मालक त्यांना आपल्या सारखींच बरोबरीची माणसें समजतात व त्याप्रमाणेंच त्यांच्याशीं वर्तन ठेवतात. त्यांना पुरेसे भोजन व वेतन देतात. व आमोद-प्रमोदाचे प्रसंगीं त्यांच्यांत ते समानतेनें मिसळतात. या कर्मकर मंडळींत पुष्कळ वेळां तक्षशिलेचे नागरिकहि असतात. आपत्कालीं त्यांना नोकरी करावी लागली तरी त्यांना कर्मकर [ नोकर ] कसें म्हणायचें ? ती कुटुंबांतीलच एक व्यक्ति म्हणून खान-पान, वस्त्र-प्रावरण इत्यादीमध्ये त्यांच्याशीं समानता ठेवतात. तक्षशिला प्रजातंत्राच्या बाहेरून आलेल्या कर्मकरांसंबंधी आचार्य बहुलाश्व म्हणत-" आमचा गण रक्त-संबंधावर आधार-

लेला आहे. म्हणून आपल्या बाहेरच्या व्यक्तीला नागरिकत्व देणं आम्हांला पसंत नाही. परंतु आर्य व मानव या नात्यानं त्याला परदेशी-परका असं वाटूं नये अशी वागणूक आम्ही ठेवली पाहिजे.

# ( ४ )

# उप-अध्यापक

तक्षशिलेंत येऊन चार वर्षं झालीं. आतांपर्यंत काय काय शिकलों तें सांगितलें. आतां मला तक्षशिलानगरी एक अद्‌भुत, अपरिचित, अनोळखी नगरी राहिली नाहीं. तिच्या विषयीं वैशालीचे खालोखाल जें प्रेम प्रथम उत्पन्न झालें, त्याची वाढ होऊन त्याला अंतःकरणात स्थायी स्वरूप प्राप्त झालें. मी आतां वेश, भाषा या बाबतींत सुद्धां तक्षशिलावासी बनलो. थंडीच्या दिवसात मी त्यांच्याप्रमाणेंच पायजमा, चामड्याचा आंगरखा घाली. त्यांच्याप्रमाणेच मी आपल्या लांब केसांचा बुचडा बांधून त्यावर नरम चामड्याच्या कानटोपीचें आच्छादन घालीत असें. सर्वात आनंदाची गोष्ट म्हणजे आचार्यांच्या विद्यार्थ्यांमध्यें मी सर्वात शीघ्र-ग्राही व त्यांचा आवडता बनलो. मी आता खालच्या वर्गातील शिष्याचा अध्यापक झालो होतो. मधून मधून वैशाली, आई, सोमा इत्यादींची आठवण येत नव्हती असें नाहीं. तरीहि तक्षशिलेत सुद्धा आचार्य, रोहिणी, तिची आई यांच्या गोड प्रेमळ बंधनांत मी इतका बांधला गेलों कीं त्यांना सोडतांना मला वाईट वाटल्याशिवाय राहिलें नसते. इतक्या दिवसांत वैशालीचा समाचार फक्त एकदांच मिळाला. आईनें कुणा सार्थाच्या हातां पायां पडून एक ताडपत्र सुदत्तांच्या माणसांजवळ दिले होते. व ते सुदत्तांच्या सार्थाबरोबर इथे पोचलें होतें. मी बहुधा दरवर्षी परत जाणाऱ्या सार्थाहातीं पत्र पाठवीं. परंतु त्यांतली फारच थोडी पत्रें आईपर्यंत पोंचलीं. श्रावस्ती वा साकेतमध्यें जर आई असती तर पत्र पोंचणें कदाचित जास्त सोपें होतें. प्राची [ पूर्व भारत ] चा समाचार दरवर्षी सुदत्तांच्या सार्थामार्फत मला मिळत असे.

शेतांतून सुंदर गहूं [ कनक ] कापणीला आलेले होते. मला आचार्यांनीं एका कर्मान्तांतील [ शेतांतील ] कापणीचे काम दिलें होतें. आचार्यांची सगळयांपेक्षां जास्त

जमीन होती. तींतील शेतें कर्मान्तघरापासून पुष्कळ लांबपर्यंत पसरलेलीं होतीं. कर्मकरांच्या जोडीला कित्येक विद्यार्थी व रोहिणीहि येथे आली होती. संध्याकाळी आम्ही कर्मान्तघरांत परत येत असूं सकाळीं अंधार असतांनाच थोडीशी न्याहारी करून व चामड्याचे पिशवींत ताक भरून ती पाठीवर बांधून मी घोड्यावरून शेतां-कडे जाई. कापणी झालेल्या शेतांत राहिलेल्या हिरवळींत घोडे चरायला सोडून देई; नंतर विळा घेऊन शेत कापण्याच्या कामास सुरवात करी हे काम चालू असतां स्त्री-पुरुष वेगवेगळ्या टोळया करून गाणीं म्हणत किंवा पालुपदाची री ओढीत असत. आम्ही पुरुष बायकांच्या आवाजाची नक्कल करीत असूं; परंतु ती स्वाभाविक मधुरता, कोमलता कुठून येणार? पण त्यामुळे कामाचे श्रम होत नसत-त्यांची जाणीव होत नसे. जेवणाची व्यवस्था रोहिणीकडे होती. ती दुपारच्या वेळीं घोडीच्या दुधाची मेरय [कची सुरा] पाठीवर एका बुधल्यांत आणि खाद्यपदार्थ व पाणी एका लहान गाडींतून असे घेऊन येई. एका मोठ्या झाडाखाली आम्ही सर्व जमत असूं आणि तिथें थट्टा-विनोदांत आमचे दोनप्रहरचे जेवण होई. नंतर स्वयंपाक्यांना परत पाठवून ती आम्हाला मदत करण्यास तेथेच राही. दोनप्रहरचे ऊन कमी होईपर्यंत आम्ही विश्रांति घेत असूं. कधीं हिरव्या लोंब्या भाजाव्या, तर कधीं आपल्या मैत्रिणीच्या सोनेरी लाल अगर भुऱ्या केसांना रानफुलानी शोभा आणावी; केव्हां मनोरंजक गोष्टी सागाव्या किंवा झोंपा काढाव्या.

सूर्य कलला कीं पुन्हा आम्ही विळे कोयते घेऊन काम करूं लागावे. रोहिणी विळा चालवण्यात कुशल होती तिचा आवाज तर हिमालयांतील कलविंक पक्षां-प्रमाणें मधुर होता. ती गाऊं लागली कीं आम्हांला त्या कडक उन्हाची झळ थंड वाटे. सूर्याची किरणें कोमल झाली की आम्ही कधीं कधी क्षेत्र-नृत्य करीत असूं. तरुण-तरुणीच्या केंसांमधून हिरव्या पानाफुलांचे अलंकार असत. मधोमध मुळा-सकट उपटलेलें गव्हाचे वाड उभे करून डाव्या हातांत सोनेरी केंसांचे झुबके व उजव्या हातांत विळे घेऊन आम्ही त्या उभ्या काडा भोवती गाणीं गात नाचत असूं. गाऊन सुकलेला घसा रोहिणीने आणलेल्या 'मेरया' नें ओला करीत असूं. त्यामुळें डोळयांवर थोडीशी लालीहि येई. तिकडे सूर्य अस्ताचली जाई, व इकडे आम्हीहि शेतांतल्या घरांत जात असूं. हा थंडीचा शेवट नव्हता; ग्रीष्माचा शेवट होता. घांसचाऱ्याच्या विपुलतेमुळे पशू धष्टपुष्ट होत असत. रात्रीच्या जेवणांत मुख्य भाग मांसाचा असे. त्याकरतां मोठीशी गाय, मेंढा अगर डुक्कर मारलें जाई. आम्ही कर्मान्तघरांत आल्यावर प्रथम कालव्यांमध्यें स्नानें करून शरीरावरील दिव-सभराची घाण काढीत असूं. नंतर धुतलेले कपडे घालायचे. उन्हाळयांत वैशाली-प्रमाणेंच इथेहि कपडे वापरीत. धोतर व उत्तरीय [उपरणें]. बायका धोतर व उत्तरीय

याशिवाय आंतून कंचुकी [ चोळी ] घालीत असत. आमच्या इकडच्यापेक्षां तक्ष-शिलेच्या बायका दागिने कमी वापरतात. एक दोन अगर तीन पदरी माला व कर्णभूषणें. बस्स, एवढेच याचे दागिने. धातूच्या दागिन्यापेक्षां पानांफुलांचींच भूषणें त्यांना जास्त आवडतात. गांधारी ( तक्षशिलावासी ) व माद्री ( सियालकोटवासी ) या मुळांतच इतक्या सुंदर असतात की दागिन्यानी त्यांना शोभा येण्याऐवजीं दागि-न्यांनाच त्यांच्यामुळें शोभा येते. उन्हाळयात चामड्याचे मोजे वापरत नाहींत. पण इथल्या स्त्री-पुरुषात जोडा घालण्याची पद्धत मात्र पूर्वेकडच्याहून जास्त आहे.

प्रथम आम्ही लोब्या कापून शेतांतच एक दिवस ठेवीत असूं. नंतर त्यांच्या पेंड्या बांधून शेतातल्या घराशेजारीं तयार केलेल्या मोठ्या खळ्यांतून ठेवीत असूं. सर्व शेताची कापणी झाल्यानंतर आमची कर्म-तथा क्रीडा-भूमि म्हणजे हे खळेंच तेवढें. इथेंच आम्ही बैलाकडून धान्याची मळणी करतो. इथेंच संध्याकाळीं धान्याच्या राशी उचलल्यावर नृत्य व पान करतो. त्या गव्हाच्या सोनेरी राशी किती सुंदर दिसतात ! आपल्या श्रमाचे मातीला मिळालेले हे नवें रूप पाहून मनुष्याला किती आनंद वाटतो ! मशागतीच्या वेळेपेक्षाहि पिकाच्या कापणीचे वेळी आम्हाला अधिक आनंद होई. म्हणूनच सगळेजण स्वत:शीच गुणगुणत असत. व थोडीशी चाहूल लागताच त्याचें नृत्यात परिवर्तन होई.

कापणीचे वेळी पाऊस कोसळायची धास्ती असते. इथे पावसाचें मान जरी कमी असे, तरी खळ्या-शेतातून पडलेल्या धान्याचें नुकसान करण्यास तेवढा पुरे होई. म्हणून पिकाची आवरासावर करण्याची घाई असते. सर्व खळे धान्य व भूस काढून रिकामें केल्या नंतर पुन्हा एकदां सहभोजन होतें. त्यात सर्व शेतांतले स्त्री-पुरुष सामील होतात. या वर्षीं सर्वांच्या आधी माझ्या शेताचे खळें आटोपलें म्हणून आचार्यांनी माझें व माझ्या सवंगड्याचें अभिनंदन केले.

चौथ्या वर्षाच्या सुरवातीला मी अर्धा विद्यार्थी व अर्धा अध्यापक बनलों होतों, हे तर मी आधीच सांगितलें आहे. आचार्यांच्या शिष्याची संख्या पांचशें आहे, असें म्हणत. या पांचशें विद्यार्थ्यांत सर्व विद्यार्थी उच्च वर्णाचे आहेत. त्यांच्यातील पुष्कळसे इथून लांब लांबच्या ठिकाणांहून आलेले आहेत. आज काल पूर्वेकडील विद्यार्थी कमी आहेत. जे आहेत त्यांत मागध देशाचे फी देऊन शिकणारे विद्यार्थी जास्त आहेत. आचार्य याला शुभ लक्षण समजत नाहींत. ते म्हणतात—

“ बाळ सिंह, यावरून असं दिसून येतं की पूर्वेकडे युद्ध-विद्येचं महत्व जाण-णारा एक मगध देशच आहे. वैशाली, कुसीनारा, कपिलवस्तु, पावा, अनूपिया, देवदह यापैकीं कोणत्याहि गणतंत्राचा तुझ्याशिवाय कोणीहि विद्यार्थी नाहीं याचा अर्थ काय ? याचा अर्थ हाच कीं हे लोक युद्धविद्येला सिन्धू नदी न मानतां प्रवाह-

हीन पुष्करिणी मानतात. बाळ, मी तक्षशिलेची खोटी प्रशंसा करीत नाहीं. खरं तेंच सांगतोय. या वेळीं जो तक्षशिलेच्या ज्ञानस्रोतापासून वंचित राहील तो युद्धविद्येंत तरी निःसंशय मागासलेला राहील. महाली युद्धविद्येचा पंडित आहे. पतित बंधुल-मल्लाच्याहि विद्येबद्दल आम्हांला शंका नाही. पण त्याचं ज्ञान पंचवीस वर्षांपूर्वीचं आहे. वैशाली व श्रावस्तीमध्यें राहून त्यांना पार्शवांनीं अलीकडे बळ वाढवण्याचे नवे नवे उपाय कोणते योजले आहेत ते कसं समजणार? व्यूह-भेदाचे नवे मार्ग कोणते निघाले आहेत? तिरंदाजींत तीराची शक्ति वाढवण्यास काय सुधारणा केली आहे? दगडां–विटांचे किल्ले पाडण्याकरतां कोणतीं नवीं हत्यारें तयार केलीं आहेत? या गोष्टी तक्षशिलेंतच कळतील. आम्ही पार्शवाशी व यवनांशीं जवळचे संबंध ठेवीत नाहीं. पण आम्ही त्याच्या अंतरंगांतील रहस्यं शोधून काढण्यांत वाकबगार आहोंत. आमची युद्धविद्या सिंधूच्या धारेप्रमाणें आहे. तिचा प्रवाह कधीं आटणारा नाहीं. तिच्यांत नेहमी नव्या नव्या ज्ञान-जलाची भर पडत असते. आणि दुःखाची गोष्ट एवढीच कीं ही जाणीव पूर्वेकडे जर कोणाला असेल तर ती फक्त मगध देशालाच आहे. मगध या ज्ञानाचा फारच काळजीनें सांभाळ करतो. इथं आलेले मागध-विद्यार्थी जी फी मला देतात ती त्याची स्वतःची असेल असं मला वाटत नाही."

"खरं आहे गुरुजी, त्यांना सर्व काही राज-कोषांतूनच मिळतं. मगधराज बिंबि-सार वेंचक होतकरू विद्यार्थ्यांनाच तक्षशिलेला पाठवतो."

"मला सुद्धा तीच शंका होती. पूर्वी कधीहि इतके मागध विद्यार्थी इथं शिका-यला येत नसत. माझं वय आता चौसष्ट वर्षांचं आहे. मला वाटतं मगध देश हा प्राचीच्या स्वातंत्र्याचा शत्रूच तयार होत आहे. एक दिवस तो तेथील गणांना खाऊन टाकील. तिकडची लहान मोठी रजुल्ली स्वतःच्या घशांत टाकील. जर त्याची ज्ञान-पिपासा अशीच अतृप्त राहिली तर मगध देशाचा रजुल्ला आज नाही दहा वर्षांनीं, पन्नास वर्षांनीं, पूर्वेकडचा पार्शव राजाधिराज होईल."

"तर मग ही गोष्ट आम्हाला फारच अनिष्ट आहे."

"यांत काय संशय?"

"परंतु गुरुजी, आम्ही एकटे लिच्छवी मगधांना पुरेसे आहोंत. पांच लिच्छवी कुमार या वर्षी इथं येणार आहेत. आम्ही आपली ज्ञानपिपासा शांत होऊं देणार नाहीं. वैशाली व तक्षशिला यांचा समागम कधींहि बंद होणार नाहीं."

"ठीक आहे बाळ, आमचीहि अशीच इच्छा आहे. प्राचीमध्यें जिच्या आम-च्यामध्यें आपलेपणा आहे अशी एक वैशालीच तेवढी आहे. मगधाची मान खालीं वांकवायला लिच्छवि गण पुरेसा आहे असंच आम्हालाहि वाटतं. पण आतां तूंच सांगितलंस कीं अंग देश मगधानं आपल्या पोटांत पचवून टाकला. याचा अर्थ

असा कीं, अंग देशाचं जन–धन–बल सगळं मगध देशाच्या हातीं गेलं. कोसलला आतां म्हातारपण आलेलं दिसतं. नाहींतर कोसल व बनारस यांसारखं जन-धन-समृद्ध राज्य मिळालं असूनहि मल्ल, शाक्य इत्यादि गणांच्या परवशतेचा फायदा उचलून त्याला वैशालीच्या स्वातंत्र्यावर संकट आणतां आलं असतं. मगधामध्यें मात्र वृद्धत्वाचं लक्षण दिसत नाहीं. बिंबिसार फार चतुर शासक आहे असं दिसतं. त्याचा पुत्र जर त्याच्यासारखाच निघाला तर मात्र वैशालीला फारच सावध राहावं लागेल असं वाटतं. ”

“ गुरुजी, बिंबिसारचा पुत्र अजातशत्रु याला मी ओळखतों. फार हुशार मुलगा आहे. त्याची आई आमच्या विदेह देशची आहे. त्याला मी पाहिला आहे. तो आचार्य महालीच्या विद्यालयांत आला होता. त्याची फार इच्छा होती तक्षशिलेला येण्याची. पण माता-पित्यांनीं त्याला आज्ञा दिली नाहीं. तक्षशिलेहून शिकून गेलेल्या जीवकशीं त्याची गाढ मैत्री आहे. ”

“ जीवक ? इथून शिकून गेला ? ”

“ होय गुरुजी, पण तो वैद्य आहे. आजकाल पूर्वेकडे त्यांची फार ख्याती आहे. मगध, कोसलच काय तर उज्जयिनीपर्यंत त्याला मागणी आहे. पण गुरुजी, तो फक्त वैद्यच आहे, योद्धा नाही. ”

“ परंतु मुला, वैद्य व योद्धा दोघे मिळून युद्ध जिंकतात. शल्य-चिकित्सा विशारद हा हजारों जखमी लोकाचे प्राण वांचवतो. इतकंच नाहीं तर कुटिल-युद्धांतहि त्याची फार मदत होते; तो सबंध सेनाची सेना महानिद्रेंत निजवील.”

“ आणि गुरुजी, जीवक या गोष्टीत फार हुशार आहे. अवन्तीराज प्रद्योत याची चिकित्सा करण्याकरतां तो नुकताच तिकडे गेला होता. काहीतरी कारणानं राजाची त्याच्यावर इतराजी झाली व त्याला जीव घेऊन पळावं लागलं. प्रद्योतच्या एका दूतानं त्याला रस्त्यांत पकडलं त्यावेळी तो पाणी पिण्याकरतां आवळे खात होता. त्यांतले दोन आवळे त्यानं राजदूतालाहि दिले. राजदूताला वाटलं यानं आपल्या खाण्यापैकी आवळे आपल्याला दिले आहेत तेव्हां ते खाण्यास हरकत नाहीं. पण तेच आवळे खाऊन तो तीन दिवस बेशुद्ध पडला. ”

“ तर मग मुला, तुला ठाऊकच आहे जीवकची युद्धांत किती मदत होईल तें. कांहींहि झालं तरी मगधची जी आज शक्ति आहे, तेवढ्या शक्तिच्या जोरावर तो लिच्छवींचं कांहीं वांकडं करूं शकत नाहीं. परंतु ज्यावेळीं इतर राज्यं तो ताब्यांत घेईल, तेव्हांच संकटाची भीति आहे. अन् कोसलचा पोकळ डोलारा त्याच्या तेव्हांच हातीं लागेल. शिवाय तक्षशिलेंतून शिकून जाणारे हे मगधचे भावी सेनापतीहि त्याच्या मदतीला आहेत. ”

" पण गुरुजी, आपण तर त्यांना सर्व रहस्यं शिकवीत नाहीं ना ? मग काय तर ? "

" ते खरं रे, पण तरीहि त्यांना पुष्कळसं शिक्षण मिळतंच. अन् रहस्यं ? एखादा हुशार मनुष्य त्यांतलीं बरींचशीं तक्षशिलेच्या हवेंतूनहि मिळवील. मगध फार भयंकर आहे. तो पूर्वेचा पार्शव [ पारस ] आहे. पश्चिम गंधारचे पुरुष तूं पाहिले असशीलच. आमचा पूर्व गंधार [ तक्षशिला ] आणि हा पश्चिम गंधार याच्यामध्यें फक्त महासिंधूच तेवढा आहे. ते आमच्यापेक्षा बुद्धीनं व शौर्यानं कमी नाहीत. परंतु कुरू, दारयू यांच्या अपार सेनेपुढं त्याना सफलता मिळाली नाही. तक्षशिलेला युद्ध-क्षेत्रांत जर एकटी उभी राहावं लागतं तर तिच्यावर आज दारयूच्या क्षत्रपाचा अंमल बसला असता. उत्तरापथ [ पंजाब ] चे आमचे सर्व गण दारयूच्या विरुद्ध एक झाले, हें आमचं सुदैव. पण ही एकजूट मला पुरेशी वाटत नाहीं. आमची ही एकता सहानुभूतीची आहे. मद्र-गण मद्रासाठी जसा लढेल तसा तक्षशिलेसाठीं नाही लढणार. मद्राचं सागलवर जसं प्रेम आहे तसं तक्षशिलेच्या वाट्याला येणार नाही हें आम्ही मान्य केलं पाहिजे. याच्या उलट रथाला जुंपलेले घोडे पुढं जाण्याकरता लगामाच्या इशाऱ्याची जसे तत्परतेनं वाट पहातात त्याचप्रमाणं पार्शव दारयूच्या ताब्यांतील प्रजा-जनपद—त्याच्या बाजूनं लढण्यास तत्पर आहे. "

" गुरुजी, हें भय मलाहि कधीं कधीं विचलित करतं. "

"परंतु बाळ, यांतून वाचण्याचा उपाय मला आतां तरी सुचत नाहीं. उत्तरापथाचे [ पंजाबचे ] सर्व गण एकत्र होऊन एक संघ, एक शासन असं कदाचित जरी झालं तरीहि आम्हाला आपलं गण-स्वातंत्र्य, गण-मर्यादा, रुधिर-बंधुत्व, हें सोडावं लागेल. म्हणून हा उपाय आम्हांला मान्य नाहीं. आमच्या गणांतील कोणी एकजणहि या गोष्टीला तयार होणार नाहीं. सहानुभूति, समान संकट या कारणांमुळं जी एकता आमच्या गणामध्यें या वेळीं आहे, तेवढी जोंपर्यंत शिल्लक आहे, तोंपर्यंत आम्ही पार्शवांना महासिंधूच्या या तीराला येऊं देणार नाहीं ही खात्री. "

## ( ५ )

# रोहिणी

आतां मी चोवीस वर्षाचा होतों आणि रोहिणी सोळा वर्षाची होती. रोहिणीच्या कन्या-सुलभ स्नेहाचें कोणत्या वेळीं तरुण-तरुणींच्या प्रेमांत परिवर्तन झालें याचा नक्की दिवस–मुहूर्त सांगणे कठिण आहे. हो, पण वर्षापूर्वींच्या एका घटनेची मात्र आठवण आहे. त्यावेळीं मी फार आजारी होतो. एका आठवड्यापेक्षां जास्त दिवस ताप येतच राहिला. आणि वैद्याच्या औषधाचाहि कांहीं परिणाम होईना; तेव्हां मात्र आचार्यहि घाबरले. त्यांना एक सारखें माझ्या खोलींत यावें लागे त्यामुळें आचार्यांच्या निजायच्या खोलीशेजारच्या खोलींत मला निजवलें होतें. मी अगदी अशक्त झालों होतों. फक्त पाणी व औषध यांवरच जिवंत होतों. आई व आचार्य दिवसांतून कित्येक वेळा येत. पण रोहिणी मात्र माझ्या जवळून उठून गेलेली मला आठवत नाहीं. ती शेजारीं पलंगडीवर बसून पंख्यानें वारा घाली, औषध देई, अगर वरचेवर कपडे नीटनेटके करी. " जरा झोंप घे ना ! " असें मी जेव्हां तिला म्हणे, तेव्हां तिनें " आत्तांच तर निजून उठल्यें " असें म्हणून ती गोष्ट उडवून लावावी. त्यावेळीं माझी स्मृति तितकीच असल्यामुळे मला तें खरें वाटे. परंतु रोहिणीचे लाल ओंठ फिकट झालेले मला दिसत होतेच. एक दिवस मी बेशुद्ध झालों. अर्धवट झोंपल्यासारखें करून मी थोडेसे डोळे उघडून पाहिलें. तों रोहिणीच्या डोळ्यांतून अश्रु झरत होते. माझ्या तर तोंडांतून आवाज निघणेंहि कठीण झाले होतें. तरीहि मी म्हटले–" रोहिणी ! " ती तोंड लपवूं लागली. मी म्हटलें–" तूं रडतेस होय ? मी पाहिलं बरं का ! " तिनें डोळे पुसून माझ्याकडे पाहिलें. तिचे डोळे सुजले होते. तिच्या नील तारकांवर स्निग्ध जलाचा थर जमलेला होता. मी हात उचलायचा प्रयत्न केला. तिनें आपलें मस्तक जवळ आणलें. कित्येक दिवसांत तिने केंस धुतले अगर विंचरले नव्हते. तरीहि ते विस्कटलेले केंस रेशमाच्या तंतूंसारखे कोमल होते. मी त्यांत बोटें फिरवीत म्हटलें—

" रोहिणी, मी अगदीं चांगला आहे. तूं उगीच काळजी करूं नको. "

" होय, सिंह भैय्या ! तूं खरंच चांगला आहेस. " तिनें आपल्या सद्गदित कंठांतला आवेग पूर्णपणें आवरून म्हटलें.

" मग तूं रडतेस कशाला ? "

ती कांहीच न बोलतां माझ्या कपाळावर हात फिरवूं लागली. तें थंडगार व सुखाचें वाटलें. त्या दिवसापासून माझा ताप खरोखरच कमी होऊं लागला. हळूं हळूं मी पथ्याचें खाऊं लागलों. आतां सगळ्यांत जास्त आनंदी दिसत होती रोहिणी.

एक वर्ष झालें. आतां माझें शरीर पुन्हां पहिल्यासारखें तयार झाले. द्राक्षें पिकण्याचे दिवस होते. रोहिणी व मी दोघानीं एका मळ्याचें काम अंगावर घेतलें होतें. वर्षा-ऋतू नव्हता तरी अजूनहि उष्णता होती. मी पानांसुद्धां एक द्राक्षालता घेऊन रोहि-णीच्या केसांत खोंचली. नंतर हिरव्याकच्च्या बारीक द्राक्षांचे घोंस त्यात खोंचले. तिच्या कानांत लोलकाप्रमाणें एक एक द्राक्षाचा दाणा लोंबत होता. गळ्यांतहि अंगु-रांची तीन पदरी माळ घातली होती. मी म्हणालों—" रोहिणी, तुझं गुलाबी मुख-मंडळ, सोनेरी केस, अस्फुट उरोज या सर्वांवर हीं द्राक्षांचीं भूषणं किती सुंदर दिसतात ! "

" चल ! तूं काहींतरीच स्तुती करतोस. " असें तिने म्हटल्यावर मी तिचे मांसल हात माझ्या राकट हातांत घेतले व हळूं हळूं संथपणे वाहाणाऱ्या कालव्याकडे तिला घेऊन गेलो. तिने जाण्यास अनमान केला नाहीं. फक्त तिच्या गालावर थोडीशी लाली चढली. कालव्याच्या काठावर बसून पाण्यांत वांकून पहात मी म्हणालों—" बघ रोहिणी, तूं किती सुंदर दिसतेस ती. "

तिनें एक वेळ वाकून पाहिलें. नंतर माझ्या प्रतिबिंबाकडे पाहून ती म्हणाली–" अन् तूं ? बघ तरी हे हंसरे डोळे किती सुंदर आहेत. तुझ्या चेहऱ्यापुढं माझ्या सौंदर्याचा काय पाड ? "

" नाहीं, रोहिणी. चुकतेस तूं ! तूं मोहिनी आहेस. "

" जाऊं दे रे ही थट्टा. "

" ही थट्टा नाहीं. इकडे ये, आपण दोघं एकदम पाण्यांत पाहूं या कुणाचं प्रतिबिंब सुंदर आहे तें. पण रोहिणी, खरं सांगितलं पाहिजे हं. "

तिनें आपला उजवा गाल माझ्या डाव्या गालाला लावला. असें करतांना तिला मुळींच संकोच वाटला नाहीं. आणि आम्ही अगदीं एकमेकांना चिकटून एकदम पाण्यांतील प्रतिबिंबाकडे पाहूं लागलों. रोहिणीच्या अर्धोन्मीलित डोळ्यातून चमक-णाऱ्या नील पुतळ्या फारच सुंदर दिसत होत्या. तिच्या लाल ओंठांवरील हास्य-रेषा तिच्या मुखमंडलाचें सौंदर्य आणखीच वाढवीत होती.

मी म्हणालों -" रोहिणी, खरं खरं सांग, तूं वनदेवी किंवा देवांगना दिसतेस कीं नाहीं ? "

मी पाहिलें कीं रोहिणी स्वतःच्या ऐवजीं माझेंच प्रतिबिंब न्याहाळीत होती. तिनें चटकन मान फिरवून माझ्या दृष्टीला दृष्टी भिडवून म्हटलें-" छे, सिंहाचं हें मुखच फार सुंदर आहे." आणि उष्ण श्वास सोडीत तिनें माझ्या गालावर आपले ओंठ टेंकले. मी तिला दूर होण्याची संधी न देता दोन्ही हातांनीं तिचा सजवलेला केशकलाप संभाळून तिला तशीच अडवून ठेवली. अशा नीरव अवस्थेंत आम्हीं किती युगें तसेच राहिलों असतों कोण जाणे. मग आमच्या लक्षांत आलें की अजून आम्हाला वीस टोपल्या द्राक्षें तोडायचीं आहेत. मी हात बाजूला करून म्हणालों-

" रोहिणी, अजून आपल्याला आजचं काम पुरं करायचं आहे."

आम्ही आपल्या टोपल्या घेऊन द्राक्षाचे घड तोडून टोपलींत टाकूं लागलो. नंतर संध्याकाळी मळ्यांतील झोपडींत येऊन तेथील दक्षिणोत्तर भिंतीत असलेल्या शेंकडों झरोक्याच्या भोंकातून तीं द्राक्षे वाळण्याकरतां ठेवीत असूं. त्याप्रमाणें आम्ही करीत असता रोहिणी आपल्याशीच गुणगुणत होती. मी तिला म्हणालों— " मोठ्यानं म्हण की." तिनें चटकन सुरवात केली ... ... ...मी म्हटलें—" रोहिणी, ही द्राक्षाची सुगी कधींच संपली नसती तर किती छान झालं असतं !"

ती म्हणाली-" नेहमी सकाळच राहिली असती तर ? तो माध्यान्ह नको; ती संध्याकाळ नको; नी ती रात्रहि नको."

" आणि तूं नेहमींच षोडशी पिंगला राहतीस तर ?"

" आणि तुमचं शिक्षण कधीं संपलं नसतं तर ?"

" शिक्षण संपायला नको म्हणजे काय, रोहिणी ?"

रोहिणी कंपित स्वरानें म्हणाली—" कोण जाणे, तुम्ही चटकन वैशालीकडे चालूं लागाल."

" अन् तुझ्या शिवायच ? रोहिणी ! असं होणं शक्यच नाहीं." असें म्हणून हिला जगूं कोणी हिसकावून नेईल या भीतीनें मी तिला आपल्या छातीशीं घट्ट धरलें.

" कोण जाणे तुम्ही चटकन वैशालीकडे चालूं लागाल." हे रोहिणीचे शब्द रात्रीं निजते वेळीं माझ्या कानांत गुणगुणत होते. रोहिणीचें भय अगदींच निराधार नव्हतें. वैशालीकरताच तर मी तक्षशिलेला आलों होतों. पूर्वजांच्या वैशालीची प्रतिष्ठा राखण्यासाठीं मी त्याग करणार नाहीं अशी जगांत कुठलीच वस्तु नव्हती. मी आपल्याशीच म्हणालों-" तुला वैशाली व रोहिणी यापैकीं एक कांहींतरी पसंत करायची वेळ आली तर तूं कोणाचा स्वीकार करशील ?" त्यावेळीं माझ्या मनानें जें उत्तर दिलें त्यानें हृदयात हजारों विंचू डसल्याप्रमाणें वेदना झाल्या. मला खरोखरच वैशालीचाच स्वीकार करावा लागणार होता; तर मग मी रोहिणीपुढें खोटा नाहीं का ठरणार ? " नाहीं; वैशालीचं प्रेम, प्रेमाच्या सीमेबाहेरचं प्रेम, आहे." असें मी मनाला

समजावलें. तरीहि तें पटेना. पुन्हां विचार आला– " मी रोहिणीला वैशालीला नेऊन दोघांचं प्रेम मिळवीन. " पण ती कांहीं मोठीशी उचित गोष्ट नव्हती. रोहिणीलाहि तक्षशिला—आपल्या आई-वडिलांची तक्षशिला—माझ्या वैशाली इतकीच प्रिय आहे. मग आचार्य आपलें एकुलतें एक अपत्य रोहिणी हिच्या वियोगाला कसे कबूल होतील ?

त्या दिवशीं रात्रीं माझें मन फारच व्याकुळ झालें होतें. सर्व शरीरांतून नुसत्या वाफा निघत आहेत असें वाटलें. निद्रादेवीनें मला त्या आगडोंबांतून काढून आपल्या शीतल मांडीचा आधार केव्हां दिला तें मला कळलेंच नाहीं. सकाळीं लौकर उठून मी हात-तोंड धुतलें. रोहिणीकडे जाण्याचे आधीं मी रात्रींच्या विचारांतून आपलें मन काढण्याचा प्रयत्न केला. तितक्यांत रोहिणीनें माझ्या मस्तकावर हात फिरवीत म्हटलें—" रात्री कांही वाईट स्वप्न पडलं वाटतं ? " तेव्हां माझें अपयश मला कळून आलें.

माझ्या अंतःकरणाचा थरकांप झाला. चेहऱ्यावरील भावना लपवण्याकरतां मी तिच्या डोळ्याशी डोळा लावून म्हणालों—" होय; पण रोहिणी, स्वप्नं हीं नेहमीं मन दुखवण्याकरताच येतात वाटतं ? "

" पण अशी स्वप्नं तरी काय पडली ? "

" सगळं नीट आठवत नाही. "

" प्रिया, जेवढं आठवत असेल तेवढंच सांगा. "

" कोणी क्रूर राक्षस माझ्याजवळून तुला ओढून नेत होता. मी आपली तलवार म्यानांतून काढण्याचा प्रयत्न केला; पण ती निघेना. तेव्हां मी म्यान फेकून त्या राक्षसावर तुटून पडलों. आणि त्याचे दोन्ही हात धरून उभा फाडून तुला जमिनीवर ठेवतों तोंच त्यानें माझ्यावर वार केला. मी वार तर चुकवला. पण तुझ्याकडे पहातों तों तूं बेशुद्ध पडलेली. "

" नाहीं प्रिया, अशा वेळीं मला बेहोशी येणं शक्य नाहीं. " असें म्हणून रोहिणीनें मला आपल्या हृदयाशी घट्ट आवळलें व आपल्या बळाचा अंदाज दाखवला.

" अग रोहिणी, मी स्वप्नाची गोष्ट सांगत होतों. स्वप्नांतल्या गोष्टी नेहमीं उलट्या असतात.

" पण तुमच्या तोंडाकडे पाहून वाटतं कीं, तुम्ही स्वप्नांतली गोष्ट सांगत नसून जागेपणांतलंच बोलतां आहांत. "

" होय प्रिये, माझं मन खरंच भीतिग्रस्त झालेलं आहे हें मीहि कबूलच करतों. भविष्यांतील अनिष्ट गोष्टींची कल्पनाहि भीतिदायक असते. "

" बरं, मग त्या राक्षसाचं तुम्ही काय केलंत ? "

" मी स्वतःचा बचाव करीत करीत त्याच्या हनुवटीवर ठोसा मारला. त्या सरशीं तो जमिनीवर उताणा पडला आणि मी त्याच्या छातीवर बसलों. "

" त्या दिवशीं तुम्ही जसं तक्षशिलेचा सर्वश्रेष्ठ मुष्टि-युद्ध-विशारद दत्त याला जमिनीवर लोळवलंत, तसंच ना ? अहाहा सिह ! तें दृश्य पाहून मला किती आनंद झाला होता ! अभिमानानं माझं मस्तक हिमालयाइतकं उंच झालं होतं. तो विजय जणूं कांहीं माझाच असं माझ्या मैत्रिणींना वाटलं. त्याना माझं अभिनंदन करतां करतां कंटाळा म्हणून वाटेना. "

" आणि रोहिणी तुला ? "

" मलाहि असंच वाटत होतं. आणि म्हणून तर माझा आनंद अगदी मावत नव्हता. "

" मग मी त्या राक्षसाला चीत करून सोडून दिलं. पण मी उठून पाहिलं, तो तूं तिथं नाहींस. माझ्या हृदयाचं पाणी पाणी झालं. अन् त्याच वेळेस मी पण जागा झालों. "

" प्रियतमा, स्वप्नांवर तुमचा विश्वास आहे ? "

" नाहीं रोहिणी ! माझा विश्वास नाहीं. "

" बाबांचा पण नाहीं. पण आईचा मात्र विश्वास आहे: स्वप्नाचा अर्थ उलटा असतो. वाईटाचा चांगला व चांगल्याचा वाईट. "

" रोहिणी, विश्वास ठेवायचाच असला तर मी आईच्या मतानुसार ठेवीनहि. "

" आणि… …

## ( ६ )

# पार्शवांशीं सामना देण्याची तयारी

पार्शव शासक ( शहा ) यवन-विजयांत सफल न झाल्यामुळें त्याला पूर्वेकडेहि सीमा-विस्तार करण्याचा उत्साह राहिला नाहीं. शास आर्तक्षत्र यानें पुन्हां पूर्वेकडे उचल करण्याचा विचार केला. तक्षशिलेला एक मोठी सोय होती. ती ही की, आस-पासच्या राज्यांची हालचाल तेथे चटकन् कळे. तक्षशिलेचे सार्थ व व्यापारी यांचे लागेबांधे राजधानी पर्शुपुरी ( पर्सेपोली ) येथील अंतःपुरापर्यंत पोंचलेले असत. तक्षशिलेचे वैद्य व युद्ध-विद्याध्यापक यांना पार्शव दरबाराकडून फार मोठी मागणी

होती. यामुळें पूर्व गांधारा विरुद्ध होणारी युद्धतयारी गुप्त राहणें संभवनीय नव्हतें. युद्धाच्या तयारी बद्दल अफवा उठूं लागल्या त्यावेळीं मला तक्षशिलेला आल्याला सात वर्षें झालीं होतीं. पिकांची कापणी होऊन गेली. पाऊस सुरूं झाला. मी तक्षशिलेला आल्यानंतरचें हें आठवें वर्ष. याच सुमारास युद्ध-तयारीच्या अफवा शहरांत फैलावूं लागल्या. गण-संस्थेच्या बैठकी दररोज होऊं लागल्या. त्या दिवसांत आचार्यांचा चेहरा नेहमीं चिंतातुर असलेला मला दिसे. एक दिवस मी याविषयी आचार्यांना विचारले असतां ते म्हणाले–

"बाळ, पूर्वगंधारवर संकटाचे मेघ गोळा होऊं लागले आहेत. पार्शव शासानं गंधारच्या क्षत्रपाला आमच्या विरुद्ध लढण्यास तयार होण्याचा आदेश दिला आहे."

"युद्धाची तयारी! तक्षशिलेवर आक्रमण!!"

"होय बाळ, आणि आम्ही ठरावहि केलाय कीं आजपासून प्रत्येक नागरिकानं सैन्यांत भरती झालं पाहिजे. प्रत्येकाचं हें पहिलं कर्तव्य आहे. उत्तरापथा [पंजाब] चे सगळे गण आमच्या मदतीला तयार आहेत, ही मोठी आनंदाची गोष्ट आहे. वृद्धपणामुळं मला सेनापतीचं काम पत्करणं शक्य नव्हतं. म्हणून सेनानायकांच्या शिक्षणाची जबाबदारी माझ्यावर सोंपवली आहे."

"गुरुजी, मला असा विश्वास वाटतो कीं तक्षशिलेच्या या लढ्याला वैशाली आपलाच लढा समजेल."

"हे तर खरंच; मी म्हटलंच होतं कीं वैशाली ही पूर्वेकडील तक्षशिलाच आहे. त्या दोघी बहिणी बहिणी आहेत."

"तर मग आपला शिष्य सिंह यालाहि या संग्रामांत भाग घ्यायला अवसर मिळाला पाहिजे."

"कांहीं हरकत होईलसं मला वाटत नाही. मी युद्ध-उद्वाहिके [कमिटी] कडून स्वीकृति मागवीन."

उद्वाहिकेने मला एक सेनानी म्हणून स्वीकारलें. इतकेंच नव्हे तर वैशालीच्या पांच तरुणांना देखील नागरिक सेनेंत भरती होण्याचा अधिकार दिला. नागरिकां शिवाय हजारों पाहुणे व कर्मकर यांनीहि तक्षशिलेकरितां लढण्याची इच्छा प्रगट केली व त्या सर्वांना अनुमतीहि मिळाली.

एरवीं सुद्धां तक्षशिलेच्या प्रत्येक नागरिकाला युद्ध-विद्येची जरूरी आहे. मग आतां तर पार्शवांसारख्या बलाढ्य शक्तीशीं तोंड द्यायचें होतें. म्हणून चारी बाजूला सैनिक-शिक्षण, व्यूह-रचना, खोटें आक्रमण इत्यादि लुटूपुटीच्या लढाईचे कार्यक्रम चालू होते. तक्षशिलेच्या सर्व नागरिकांजवळ स्वतःचे सैंधव घोडे होते व स्वतःचीं

हत्यारेंहि होतीं. ज्यांच्या जवळ ज्या वस्तूची कमतरता असेल, तिचा पुरवठा गणाकडून केला जाई. सेनानायक आपापल्या फौजेची पक्की तयारी करीत होते. त्यांच्या विशेष शिक्षणाचा भार आचार्य बहुलाश्वांसारख्या महान युद्ध-विद्या-विशारदावर होता. आचार्यांनीं मला आपलें कवच व सर्वांत चागला घोडा खुषीनें दिला. माझ्या जवळ शस्त्रें होतीं ती अशीं : एक शिंगाचें ( शार्ङ्ग ) धनुष्य, एक तूण, दीड हात लांबीचें एक खड्ग, एक शल्य [ भाला ], एक सुरा; आणि शिवाय एक मोठी गदाहि होती.

आम्हांला रोजच्या रोज शत्रूच्या हालचालीची बातमी मिळत असे. या बाबतींत पश्चिम गंधार मधील आमच्या बंधूंची आम्हांला मोठीच मदत होत होती. त्यांना शासाच्या सैन्यांत जबरदस्तीनें भरती व्हावें लागत होतें. परंतु आम्हांला खात्री होती कीं, ते आपल्या कर्तव्याचें पालन करतील—आणि झालेंहि तसेंच. "

पावसाळा संपतांच आक्रमण होईल ही बातमी आम्हांला कळली होती. परंतु पाऊस थांबतो न थांबतो येवढ्यांत अचानक शत्रूकडून हल्ला व्हायचा एखादे वेळी. म्हणून आमच्या सैन्याच्या कांहीं टोळ्या घाट व खिंडी यांच्या रक्षणाकरतां पाठवल्या होत्या. आचार्यांनी पुष्कलावतीकडून येणाऱ्या रस्त्यावरील घाटाच्या [ अटक ] रक्षणाचा भार माझ्यावर सोंपवला होता. तेथें रक्षक सैन्य हजर होतेंच. मला हुकूम मिळतांच तेथें जायचें होतें. यावेळीं तक्षशिलेचा दगडी कोट पक्का मजबूत केला होता व नगराच्या वेशीवर कडक पहारा होता. वेशीजवळ घटका दोन घटका थांबणाराला असे दिसत होतें की कितीतरी घोडे दौड करीत नगरांत येत आहेत व कित्येक दौडत नगराबाहेर जात आहेत. हे सर्व- संदेशवाहक घोडेस्वार आहेत.

आचार्यांनीं एक दिवस मला म्हटलें—

" पुत्र सिंह, आताचं युद्ध जोरांत होणार. शिबी, सौवीर, पख्त, भलानस, त्याचबरोबर वक्षू [ आमूनदी ] च्या उत्तरेकडील आणि पर्शुपुरी [ पर्सेपोली ] च्या पूर्वेकडील सर्व जन-बल एकत्र करून पार्शव शास तक्षशिलेचा विध्वंस करण्याच्या तयारींत आहे. आम्हीहि एकटे नाहीं. मल्ल, मद्र .. ... ...इत्यादि सर्व गण फार मोठी तयारी करीत आहेत. आणि सिंधू नदावरील आपण नेमून दिलेल्या घाटांवर त्यांचे कित्येक सैनिक आतां येऊन पोंचलेहि आहेत. युद्धात चढाई करणाराचा फायदा अधिक असतो. पण आम्हाला यावेळीं हा नियम अनुकूल नाहीं. कारण आमचा पराभव करणाराला पिछाडीशीं संबंध ठेवायच्या बाबतींत सिन्धु नद ही फार मोठी आडकाठी ठरेल. त्यांतल्यात्यांत एवढंच बरं आहे कीं, शत्रुसेनेला हवी तेथून सिंधू ओलांडून येतां येणं शक्य नाहीं. त्याकरतां तिला आम्ही ताब्यांत ठेवलेल्या

घाटावरूनच सिंधुपार व्हावं लागेल. आणि या कामीं त्यांना आपल्या संख्याबलाचा पुरा फायदा घेतां येणार नाहीं."

पहिल्या प्रथम जेव्हां मी कवच शिरस्त्राण घालून खड्ग, गदा, शार्ङ्ग, तूण धारण करून सज्ज झालों त्यावेळीं रोहिणी माझ्या खोलींत होती. तिनें माझा हा जामानिमा पाहून मला गाढ आलिंगन दिलें. मी तिला म्हणालों "प्रिये, या टणक लोखंडाच्या स्पर्शानं तुला फार त्रास झाला असेल, नाहीं?"

"त्रास? अन् मला? नाहीं प्रिय सिंह! आम्ही तक्षशिलेच्या तरुणी सुद्धां युद्धासाठीं सज्ज व्हायची तयारी करीत आहोंत. तक्षशिलेच्या बालकाला अगदीं प्रथम तलवारीच्या टोकावरचा मध चाटायचा असतो. त्याच धर्तीवर बालिकांनाहि तक्षशिलेचे नर-नारी बरोबरीच्या नात्यानं आयुध-सेवी बनवतात." मी शिरस्त्राण मागें सारलें व रोहिणीच्या खांद्यावर हात ठेवून म्हणालों—

"प्रिये रोहिणी, तक्षशिलेंतल्या स्त्रिया या बाबतीत वैशालीपेक्षां चांगल्याच पुढं आहेत."

"काय लिच्छवी स्त्रिया गांधारीं प्रमाणं समरभूमीवर जाऊं शकत नाहींत?"

"जाऊं शकतात कीं नाहीं हा प्रश्न नाहीं. कित्येक वैशाली स्त्रियांनी पूर्वे-कडच्या प्रदेशात सेना-संचालन, दुर्ग-गोपन केलं आहे. त्या बरोबरच हेहि खरं की तिकडच्या सर्व लिच्छवि स्त्रियांना हे शिक्षण देऊन तयार केलं जात नाही."

"प्रिया, कां बरं तयार करूं नये?"

"त्याला दुसरीहि कारणं आहेतच. पण वैशालींतील दास-दासींची व अना-र्यांची बहुसंख्या हेच मुख्य कारण मला तरी वाटतं. तक्षशिलेंतील अगदीं साधी रहाणी पाहून मी पहिल्या दिवसापासूनच फार प्रभावित झालों. आमच्या आचार्यां-सारखे शेतीवाडी, गुरं ढोरं, व्यापार इत्यादि समृद्धि असणारे धनी वैशालीमध्यें यांच्या प्रमाणं दास-दासीं बरोबर सह-भोजन, सह-नृत्य करीत नाहींत. तिथला नैसर्गिक साधेपणा, स्वाभाविक कठोर जीवन, नाहींसं झालं आहे. मात्र सैनिक-जीवनाच्या अनिवार्य आवश्यकतेमुळं नागरिकांना कठोर जीवनाची संवय ठेवणं भागच पडतं."

"प्रिय सिंह! मी अनार्य लोक कधीं कधीं इथं आपल्या घरीं आलेले पाहिले आहेत. एकदां इंद्रप्रस्थाहून परत आलेल्या आमच्या सार्थाबरोबर चार काळे लोक आले होते. बाबानी त्यांना आपल्या पंक्तीला बसवून कापिशेयी सुरा पाजून व कोंव-ळ्या वासराचं मांस भरपूर खाऊं घालून तृप्त केलं होतं. ही गोष्ट तूं इथं यायच्या आदल्या वर्षी घडलेली आहे. मी विचारल्यावरून बाबांनीं मला त्यावेळीं सांगितलं होतं कीं हे गंधार, मद्र.........इत्यादि सगळे प्रदेश मुळांत याच लोकांच्या

मालकीचे होते. आमचे पूर्वज पश्चिमेकडून स्वतःच्या घोड्यांवर स्वार होऊन आले, तेव्हां सिंधु नदाच्या पश्चिमे कडचा विस्तृत भू-भाग सुद्धां यांच्याच ताब्यांत होता. आमच्या पूर्वजांचं यांच्याशी युद्ध झालं, व त्यात अश्वारोही विजयी झाले. आणि यांची भूमी आमच्या हातीं आली. पण प्रिया, मी दास-दासी कधी पाहिल्या नाहींत; त्या कशा असतात ? "

" त्या दिवशी सुदत्ताच्या सार्थांचा पुढारी माझ्याकडे आला होता; त्याच्या बरोबर एक काळा मनुष्य आला होता, तुझ्या लक्षांत आहे रोहिणी ? "

" होय, मी त्याला पाहिलं होतं. त्याच्या केसाचा व शरीराचा रंग सारखाच काळा होता. त्याचे डोळे लाल लाल निखाऱ्यासारखे दिसत होते. त्याचं नाक खूप रुंद व नाकपुड्या मोठमोठ्या होत्या. तो ठेंगणा परंतु बलिष्ठ दिसत होता. दास असेच असतात होय ? "

" नाही, दासांचं असं कांही विशिष्ट रंग-रूप नसतं. पण बहुतेक दास काळेच असतात. पण दास कुणाला म्हणतात ठाऊक आहे ? आपले घोडे अगर बैल याच्या-प्रमाणं ज्यांची खरेदी-विक्री आपण हवी तेव्हां करूं शकतो त्यांना दास म्हण-तात. "

" काय ? खरेदी विक्री ? "

" होय, प्रिये रोहिणी; या तक्षशिलेंत आर्य हजार दीड हजार वर्षांपूर्वी आले; तेव्हां त्यांनीहि पराजितांच्या दासप्रथेचा स्वीकार करून कित्येक दास-दासी ठेवल्या होत्या. परंतु नंतर त्यांना आपल्या त्या काळच्या स्थितीत या प्रथेच्या परिणामाचं भय वाटूं लागलं. "

" कोणत्या बाबतींत भय वाटूं लागलं ? "

" सर्वांत पहिलं भय रुधिर-मिश्रणाचं. जर तें सम्मिश्रण झालं असतं तर रोहिणी, तुझ्या या केंसांचा रंग सोनेरी दिसण्याऐवजीं दुसराच कसला तरी दिसला असता. दुसरं भय सैनिक-जीवनाची कष्टसहिष्णुता नष्ट होऊन सुकुमार नागरिक होण्याचं. आणि सर्वांत मोठं भय म्हणजे इकडे शेजाऱ्यांशीं निरंतर लढाईंत गुंतलों असतांना अंतर्गत व्यवहारांत या दासाचा प्रभाव सर्व प्रकारांनीं वाढत राहायचा. "

" मग त्याचा परिणाम लिच्छवि स्त्रियांच्या क्षत्रियत्वावर कसा काय झाला ? "

" शेती व पशुपालन यांकरतां त्याच्याजवळ पुष्कळ दास होते. केर-पोतेरं, दळण-कांडण, या कामांकरतां त्यांच्याजवळ किती तरी दासी होत्या. आतां तूंच विचार कर, या सर्व गोष्टी जर तक्षशिलेत असत्या तर आजची रोहिणी तशीच राहिली असती का ? "

" प्रियकरा, तुम्हीच सांगा ! "

" तुझे हात पद्माप्रमाणं लाल झाले असते. इतकंच नव्हे तर कोमलहि तितकेच झाले असते. "

" कोमल देखील! मग मला तलवार फिरवतां आली नसती; कुदळ चालवतां आली नसती. धनुष्याची दोरी खेंचतांना माझ्या आंगठ्याला व तर्जनीला फोड आले असते. "

" आणि तुझे गाल आणखी लाल दिसले असते. परंतु उन्हाची तिरीप लागतांच ते कोमेजले असते. "

" आणि मग मला घरांत गोषा घेऊनच बसावं लागलं असतं. "

" अन् थोडंसं चालल्याबरोबर तुला दम लागला असता. "

" तर मग मी तलावांत पोहणं व जल-क्रीडा या सुखाला पारखी झाल्यें असत्यें. "

" मग तुला स्वतःच्या प्रत्येक कामाकरतां आपल्या दासीवर अवलंबून राहावं लागलं असतं. "

" मग माझ्या या हातां-पायांना काम तरी काय? छे छे; हें मला मुळींच आवडणार नाहीं. "

" पण जर तुझ्या आई-आजी-पणजी सगळ्या हेंच करीत आल्या असत्या, तर तुलाहि तें पसंत करावं लागलं असतं "

" पण प्रिय सिंह, आतां तर तो विचारहि मला करवत नाहीं. बाबांचं म्हणणं ऐकलं आहेस ना-'चर्बी ही कामचुकार माणसालां मिळालेली शिक्षा आहे.' दासी बाळगणाऱ्या खरोखरच म्हशीसारख्या वाढत असतील. सर्व लिच्छवी स्त्रिया का अशाच असतात?"

" नाहीं प्रिये, सोमा तुझ्या सारखीच आहे. सर्व लिच्छवि इतके 'भाग्यवान' कुठं आहेत की त्यांचीं सारी कामं दास करतील? पण एकमेकांचं पाहून सर्वांनाच तसा मोह होतो हें मात्र खरं. सैनिक-शिक्षणामुळं पुरुषांना असलं ऐदी जीवन पतकरायला प्रतिबंध होतो. पण स्त्रीवर्गात हा ऐदीपणाचा रोग भलताच पसरला आहे. "

" प्रियकरा, मग काय मलाहि वैशालीला गेल्यावर असंच वागावं लागेल? "

मी तिच्या गुलगुलीत गालांवर माझं कपाळ टेंकून म्हणालों—" प्रिये रोहिणी! नाहीं. तूं तिथल्या स्त्रियांना गांधारी महिलांच्या जीवनाचं शिक्षण दे. माझी आई तुझ्या सारखंच काम करते. तिला तूं आवडशीलच. "

" अन् सोमाला? "

" सोमा अजून कुमारिका आहे. ती सुंदर आहे. ती एखाद्या श्रीमंत लिच्छवि कुमाराच्या प्रेमांत सांपडली तर कोण जाणे तिलाहि इतराप्रमाणं वागावं लागेल."

" नाहीं, मी आपल्या नणंदेला तशी होऊं देणार नाहीं. ती सरस्वतीसारखी होईल मग."

" बरं तें राहूं दे रोहिणी ! हें कवच माझ्या अंगाला बरोबर बसतं कीं नाहीं तें सांग पाहूं ?"

" जरा पाठीमागून तर पाहूं दे—" असे म्हणून ती माझ्या पाठीमागें गेली; नंतर मोठ्या आनंदानें म्हणाली हें कवच जणूं कांहीं तुमच्या करतांच तयार केलं आहे. अन् प्रिया, तुझी छाती इतकी रुंद आहे हे माझ्या कधीच कसं लक्षांत आलं नाहीं ?"

" ती दररोज चार चार बोट वाढते थोडीच ? अन् तूं तर रोजच्या रोज पहातेच आहेस कीं."

" रोजच्या रोज नाहीं, क्षणाक्षणाला !" रोहिणीच्या नेत्रांचे आनंदी नर्तन चालू झालें. " अन् सिंह ! हें माझ्या आजोबांचं कवच आहे हें तुम्हाला ठाऊक आहे ? त्यांच्या विशाल छातीची बरोबरी करणारा त्या काळीं कोणीहि नव्हता."

" तुझ्या आजोबांचं ?" मी भावनोत्कंठित स्वरानें म्हणालों.

" होय, अन् या कवचानं नेहमी विजयच मिळवला आहे. प्रियकर सिंह, तुम्हीहि हें घालून रणक्षेत्रातून विजयी होऊनच परत याल."

" रोहिणी, तुझी प्रसन्न मुद्रा पाहून मला कितीतरी आनंद होतोय म्हणून सांगूं !"

" माझा चेहरा प्रसन्न कां नाहीं दिसणार ? रणांगणांतल्या लाल कर्दमानं माखलेल्या देहानिशीं आमचा प्रियकर जेव्हां परत येतो, तेव्हां आम्हां गांधारी महिलांना सर्वांत जास्त आनंद होतो. तुझ्या हातावरल्या खड्गचिन्हाबद्दल मी आपल्या मैत्रिणींना नेहमीं असं अभिमानानं सांगत असत्यें की, खड्गचिन्हापेक्षां जास्त चांगलं असं भूषण कुठलंच नाहीं; त्याहून जास्त गौरवाचं असं कोणतंच चिन्ह नाहीं."

मी कर-त्राणें काढून ठेवलीं. रोहिणीचे मस्तक हाती घेऊन तिचे कोमल केस कुरवाळीत म्हणालों—

" प्रिये, तक्षशिलेपासून शिकण्यासारख्या आणखी पुष्कळच गोष्टी आहेत असं मला दिसून आलं. प्रियतमे, किती शूर आहेस तूं ! तुझ्यासारख्या वीर तरुणी आपल्या प्रेमिकांच्या हृदयांत केवढा तरी शक्तिसंचार करीत असतील ?"

" खरंच, आम्हां गांधारींना मृत्यू हा भयानक वाटतच नाहीं. मृत्यूचं भय तें काय ? तो यायच्या अगोदर त्याला भिणं म्हणजे निव्वळ मूर्खपणा आहे. आणि आल्यावर

तिथं भ्यायला राहतंय कोण? जीवन-रसाचा आस्वाद घेण्यासाठीं आम्हांला आमच्या आयुष्याचा प्रत्येक क्षण न् क्षण हवा असतो. अर्थात जीवनच राहाणार नाहीं ही काळजी करायला आम्हाला फुरसतच नसते. ”

“ परंतु मृत्यू हा प्रियवस्तूचा वियोग घडवतो ना ? ”

“ मग काय, मृत्यूला भिणाऱ्याला आम्ही आपला प्रिय समजूं? नाही प्रियतम! जो वीर व निर्भय आहे त्यालाच आम्ही प्रिय समजतों. याचाच अर्थ असा कीं आम्हीं त्याचं मोल द्यायला तयार असतो! ”

रोहिणी हे बोलत होती तेव्हा तिची चर्या गंभीर दिसत होती. आणि मी मुग्ध होऊन तिचे एक एक अक्षर नुसते ऐकत होतों इतकेच नव्हे तर त्याचें श्रवण-पान करीत होतों. मी विचार करूं लागलों : वैशालीमध्ये अशा स्त्रिया, अशा माता, अशा भगिनी असायला पाहिजेत. तिथे अशा स्त्रिया नाहीत असे नाहीं. पण सगळ्याच अशा नाहीत. मी नंतर म्हणालो—

“ रोहिणी, तूं किती चांगली आहेस! खरोखरच प्रेमाच्या राज्यांत केवळ जीवनालाच स्थान आहे. तिथं मृत्यूला जागा नाहीं. ”

“ सिंह! प्रेम सदैव जिवंत असतं. दोघापैकीं एक जिवंत असेपर्यंतच नव्हे तर त्यानंतरहि जिथं आमचे पूर्वज राहात आहेत त्या प्रकाशमान लोकात तें कायम राहतं. ”

आईचा आवाज ऐकून रोहिणी तिकडे धांवत गेली. आचार्यांच्या खोलींत त्यांची चाहूल ऐकून मी त्याच्या खोलींत गेलों. आचार्य माझें कवच पाहून म्हणाले—

“ सिंह, तुला हें कवच अगदीं बरोबर बसतंय. ”

मी मान लववून आचार्यांच्या भाषणाला अनुमोदन दिले. कांहीं वेळ आम्ही युद्धाच्या तयारी विषयीं चर्चा करीत राहिलो. मला त्यावेळीं रोहिणीच्या त्या ‘ पितर लोकाची ’ आठवण झाली. मी आचार्यांना म्हणालों—“ गुरुजी, वीर मेल्यावर पूर्वजांच्या प्रकाशमान लोकांत जातात, यावर आपला विश्वास आहे काय ? ”

“ बाळ, माझ्या विश्वासाचा प्रश्नच विचारूं नको. माझ्या मतानं ती एक गोड कल्पना आहे तरी मी म्हणतों ही कल्पना पुष्कळ बरी. पण पूर्वेकडच्या रजुल्ल्यांनीं आपल्या प्रजेला अंध-कारांत ठेवायसाठी जी कल्पना काढली, व तो कपटी ऋषी प्रवाहण यानं जिचा प्रचार पूर्वेकडे जोरांत केला, ती कल्पना तर याहून वाईट आहे. पितर लोकाच्या कल्पनेंत प्रियजनाच्या नित्य समागमाची भावना तरी होती. पण या रजुल्ल्यांनीं याच लोकीं पुन्हां पुन्हां जन्म घ्यायची—पुनर्जन्माची—कल्पना फैलावून दिली. त्यांत त्याना आपला नीच स्वार्थ साधायचा होता. ते त्या कल्पनेद्वारां आपला या जगांतील अधिकार व भोग यांचं औचित्य शाबित करूं इच्छित होते. ‘ही दास-

दासींची दुनिया आम्हीं निर्माण केलेली नाहीं; मनुष्याच्या पूर्वकर्मामुळंच त्याला दास्यत्व आलेलं असतं,' असा होता या रजुल्ल्यांचा युक्तिवाद."

"जे लोक मानवी जीवनाचं मूल्य म्हणजे निव्वळ कल्पना समजतात, अगर जे जीवनाच्या नियमानुसार वागत नाहीत, त्यांनाच या कल्पनांचा प्रसार करायची जरूरी भासते असं मला वाटत."

"होय बाळ, दास्यतेच्या जगात कामचुकारांना जीवन रसाचा आस्वाद घेण्याची पात्रता रहात नाही. श्रम, व्यायाम, नृत्य, याच्या योगानं आपल्याला भूक चांगली लागते. म्हणून आपण आहाराचा रसास्वाद घेऊं शकतों. आणि तो पचवून आपलं शरीर पुन्हा श्रम, व्यायाम व नृत्य करण्यास आपण सक्षम बनवतो. जर आपण रसास्वादाकरता आवश्यक असे श्रम करण्यात कुचराई करूं तर रसास्वाद घेण्याची लायकी आपल्यात फार काळ राहणार नाही हें खास. दासांच्या श्रमावर पोसलेला मनुष्य स्वतः जीवनरसाचा आस्वाद घेण्यास लायक रहात नाहीं. मग तो कधीं जीवनावर रागावतो, तर कधी दास्यप्रथा न्याय्य आहे हें सिद्ध करण्याकरता पुनर्जन्माच्या गोष्टी बोलतो. जीवनाचं रहस्य पुष्कळसं अज्ञातच असतं. परंतु जीवनाकडे पाठ फिरवून जीवनाची व्याख्या करणं म्हणजे केवळ वंचनाच होय."

"गुरुजी, आम्ही तक्षशिलेकरता प्राणोत्सर्ग करण्यास तयार आहोंत, हीच जीवनाची सत्यता आहे."

"बरोबर बोललास बाळ! जीवनाच्या सत्यतेचा इन्कार केल्यानंतर आपण मनुष्य राहाणार नाहीं. आपण भित्रे कीटक राहूं. असा पुरुष आपल्या गणाचा व बांधवांचा वैरी होतो. इतकंच नव्हे तर स्वतःचाहि वैरी होतो. तो जर कुणाचा मित्र होत असेल तर तो आर्तक्षत्रासारख्या लुटारू खुनी लोकाचा मित्र होईल. दुसऱ्याचं घर व दुसऱ्याची संपत्ति लुबाडणाऱ्यांचा मित्र होईल."

"तक्षशिलेचं चिर-यौवन... ... ...

## ( ७ )

# रणांगण

' टिहू ' असा सांकेतिक आवाज तीन वेळां झाला. आम्ही सर्व सावध होऊन आपापलीं आयुधें सरसावून नदीच्या पात्रावर पसरलेल्या दाट अंधारात डोळे फाड-फाडून चहूंकडे पहाण्याचा प्रयत्न करूं लागलों. चोहोकडे अत्यंत शांतता होती. एकमेकांचे श्वासोच्छ्वास ऐकूं येत होते. परंतु आमचे कान नदीच्या पात्राकडे लागले होते. थोड्याच वेळात थप-थप असा आवाज ऐकूं येऊं लागला. या ठिकाणीं खड-काळ प्रदेश असल्यामुळें नदीचा प्रवाह फार अरुंद आहे. अंधेऱ्या रात्री पार्शव याच ठिकाणाहून नदी उतरण्याचा प्रयत्न करतील अशी आम्हांला भीति वाटली. पली-कडच्या तीरावरील जंगलातून आमच्या टेहळयानें आम्हाला इशारा देण्यासाठीं हा संकेत ध्वनी काढला होता. पहातां पहातां ती थप-थप आणखी जवळ ऐकूं येऊं लागली. त्या घोर अंधारांत फक्त आवाजाच्या अनुरोधानें आम्ही बाण मारीत होतों. तीरांनीं आपलें काम केल्याचें थोड्याच वेळांत कळून आलें. कारण वल्ह्यांचा आवाज मागें परतल्यासारखा ऐकूं आला. त्यावरून आम्ही निष्कर्ष काढला कीं निदान आजच्या रात्रीं तरी शत्रू इकडे येण्याचा प्रयत्न करणार नाहीं. बरोबर त्याच वेळीं पुन्हां एकदा संकेत ध्वनी ऐकूं आला. संकट टळले नसून शत्रू मोठ्या तयारीनें येत आहे हाच याचा अर्थ होता.

नावांना तेथें तोटा नाहीं, हे आम्हांला ठाऊक होतें. सिन्धु नदीवरच्या नावा त्यानें जमा केल्या होत्या, इतकेंच नव्हे तर कुभा [ काबूल ] नदीवर शेंकडों नावा बांधवल्या जात होत्या हेहि आम्हांला ठाऊक होतें. मला पक्की खात्री होती कीं शत्रू सर्वस्व पणाला लावून नदी पार करण्याचा प्रयत्न करील. आम्ही आमचे धनुर्विद्या विशारद या तीरावर शत्रूची वाट पहात उभे ठेवले होते. तरीहि नावा या तीराला पोंचतील हें भय होतेंच. म्हणून आम्हीं शत्रूशीं दोन हात करण्यासाठीं खड्गधारी ज़वान तयार ठेवले होते. त्याचबरोबर आम्ही तीराजवळ पानें व काटक्या यांचे ढीग घालून ठेवले होते. ज्यावेळीं पन्नास एक नावा एकदम बाणासारख्या तीराकडे धावूं लागल्या त्यावेळीं आमच्या धनुर्धारींनीं बाणांची वृष्टी सुरूं केली. परंतु तो नावांचा पूर अडवणें आम्हांला अशक्य झालें व त्यांतल्या बऱ्याचशा नावा

या तीराला लागल्या. तेवढ्यांत आमच्या कांहीं वीरांनीं एकीकडचा पानांचा ढीग पेटवून दिला. त्यामुळं शत्रू किनाऱ्यावर पाय ठेवतात तोंवर जाळ एवढा मोठा झाला कीं त्या उजेडांत त्याच्या आकृति आम्हाला स्पष्ट दिसूं लागल्या. नदीच्या वाळवंटांत बसून त्यांच्यावर तिरंदाजी करणें आमच्या धनुर्धारींना चांगलें जमत होतें. पण पार्शवांचें पाऊल मागें हटण्यास तेवढा जोर पुरेसा नव्हता. शिवाय त्यांच्यांत बरेचसे कवचधारी होते. पण किनाऱ्याकडून त्यांनीं पुढें पाऊल टाकतांच मी आमच्या सैनिकांना लढ्याचा आदेश दिला. जाळाच्या लाल उजेडांत चमकणाऱ्या तलवारी, तुमुल जयघोष, जमीनदोस्त होणारीं प्रेतें! बस्स! त्या खणाखणीच्या प्रसंगीं फक्त एवढ्याच गोष्टी दिसत होत्या. आमच्या सैनिकाना एक आणखी सोय होती. आम्ही वरच्या बाजूला होतो, आणि शत्रू खालच्या अंगाला होते. व खालून प्रवाहाच्या उलट दिशेनें त्यांना वर चढावे लागत होतें. पायाखालचे दगड उतारावरून घसरत असल्यामुळें त्यांच्या अडचणीत आणखी भरच पडत होती. मी एका टोंकापासून दुसऱ्या टोकापर्यंत दौड करीत आपल्या सैनिकाना उत्साहित करीत होतो व शत्रूच्या रांगा विरळ होत आहेत हे माझे सैनिक स्वतः पहात होते. त्याच वेळीं माझी नजर एका बलिष्ठ कवचधारी पुरुषावर गेली. तो उतारावरून नावेकडे घसरत होता. मी खाली उतरायचा निश्चय केव्हा केला हें मला कळलेंच नाही. मात्र माझ्या एवढें लक्षात आहे की दुसऱ्याच क्षणी माझ्या गदेच्या जबरदस्त प्रहारानें तो जमीनदोस्त झाला. मात्र येवढ्या अवधीत माझ्यावर चहूं बाजूंनीं पार्शव सैनिक प्रहार करीत आहेत एवढे मला दिसलें. मी मोठ्या परिश्रमानें डाव्या हाताचा उपयोग उजव्या हातासारखा करण्याची संवय केलेली होती. असा दोन्ही हातांनीं लढणारा एक माणूस दोन माणसाची बरोबरी करतो ही आचार्य बहुलाश्व यांचीच शिकवण होती. माझ्या डाव्या हातात अजूनही भाला धरलेला होता. त्याच्या अंगात कवच आहे हें लक्षात घेऊनच मी माझ्या गदेने पार्शव सेनापतीला भूमीवर पाडलें होतें. तो या सर्व सैन्याचा सेनापतीच होता— अर्थात् हे सर्व आम्हाला नंतर कळून आलें.

मी मोठ्या उत्साहानें आपली सहाधारी गदा चहुंकडे फिरवीत होतो व लांबच्या माणसांवर भाल्याची फेंक करीत होतों. मी ज्या बाजूला वळे तिकडे धुके वितळल्याप्रमाणें सैनिकांची दाणादाण होई. पण त्याच बरोबर पिछाडीकडून माझ्या कवचावर त्यांनीं प्रहारांमागून प्रहार चालविले होते. पण मला मात्र ते लोक किती आहेत व प्रहार किती होतात, हें पहाण्यास वेळ कुठें होता? शत्रुसैनिक एकामागून एक जमीनदोस्त होत असलेले पाहून माझा उत्साह दुप्पट वाढत होता. त्याचबरोबर आमच्या सैनिकांचा आवाज माझ्यापासून जवळच ऐकूं येत होता; तेवढ्यांत एक

भाला माझ्या उजव्या पोटरीमध्यें घुसला. मी स्वतःला सांवरत होतों तोंच एक देवसदृश पार्शव सैनिक आपली प्रचंड गदा माझ्या डोक्यावर भिरकावीत आहे असें मला दिसलें. मी शेवटचा प्रहार त्या इसमावर केला खरा, पण मग मात्र माझ्या डोळ्यांपुढें अंधेरी आली.

मी पहिल्या प्रथम शुद्धीवर येऊन डोळे उघडून पाहिलें तेव्हां दोन प्रहरचीं वेळ झालेली होती. मी एका झाडाखालीं पडलों आहे असें दिसून आलें. झाडाचीं हिरवीं पानें हळूं हळूं हालत होती. त्या पानांशिवाय मला आणखी काहीं दिसलें नाहीं. मी कुठें आहे या जिज्ञासेचें समाधान होत नाहीं हें पाहून मला उठावेंसें वाटलें आणि तेव्हां मला कळलें की माझ्या रोमरोमांत तीव्र वेदना होत आहेत. मी ओठ दाबून धरून तसाच पडून राहिलो. नंतर पाहिलें तों माझ्याकडे कोणीतरी वांकून पहात आहे चेहरा ओळखीचा वाटला. पण नीट लक्षांत येईना. अजून मला नीट शुद्धि आलेली नव्हती. मला वाटलें मी पितर लोकात आहे. तेथें सर्व पुरातन वीर चिर-किशोरावस्थेत राहातात असे मी ऐकलें होते.

इतक्यात माझ्या कानावर शब्द आला--

" प्रियकरा, आता जरा बरं वाटतंय का ? "

रोहिणीचा शब्द ओळखणे त्या स्थितीतही मला कठिण नव्हतें. वस्तुतः प्रथम मी जो घोटाळलों, तो तिनें शिरस्त्राण, नासिकात्राण घातले होते म्हणून घोंटाळलों. मी आपलें दुःख विसरलों व मोठ्या आनंदाने म्हणालो—

" रोहिणी, तूं कुठं आहेस ? "

" प्रिय सिंह, जिथं तुम्ही तिथं मी ! "

" मग काय पितरलोकात आपलं मीलन होत आहे ? "

" नाहीं सिंह, याच लोकांत बरं; पण जास्त बोलायचं नाहीं हं; आज तीन दिवसांनीं तुम्ही शुद्धीवर येत आहांत. थांबा, सगळी हकिगत मीच तुम्हांला सांगत्यें. सिन्धुनदीच्या ज्या घाटावर तुम्ही पार्शव सेनेच्या मुख्य दलाची दाणादाण केलीत, व जिथं तुम्हीं त्यांच्या सेनापतीला कैद केलंत, तिथून जरा वरच्या अंगाला सध्यां आहोंत आपण. "

" काय मी कैद केलं ? "

" होय, तुमच्या गदेच्या प्रहारानं तो बेशुद्ध होऊन जमीन दोस्त झाला. आणि मग आम्ही त्याला पकडून आणलं. "

" रोहिणी, तूं इथं केव्हां आलीस ? "

" थांबा, गप्प बसा पाहूं. " रोहिणीनें माझ्या डोक्यावर हात फिरवीत म्हटलें. " प्रिय सिंह, तुम्हांला अशक्तता फारच आली आहे. तुमचं नेहमीचं

तांबूस असणारं तोंड पांढरं फटक पडलं आहे. म्हणून तुम्ही बोलायचे श्रम मुळींच घेऊं नका. अन् जास्त विचार पण करूं नका. वैद्यानं बोलायची मनाई केली आहे. मी तुमची सर्व जिज्ञासा तृप्त करत्यें. तुम्हांला आठवतंय ? त्या दिवशीं मी तुम्हाला दृढ आलिंगन दिलं, नंतर तुमच्या ओठांचं व डोळ्यांचं चुंबन घेतलं मी. तुम्हीं म्हणालांत—'प्रिये, भुकेल्या लालसांना चिर तृप्ति प्रदान कर.' मी चिर-तृप्ति प्रदान केली. नंतर मी आपल्या हातांनी तुमच्या अंगांत चिलखत चढवलं. तुमच्या मस्तकावर शिरस्त्राण बांधलं. तुमच्या शरीराचीं सर्व वर्मं झाकून टाकलीं. नंतर पुन्हां एकदां मी तुम्हाला लौह-आलिंगन दिलं. नंतर तुमच्या डाव्याबाजूला तलवारीचं म्यान लटकावलं, व उजवीकडे प्रचंड गदा. नंतर तुम्ही आईचा व बाबाचा आशीर्वाद घेऊन घोड्यावर स्वार होऊन रणक्षेत्राकडे रवाना झालांत. त्याच दिवशीं मी सरस्वतीच्या कर्मान्ताकडे [ शेती ] जाण्यासाठीं बाबाजवळ आज्ञा मागितली. पण ती आज्ञा त्या सरस्वतीकडे जाण्यासाठीं नव्हती. या समोरच्या सरस्वतीकडे—महासिन्धूकडे—येण्यासाठी होती. तुम्हीं पुन्हा बोलण्याचा प्रयत्न करता आहात हं. पण थाबा; मला ठाऊक आहे तुम्हाला काय बोलायचं आहे तें. तुम्ही माझे आभार मानणार आहात, होय ना ? पण इतक्यात नको; आता तुम्हीं आपली जिज्ञासाच तेवढी तृप्त करून घ्या."

जराशा भावनोत्कंठेमुळे मला ग्लानी आली. त्यावरून माझ्या दुर्बलतेचे स्वरूप कळलें मला. म्हणून मी रोहिणीच्या लौहाच्छादित मुखाचा यत्रतत्र दिसणारा अरुणिमा न्याहाळीत स्वस्थ पडलों. तिने आपली हकीगत पुढे चालू केली—

"मी हें कवच मिळवून ठेवलं होतं व हत्यारांची जमवाजमवहि केली होती. बाल रोहितवर स्वार होऊन मी त्याच दिवशी रात्री सिन्धुनदी तटावर जाऊन पोंचल्यें. डोंगराच्या गुहेंत तुमच्या घोड्याच्या गर्दींत मी आपला घोडा सोडून दिला. याच वेळीं मला लढाईचा आवाज ऐकूं आला. त्या हलकल्लोळांत देखील तुमच्या गंभीर गर्जना ओळखायला मला वेळ लागला नाहीं. मी तेथून धावत आल्ये, पण तुमचा आवाज बंद झाला होता. किनाऱ्याच्या वरच्या अंगाला उभी राहून मी पाहूं लागल्यें. आगीच्या प्रकाशांत एकमेकांना प्रहार करणारे वीर मला दिसले. आणि खालीं पाण्यांत नावा पण दिसल्या. त्याच वेळीं मी दोन विशाल सेना-नायकांना एकमेकांवर वार करतांना पाहिलं. काय करायचं तें ठरवायच्या अगोदरच तुम्हांला पार्शवांनीं घेरलेलं पाहिलं. मी आपला भाला सरसावला व लढणाऱ्या शत्रुसैनिकांची फळी फोडून मी खालच्या बाजूस धांवल्यें. पण मला उशीर झाला. तिथं जातांच पाहिलं तों तुम्हीं बेशुद्ध झालेल्या पार्शव सेनापतीच्या शेजारीं पडलां होतांत. मीं

तुमच्यावर प्रहार करणाऱ्या शत्रुसैनिकांवर मोठ्या चलाखीनं भाला चालवूं लागल्यें. तितक्यांत आमचे बरेचसे सैनिकहि तिथं येऊन पोंचले.

"पार्शवांचा सपशेल पराजय झाला. या एकाच ठिकाणीं पार्शव हरले असं नव्हे तर सगळीकडेच ते पराजित झाले. फक्त एका ठिकाणींच तेवढे नदीपार होऊन ते बरेच आंत घुसले होते. परंतु मद्र-वीरांनीं तिथं त्यांची एवढी दाणादाण केली कीं त्यांना माघार घ्यायची देखील मुष्किल झाली. आतांपर्यंतच्या बातमीवरून असं कळलं कीं पार्शव शासकाची तयारी फार मोठी होती तरीहि तो सपशेल पराजित झाला. त्याचं फारच थोडं सैन्य जिवानिशी परत जाऊं शकलं. त्यांचा मुख्य सेनापती मज्ददात् तुमच्या गदेनं जखमी होऊन आमचा बंदी झाला आहे. आमच्या फौजा सिन्धुनदीच्या पलीकडे जाऊन यावेळीं पुष्कलावती [ चारसद्दा ] च्या बाजूला शत्रूच्या राहिलेल्या सैन्याचा पाठलाग करीत आहेत. कुभा [ काबूल ] व सुवास्तु [ स्वात ] या नद्याच्या काठीं राहणारे आमचे बन्धू या कामी आम्हांला मदत देत आहेत. आपले मुख्य सेनापति प्रियमेध आज सकाळी तुम्हाला पाहून गेले. ते म्हणत होते, 'तक्षशिला वैशालीची कायमची ऋणी राहील.' त्यानी तक्षशिलेला पण तसं लिहून पाठवलं आहे. तुमचा बचाव करतांना कपिलला फार मोठी जखम झाली आहे."

"तक्षशिला वैशालीची ऋणी राहील." या शब्दाचा प्रतिध्वनी माझ्या कानांत पुष्कळ वेळ गुंगत होता. वैशालीपासून ६० (साठ) योजनें लांब राहूनहि मी तिच्याकरतां कांहींतरी करूं शकलो याचा मला अभिमान वाटला. व त्याच्या प्रभावानें माझे सारे शरीर पुलकित झाले. माझ्या जखमांवर सर्वांत गुणकारी औषध असेल तर हेंच. खालीं मान घालून बसलेल्या रोहिणीकडे मी पुन्हां टक लावून पाहूं लागलों. मी जरा भीतभीतच म्हटलें—"प्रिये रोहिणी, मी जास्त बोलत नाहीं. पण या शिरस्त्राणाची जरूर नसेल तर तें काढलंस तर बरं होईल."

रोहिणीनें शिरस्त्राण काढून ठेवले. माझी सुधारत चाललेली प्रकृति पाहून तिला झालेला आनंद तिच्या चेहऱ्यावर विलसत होता. मी विचार करूं लागलों: ही दिसायला कोमल असली तरी हिच्या अंगीं केवढें साहस आहे! अशा स्त्रिया ज्या जनपदामध्यें असतील त्याला कोणीहि दास करूं शकणार नाहीं.

रोहिणीनें एक चषक [ प्याला ] कापिशेयी सुरा माझ्या ओंठाला लावली. त्या हातांमुळें ती जास्तच गोड लागत होती. तिच्या डोळ्यांकडे पहातां पहातां माझ्या मनांत तऱ्हेतऱ्हेचे विचार येऊं लागले. हळूं हळूं पापण्या जड होऊं लागल्या. अन् मग मला झोंप लागली.

माझ्या शरीरावर, विशेषतः कमरेच्या खालीं, पुष्कळ व खोल जखमा झाल्या होत्या. त्यांना मलमपट्टी करून घट्ट बांधून टाकलें होतें. त्यामुळें मला थोडीशी सुद्धां हालचाल करतांना फार त्रास होई. त्या स्थितींत मला लगेच तक्षशिलेला नेणें धोक्याचें होतें. म्हणून तेथून जवळच असलेल्या सीमापालाचे घरी मला नेलें. तेथें मला किती दिवस रहावें लागलें व किती त्रास झाला याची मला आतां आठवण नाहीं. मला स्मरण आहे तें सदा माझ्याजवळ असलेल्या रोहिणीच्या हंसतमुखाचें व तिच्या हातून माझ्या ओठीं लागलेल्या अंजीरवर्णी मधुर सुरेचें. मनुष्याचा स्वभाव तरी कसा असतो पहा! तो आगीच्या डोबामधूनहि शीतल जागा शोधून काढतोच. दारुण परिस्थितींतहि सुख मिळवतोच. मी मृत्यूच्या दाढेतून नुकता कुठें मोकळा झालों होतों. माझ्या देहावर सगळीकडे जखमांचे वण होते. जसजसे दिवस जात होते तसतसा मी चागला सुधारत होतो. पण माझी मात्र इच्छा ही कीं मी असेंच पलंगावर पडून राहावें व रोहिणी अशीच माझ्याजवळ बसून राहावी.

आठवड्याच्या आतच आचार्यहि माझ्या समाचाराला आले. तीन आठवड्या-नंतर मी शिबिकेंतून तक्षशिलेला रवाना झालो. दूत सैनिक व रोहिणी घोड्यावरून माझ्याबरोबर येत होती.

दारांतच आईनीं स्वागत केले. त्यानीं माझ्या कपाळाचें चुंबन घेतलें. तेव्हां त्यांचे डोळे भरून आलेले मला दिसले. त्यांनीं इतकेंच म्हटलें—

"वीरपुत्रा! तुझं स्वागत असो."

## (८)

# उत्तर कुरूंतील युद्ध

माझ्या जखमा पूर्णपणें बऱ्या होण्यास तीन महिने लागले. कपिल हा तक्षशि-लेंतील तरुण. यानेंच रोहिणीच्या बरोबर स्वतःचे प्राण धोक्यांत घालून माझा जीव वांचवला होता. आतां तो माझा जिवलग मित्र झाला होता. आमच्या वैशालीय बंधूं-नीहि आपल्या सेनानायकांकडून वाहवा मिळवली होती. तेहि माझ्यासारखेच जखमी झाले होते हें ऐकून मला फार अभिमान वाटला. मी बिछान्यावर पडून होतों तेवढ्या दिवसांत माझ्याजवळ नेहमीं राहणाऱ्यांत रोहिणी नंतर दुसरा नंबर कपिलचा होता. कपिलशीं बोलतांना फार आनंद होई. त्यानें पुष्कळ देश पाहिले होते व तो

बहुश्रुतहि होता. त्यानें कपिशा [ कोह-दामन, अफगाणिस्तान ] उत्तरकुरू [ वक्षु नदीच्या वरचा प्रांत ], पश्चिम मद्र [ पश्चिम इराण ], बबेरू [ बाबिलोनिया ], इत्यादि देशांचा प्रवास केला होता व सार्थांबरोबर मुशाफरी करतांना कित्येक संकटांना तोंड दिलें होतें. एक दिवस मी कपिलला विचारलें—

" बंधु कपिल ! त्या देशापैकीं तुम्हांला अधिक समृद्ध व अधिक सुखी कोण दिसलं ? "

" मित्रा ! तक्षशिला सोडूनच विचार करायला पाहिजे. तक्षशिलेसारखं सुव्यवस्थित शासन मला तरी कुठंच दिसलं नाहीं. आमच्या गणांत चोर व भित्रे यांचा मागमूसहि नाहीं. आणि याच्या उलट त्या देशांतून त्यांचीच संख्या फार आहे. पण हं, उत्तर-कुरूंतील नर-नारींनी आपलं शौर्य व औदार्य टिकवलं आहे. पार्शवांनीं त्यांना परतंत्र करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. पण कुरूंच्या डोंगराळ प्रदेशांत राहणारे त्याच्यासारखे लोक जीवात जीव असेपर्यंत परतंत्र होणं अशक्य आहे. "

" आणि संपत्ति व समृद्धि ? "

" संपत्ति–समृद्धीचा अर्थ जर जीविताला आवश्यक अशा सगळ्या गोष्टींची सुलभता असा केला, तर उत्तर-कुरू हा अतिशय संपन्न व समृद्ध देश आहे. इथले लोक मुख्यतः मृगया व पशुपालन यावरच गुजारा करतात. कृषि फारच थोडी आहे. उत्तर-कुरूंच्या डोंगरातून अकृष्टपच्य [ जंगली ] गहूं व द्राक्षं होतात. ती द्राक्ष कापिशेयी द्राक्षासारखी मोठी व गोड नसतात. तरी पण तीं पुष्कळ प्रमाणांत होतात. मात्र तेथील लोक चामड्याचे कपडे वापरतात व गाय, मेंढे, घोडे यांचं मास खातात. "

" घोड्याचं मास ? अन् रोजच्या जेवणांत ? "

" होय, घोड्याचं तर गाईच्या पेक्षा जास्त. अन् ते घोडे पाळतातहि जास्तच. आमच्याकडे जें घोड्याचं मास वर्ज्य केलं आहे ते तरी त्याच्या दुर्भिळतेमुळंच. वसंताच्या सुरवातीला तुम्हीहि त्याचं मांस खाल्लं असेलच, नाही का ? "

" हो, खाल्लं तर. पण कपिल, पूर्वेकडे घोड्याचं मांस फक्त यज्ञांतच खातात. आणि तो यज्ञहि मोठ्या खर्चाचा असल्यानं कोणी-कोणी राजेच तो करूं शकतात. अन् आम्ही गणवाले तर तो करीतच नाहीं. "

" मित्रा, उत्तर-कुरूमध्ये आणखी एक विशेष गोष्ट आहे. ती म्हणजे तिथं 'मी' व 'माझं' ही भावनाच नाहीं. "

" लालूचहि नाहीं ? "

" लालूच सुद्धां नाही. आणि तिची जरूरीहि नाहीं. राजांच्या शासनामध्यें राजाज्ञेवरच सर्व प्रजेला चालावं लागतं. पार्शव शासानुशासाची [ शहानशहाची ]

आज्ञा यवन समुद्रापासून सिन्धुनदीच्या किनाऱ्यापर्यंत अनुल्लंघनीय आहे. आम्हीं गणतंत्रवाले कोणा एका व्यक्तीला आपला स्वामी मानायला तयार नाहीं खरे; परंतु आमच्या इथंहि कोणाजवळ जास्त शेती आहे कोणाजवळ कमी. कोणाजवळ जास्त जनावरं आहेत तर कोणाजवळ कमी. आम्ही व्यापार करूनहि आपली संपत्ति वाढवूं शकतों. परंतु उत्तर-कुरूंत ही असमानता कोणी मनातहि आणीत नाहीं."

"म्हणजे मनांतहि आणायचं नाहीं ? मग काय तिथल्या एका माणसाला दुसऱ्या माणसापेक्षां जास्त धन बाळगता यायचंच नाहीं ?"

"कोणाची अलग-अलग अशी संपत्तीच नाहीं. तेथील लोकांचं सर्व कांहीं एकत्र—समाईक—आहे. त्यांचं मुख्य धन म्हणजे पाळलेली किंवा मृगयेनं मिळवलेलीं जनावरं. त्यांत सर्वांचे सारखे श्रम खर्ची पडलेले असतात. व उपभोगांत सर्वांना सारखा अधिकार असतो."

"म्हणजे आळशी व मेहनती यांना सारखाच लाभ, असाच नाहीं का याचा अर्थ ? असं असलं तर आळशीपणा समाजांत भलताच बोकाळेल."

"मित्रा, मुळींच नाही. त्यांचा स्वभावच असा बनला आहे कीं कोणीहि सामर्थ्य असताना कामचुकारपणा करीत नाही. आमच्या इथं खाणं झाल्यावर हात धुण्याची चाल आहे. मला वाटतं वैशालीतहि तशीच असावी."

"हो तर, इथल्याहून जास्तच आहे. कारण तिथं चामड्याची कंचुकं वापरण्याइतकी थंडी कधी पडतच नाही."

"अन् मित्र सिंह, आपण हेहि पहातों की कितीहि आळशी मनुष्य असला तरी जेवण झाल्यावर हात धुण्याचा अंगचोरपणा करत नाही पण ही चाल सर्व देशातून नाहीं. कम्बोज [ काफिरिस्तान ] मध्ये हात धुण्याची गरज आहे असं मानीत नाहींत. तिथं खाल्ल्यानंतर हात कंचुकाला [ आगरख्याला ] पुसतात."

"मग तुमचं म्हणणं काय, जर लहानपणापासून तशी संवय झाली तर कोणीहि कामचुकार होणार नाहीं, असंच ना ?"

"होय, मला वाटतं ज्याच्या त्याच्या योग्यतेनुसार जर काम घेतलं जाईल व कामचुकारपणा वाईट समजला जाईल, तर तसं वर्तन कोणीहि करणार नाही."

"जाऊं द्या, तुम्ही स्वतःच उत्तर-कुरूचे लोक पाहून आला आहांत, तेव्हां शंका घेण्यास जागाच नाहीं. पण तरीहि मला तो देश अद्भुतसा वाटतो."

"अद्भुत ! प्रथम तर डोळ्यावर विश्वासच बसेना. उत्तर-कुरूच्या हद्दींत पाय ठेवणंच फार कठीण आहे."

"कठीण ! कां बरं ?"

"ते दुसऱ्या लोकांना आपल्या देशांत येऊं देत नाहींत. त्यांना वाटतं आमची

जमीन व हवा हे लोक बिघडवून टाकतील. उत्तर-कुरूच्या हद्दींत जायला फार आकुंचित अशा पाऊलवाटा असून त्या भयंकर अवघड घाटांतून गेलेल्या आहेत. आणि शिवाय त्या वाटांवर निरंतर पहारा असतो. कोणी लपून छपून जाण्याचा प्रयत्न करील तर त्याला मृत्यूशिवाय दुसरा दंडच नाहीं."

"मग तुम्ही कसे गेलांत ?"

"योगायोगच म्हणायचा. पार्शवानीं पश्चिम-गंधार गणाचा पराजय करून त्याला परतंत्र बनवलं, तेव्हांपासून माझ्या व हरएक गांधाराच्या हृदयात पार्शवां-बद्दल जबरदस्त द्वेषाची आग भडकली आहे. मी व्यापारी सार्थांबरोबर वक्षुनदीच्या काठीं गेलों होतों. त्यावेळीं मी ऐकलं कीं, बाल्हिक [ बलख, गांधारच्या शेजारचा प्रदेश ] चा क्षत्रप उत्तर-कुरुवर आक्रमण करण्याच्या विचारांत आहे. मी उत्तर-कुरू संबंधी जे कांही ऐकलं होतं, त्यावर माझा विश्वास बसत नव्हता. पण ऐकली होती प्रशंसाच : उत्तर-कुरुंत देवांचा अधिवास आहे, पृथ्वीवर तेवढं एकच स्थान आहे कीं जिथं देव अजूनहि सदेह वास करतात, ते हवेत उडूं शकतात, त्याच्या देशाच्या भोवताली पाच योजनेपर्यंत अशी कांही जादू आहे की त्या हद्दीच्या आंत गेलं तर मनुष्याचा वृक्ष बनतो. मित्रा, ही तर तुझी खात्री आहे ना की असल्या गोष्टीवर विश्वास ठेवायला मी काहीं लहान मूल नव्हे. पण मला त्या विश्वास अविश्वासाशी कांही कर्तव्य नव्हतं. मला एवढंच दिसत होतं कीं हे नीच पार्शव आणखी एका स्वतंत्र देशाला पराधीन करूं पहात होते. मी निश्चयच केला कीं उत्तर-कुरुनिवासीना मदत करून गंधार देशाच्या गुलामगिरींबद्दल पार्शवांचा सूड घेईन. मी दोन भाते तीक्ष्ण बाणानी भरले व आणखी शेकडो फाळ वेगळे बांधून घेतले मला हें आधीच ठाऊक होते की वक्षु [ आमू दर्या ]नदीच्या तीरावर फक्त मुंजीचे [ एक गवत ] जंगल आहे. मी खड्ग, शल्य, इत्यादि शस्त्रें नीट सांवरून घेतली. एक सुकवलेली कालवड बगलेत लटकावली. आणि कम्बोजच्या एका उत्तम पहाडी घोड्यावर बसून वक्षु नदीच्या कांठाकांठानं व नंतर वरच्या बाजूला गेलो."

"काय एकटाच ?"

"होय एकटाच. अन मी खड्गाशिवाय इतर सर्व हत्यारं लपवून ठेवलीं होतीं."

"अज्ञात भूमीकडं अशा तऱ्हेनं जाणं ही मोठी साहसाची आणि धैर्याचीच गोष्ट आहे."

"आणि निर्बुद्धपणाचीहि. आणि हें मी मान्य पण करतों. पण आयुष्यांत कित्येक वेळां मनुष्य अशा तऱ्हेच्या निर्बुद्धपणाच्या गोष्टी करीत असतो. तूं सुद्धां

सिंह, त्या दिवशीं शत्रुपंक्तींत घुसून एकट्यानं मज्ददातवर हल्ला केलास ही कांहीं मोठी शहाणपणाची गोष्ट नव्हती."

"होय, हें मला कांहीं मर्यादेपर्यंत मान्य आहे. सेनानायकानं आपलं डोकं शांत ठेवलं पाहिजे हें मलाहि कळतं. आणि त्यावेळीं मी या बाबतींत कमजोर ठरलों हेहि कबूल."

"मग तसंच समज. शिवाय मी कांहीं कुठल्या सेनेचा संचालक नव्हतों. जास्तींत जास्त म्हणजे सार्थाच्या सहा पुढाऱ्यांपैकीं मी एक होतों, एवढंच. आम्ही सर्वजण बरोबरच व्यापाराकरतां निघालो होतों. जमीन अज्ञात होती हें खरं. पण मला हें ठाऊक होतं की वक्षूच्या वरच्या बाजूला जंगलात डोंगराचे जवळ फिरते गुराखी राहात असतात. आणि त्यांना उत्तर-कुरूच्या देवांचं दर्शन होत असतं. मी कादली मृगाचं चमकदार मऊ चर्म कित्येक वेळा बाल्हीकच्या व्यापाऱ्यांजवळ पाहिलं होतं. विशेष तपासाअंती हेहि कळलं होतं कीं फिरत्या गुराख्यांच्या जमातीचं वसतिस्थान जो मुंजवान पर्वताचा प्रदेश, तिथूनच हें चर्म येतं. मला योगायोगानं त्या जमातींतला एक मनुष्य भेटला. त्यानंहि त्या देवलोकाच्याच गोष्टी सुरू केल्या. वासराचं कोमल मांस व त्याच्याबरोबर अंजिरी रंगाची कापिशेयी सुरा पिण्यास मी त्याला बोलावलं. थोड्याच वेळांत आम्ही चिर-मित्र बनलो. नंतर त्यानं सांगितलं कीं हे चर्म उत्तर-कुरूहून येतं. आम्ही त्यांना लोखंड देतो व ते आम्हाला हे चर्म देतात. लोखंडाशिवाय ते आमच्या कडून दुसरं काहीच घेत नाहींत."

"मग तुझी खात्री झाली असेलच की तिथं देव राहात नसून मानव राहातात."

"हो हो, तर. नाही तर मित्र सिंह! देवांना मानवांची काय जरूरी? मी त्या फिरत्या गुराख्यांच्या वस्तीकडे चाललो. क्षत्रपाचं सैन्य दुसऱ्या रस्त्यानं चाललं होतं. पण मी मात्र त्यांच्यावर नजर ठेवून चाललों होतो. पुढली हकिगत मी थोडक्यांत सांगतों. पार्शव सैनिक डोंगरावर पोंचले. त्या दिवशी मी एका मौजवत गोष्ठांतच मुक्काम केला. त्याच दिवशी कांही पार्शव सैनिकांनीं गोष्ठांतील स्त्रियांवर बलात्कार करण्याचा प्रयत्न केला. शासानुशासाची या विरुद्ध सक्त ताकीद आहे. पण युद्धाच्या धामधुमीत दुसऱ्याच्या भाकरीवर तुटून पडणाऱ्या सैनिकांनी त्याची काय कदर असणार? मी त्या दिवशीं त्यांना तक्षशिलेचं पाणी दाखवलं व सैनिकांना हत आहत करून त्या स्त्रियाचा बचाव केला. ते पाहून मौजवतांना फार आनंद झाला व त्यांचा माझ्यावर विश्वास बसला. आम्ही चटकन जनावरांना नदीपार नेलं व रातोरात अनेक योजनं मजल मारून दूरच्या घोर अरण्यांत घुसलों. मी पार्शवांचा किती कट्टा द्वेष्टा आहे व त्यांच्याविरुद्ध उत्तर-कुरूंना मी

मदत कां करूं इच्छीत होतों हें मी आतां मौंजवतांना समजावून सांगितलं. यावर प्रथम तर त्यांनीं पहिल्यासारखी देवांच्या कथेची पुनरावृत्ति केली पण जेव्हां त्यांना मला खऱ्या गोष्टी ठाऊक असल्याचं कळलं तेव्हां त्यांनीं हितकर्त्याच्या नात्यानं सांगितलं कीं उत्तर-कुरूचे लोक तुम्हांला पहातांच मारून टाकतील. मी मृत्यूचा उपहास करून म्हणालों—'मरणं काहीं वाईट नाहीं. परंतु पांच तरी पार्शवांना मारल्याशिवाय मी मरण मुळींच पत्करणार नाहीं.' तेव्हां त्यांनीं मला वक्षूच्या डाव्या तीरावरील गुप्तस्थानापर्यंत पोंचवण्याचं कबूल केलं. याच ठिकाणी लोखंड व कादलीमृगचर्म यांच्या देवघेवी चालत असत."

"तर मग मित्रा ! देवांच्या भूमीला तुझे पाय लागले एकदांचे."

"होय, आणि त्या बरोबरच त्यांचं देवपणहि माझ्या मनांतून नष्ट होऊं लागलं. थोडंसं पुढं जाईपर्यंत घोड्याचा उपयोग झाला. नंतर आम्हांला आपलं सामान मेंढ्यांवर लादून पायी चढ चढावा लागला. जिथं मेंढ्या जाऊं शकत नाहींत तिथं माणूसहि जाऊं शकत नाही हे उघडच आहे. मौजवत लोकहि आमच्या सारखेच गोरे व बलवान असतात. पण ते न्हाण्याधुण्याचा विशेष विचार करीत नाहीत. आम्ही एक आठवडाभर वक्षूच्या वरच्या अंगाकडील कांहीं उपनद्या पार करीत गेलों. तिथं वक्षूचा प्रवाह अगदीं अरुंद पण जोरदार होता. आणि दोन्ही तीरांवरून पुढं आलेल्या दोन दरडी जणूं काय एकमेकींना चिकटायला आल्या आहेत असं वाटत होतं. त्यांतली उजवीकडची दरड जास्त उंच होती. वाटाड्यानं सांगितलं कीं 'बस्स ! इथंपर्यंतच आम्हाला ठाऊक आहे. कुरू लोक याच दरडीवर लांकडं टाकून अलीकडे येतात व लोखंड बदली घेऊन जातात. या दरडीपलीकडे जर आम्ही गेलो आणि त्यांच्या हातीं सांपडलों तर मृत्यू ठेवलेलाच.'

"मला असं दिसून आलं की पार्शव वक्षूच्या उजव्या किनाऱ्यावर अजून फार मागं आहेत. आतां मला पुढील कार्याची रूपरेषा ठरवायची होती. निरोप घेतांना मौजवत वाटाड्यानं मला अशी धोक्याची सूचना दिली की 'तुम्ही शेकोटी पेटवूं नका. नाहीं तर धूर पहातांच देव आपल्या कोपाग्नींत तुम्हाला भस्म करून टाकतील.' माझ्या जवळ सुकं मांस पुष्कळ होत व जंगलात पिकलेल्या द्राक्षांचे घोंसच्या घोंस लटकत होते. उपाशी मरण्याची भीति नव्हती."

"दुसऱ्या दिवशीं मी पहाटे उठून लांब जाऊन एका मोठ्या शिळेच्या आड बसून किनाऱ्याकडे पाहूं लागलों. त्यावेळीं तिकडे काहीं तरी हालचाल होत आहे असं वाटलं. जरा निरखून पाहिलं तों तीं माणसं आहेत असं दिसलं. त्यांचे कपडे हिरव्या रंगाच्या चामड्याचे होते व ते डोंगराच्या हिरवळींतून मुळीच वेगळे दिसत नव्हते. त्यांच्या मस्तकांवर कान-टोप होते व अंगावरच्या चामड्याच्या चादरी जान-

ल्यासारख्या उजवा हात मोकळा ठेवून बांधलेल्या होत्या. त्यांच्या डाव्या खांद्यावर त्याच हिरव्या रंगाचा भाता व हातांत धनुष्य होतं. त्यांच्या पायांत जोडे पण होते. ज्यांच्या बाजूनं पार्शवांशी लढण्याकरतां मी इथं आलों तेच हे देव-देवी आहेत असं मला वाटलं. ते मधून मधून नाकपुड्या उडवून वास घेत आहेत व कान टवकारून कानोसा घेत आहेत असं मला दिसलं. मित्रा, खरं सागायचं तर मला भीतीच वाटली. माझ्या मानवतेचा तर त्यांना वास आला नसेल? मी दगडाला अगदीं चिकटून पडून राहिलों. मुंग्यांच्या रांगेप्रमाणं ते खालच्या बाजूला जात असलेले मला दिसत होते.

" यावरून मी तेव्हांच ओळखलं कीं यांचा पहिला मोर्चा आणखी खालच्या बाजूला आहे. रात्रीचा अंधार पडला, तेव्हां मी आपलीं सर्व हत्यारं व काहीं मांसाचे तुकडे बरोबर घेऊन खालीं उतरण्यास-नव्हे सरकण्यास-सुरवात केली. किती वेळ लागला न कळे पण मी एक योजन खालीं जाऊन पोंचलों. तेथून जवळच वक्षूच्या खळखळत्या प्रवाहालगत शेंकडों हात उंच अशी कडातूट टेकडी होती. देव तिच्या मागल्या बाजूला आग पेटवून मांस भाजीत होते. त्या मासाचा वास माझ्यापर्यंत येत असल्यामुळं माझ्या तोंडाला एकसारखं पाणी सुटत होतं. मौजवताचं ग्राम सोडल्यानंतर मला आगीचं दर्शन आजच झालं."

" वाळक्या मांसाचे कित्येक घांस खाल्ले व जवळच्या झऱ्याचं पाणी पिऊन एक आड जागा शोधून सकाळ होण्याची वाट पहात पडून राहिलों. थोडा अंधार असतांनाच मी उठलो व दिवसभराचा आधार व्हावा म्हणून थोड मास खाल्लं. आणि काल जिथं देवानीं आगटी पेटवली होती तिकडे पाहूं लागलों. हिरवी वस्त्रं धारण केलेले काहीं लोक उजाडतांच त्या खड्या टेकडीच्या कडेकडेनं पालींसारखे सरपटत जात होते. ते आपल्या साथीदाराना कांहीतरी सागत होते पण मला त्याचे शब्द अस्पष्ट ऐकूं येत होते. देवाची भाषा आमच्या तक्षशिलेंतल्या भाषेपेक्षा वेगळी आहे. पण मला ती समजते. चांगलं उजाडल्यानंतर मला देव-देवीचे चेहरे स्पष्ट दिसूं लागले. त्यांच्या हावभावांवरून ते भयभीत झालेले दिसले."

" दोन प्रहरच्या सुमारास पार्शव सैनिकांची रांग दृष्टीस पडली. रस्ता इतका अरुंद होता कीं एका वेळीं एकच मनुष्य त्यावरून जाऊं शकत होता. त्यांना टेकडीजवळ येतांना पाहून माझ्या हृदयाला कंप सुटला. जरा वेळ थांबून मी पाहूं लागलों तों त्यांच्यातील एकानं जोडा काढून कमरेला खड्ग लटकावून त्या टेकडावर सरकत सरकत चढण्यास सुरवात केली. त्याच्या पायांची चाहूल ऐकून देव आपले खड्ग व धनुष्य सावरून तयार बसले. ज्या खडबडीत भागावरून हे प्राणी रांगत होते तो टेकडीचा तिरपा भाग असा होता कीं देवांच्या तोंडापुढला दगडाचा कोपरा ओलांडून

जेव्हां ते पुढें येतील तेव्हांच देवांच्या दृष्टीस पडतील. अन् म्हणून त्या संक-टाची कल्पना माझ्या इतकी देवांना नसावीसं दिसलं. टेकडीची वरची थोडी चढण फारच अवघड होती. ती फारच सावकाशीनं चढावी लागे. बाकीच्या भागावरून मात्र दौडत देखील जातां येत होतं. पार्शवांना अडवणाऱ्या देव-देवींची संख्या दोनशेंहून जास्त नसावी. पण पार्शवांची संख्या दोन हजारांहून जास्त माझ्या समोरच होती. मी विचार करूं लागलों : इथं अटकाव न होता पार्शव जर पुढं गेले तर मात्र ते आपल्या संख्याबळाच्या जोरावर देवाचा पराभव यशस्वी रीतीनं करतील.

" दाट झाडींत बसून मी आपलं धनुष्य सरसावलं, व त्या उतारस्थळावर लक्ष ठेवून राहिलों. जो कोणी पैलतीरावरून तिथं पोंचेल तो माझ्या बाणाच्या अचूक नेमानं खालीं वक्षूच्या प्रवाहांत चिर-शांती घेई. शत्रू-सैनिक टेकडीच्या कोंपऱ्यापर्यंत आला कीं मी शरसंधान करीत असे. म्हणजे मग असें होई कीं तिथल्या निमुळत्या भागावरून खालीं घसरून पडणारा शत्रू फक्त मला व देवमंडळींनाच दिसूं शके. एका मागून एक असे पार्शव सैनिक खालीं पडत होते. असे कित्येक तास गेले. पण पाठी-मागच्यांना कांही एक शंका आली नाहीं. तिकडे देवहि पडणाऱ्या सैनिकाचं रहस्य न कळल्यामुळं आश्चर्यानं थक्क झाले होते. पण सर्वांच्या आधीं तें रहस्य कुणाला उम-गलं असेल तर तें देवानांच मी ज्या झाडीत लपून राहिलों होतों तिकडे दृष्टी लावून राहिलेल्या देवांच्या नजरामध्यें क्रोध नसून स्नेह होता आणि हें पाहून मला आनंद वाटला. कमीत कमी निदानपक्षी देवमंडळी मला आपला सहाय्यक तर समजतातच हें लक्षांत आल्यावर मला समाधान वाटलं.

" दोन प्रहर होईपर्यंत खालून पार्शवांना ही बातमी मिळाली होती कीं पन्नासां-हून अधिक पार्शव वीराचीं प्रेतं वक्षू मधून खालच्या बाजूला वहात जात आहेत. आपले वीर देवाच्या बाणाना बळी पडत नसून माझ्या बाणाना बळी पडत आहेत हे त्याना अद्याप ठाऊक नव्हतं त्यांना वाटलं देवानीच त्याना मारलं. आतां त्यांच्या पुढाऱ्यानं त्यांना सरकण्या ऐवजीं धावण्याचीं आज्ञा केली. त्याचा परिणाम फार चमत्कारिक झाला. धांवत वर येणाऱ्या माणसातून अर्धीं माणसं खालीं वक्षु नदींत पडत होतीं व अर्धीं इतक्या लौकर त्या अडचणीच्या जागेंतून पलीकडे जात होतीं कीं त्यांना मारण्यास मी एकटा अपुरा पडलों. पण पुढं जाताच त्यांच्यावर देव-देवी मंडळी तुटून पडण्यास तयारच होतीं. आतां मी निवडक लोकांनाच तीर मारीत होतों. बाकीच्यांशीं देवांना झुंजावं लागे. संध्याकाळच्या सुमारास मला हें स्पष्ट दिसलं कीं इतके मेल्यानंतरहि पार्शवांची संख्या पुष्कळच आहे व त्या ठिकाणीं लढणंहि शक्य नाहीं.

" अंधेर पडल्यावर मी आपली गुप्त जागा सोडून वरचा रस्ता पकडला. देवांनींहि माझाच मार्ग स्वीकारला. पार्शवांनीं जरी त्या ठाण्याचा ताबा घेतला तरी आतां अंधेर झाल्यामुळं त्यांचीं माणसं वर येऊं शकत नव्हती. अन् म्हणूनच त्यांना देवाचा पाठलाग करणंहि शक्य नव्हतं.

" मी पुन्हां त्या दोन टेकड्यांमधील लहानशा वक्षु धारेकडे गेलों. त्यांपैकीं एका टेकडीचे आडून कोणी तरी एक मनुष्य माझ्या पुढं येऊन उभा राहिला. मला जरा भीति वाटली. माझ्यावर देव-दंड पडणार की काय असं वाटलं. पण थोड्याच वेळांत त्या मनुष्यानं माझ्या खांद्यावर हात ठेवून म्हटलं- ' मानवा ! भिऊं नको, देव तुझ्या मित्रत्वाचा स्वीकार करीत आहेत. "

" ' मी हें मोठं भाग्य समजतों. नीच पार्शवांना देव-लोकांच्या विरुद्ध चढाई करतांना पाहून मी देवाना मदत करण्याच्या उद्देशानं हा प्रवास केला. पण मला आतापर्यंत वाटत होतं की, मी देवाच्या उपयोगी न पडतां त्यांच्याच हातून मारला जाईन. '

" ' होय, तें खरं आहे. आम्ही देव कोणालाहि आपल्या भूमीवर पाय ठेवूं देत नाहीं. मानव येऊन आमच्या देव-भूमीत आपले दोष पसरवतील, या भीतीनं आम्ही कोणाहि मानवाला जिवंतपणी आमच्या देव-भूमीला स्पर्श करूं देत नाही. परंतु तूं आपल्या आचरणानं देवांच्या मित्रत्वाची लायकी सिद्ध केली आहेस. म्हणून आम्ही तुझं देव-भूमीत स्वागत करतों. '

" मी विचारल्यावरून त्या व्यक्तीनं आपण देवांचा सेनापति—किंवा इंद्र म्हणूं पाहिजे तर—आहों, व आपलं नांव मघवान आहे असं सांगितलं. मी मघवानला सांगितलं कीं पार्शवाची संख्या पुष्कळच जास्त आहे; आतापर्यंत त्याचं फार थोडं सैन्य इथं येऊन पोचलं आहे. इंद्रानं मोठ्या आत्मविश्वासानं सांगितलं—' हा पहिला मोर्चा अगदीच कच्चा होता. पुढचे मोर्चे एका पेक्षा एक प्रबळ आहेत. हो, पण एक सांगतों; पार्शवाना नुसतं पराजित करून भागणार नाही, तर त्याच्यापैकीं एकहि मनुष्य जिवंत परत जातां उपयोगी नाही. आम्हाला पार्शवाबद्दलच काय पण कुठल्याहि मानव जनाविषयीं कांहीच ज्ञान नाहीं. देवभूमीतून बाहेर जाणं कोणालाहि क्षम्य नाहीं. म्हणून तूं पण याबाबतींत आमचं मार्गदर्शन कर. "

" इंद्राच्या बोलण्यांत एक अजब प्रकारची गोडी जाणवली. त्याची भाषा आमच्या भाषेशीं पुष्कळच जुळत असली तरी तींत आमच्या भाषेपेक्षां शब्दाचं भांडार कमी होतं. शब्दाच्या उच्चारांतहि फरक होता. आणि त्यांत संगीताच्या स्वराचं मिश्रण असावं असं वाटे. मला देवांची भाषा समजण्यास अडचण वाटली नाहीं. कदाचित मला पुष्कळ आर्य-भाषा माहीत असल्यामुळं ती कठीण वाटली नसेल.

मी इंद्राला म्हणालों—'आतां इतक्यांत दुसरं कांहीं काम नसेल तर आपण शत्रूंचा प्रतिकार करण्यासंबंधीं विचार करूं या.' सर्वांत महत्वाची हीच गोष्ट आहे असं इंद्राचंहि मत पडलं. भाषा व वेष या दोन्हीं बाबतींत अगदीं साधासुधा असूनहि इंद्राच्या अंगीं समजशक्ती पुष्कळ आहे हें मला दिसून आलं. तो म्हणाला- 'आमच्या संरक्षणाच्या बाबतींत एक तर आम्ही आपल्या मोर्चेबंदीपैकीं काही मोर्चे अगदीं एका माणसालाच जातां येईल अशा अडचणीच्या व चिंचोळ्या खिंडीत लावले आहेतच; शिवाय कुठं कुठं आम्ही अशा खिंडींवर वरून दगडाच्या राशी ढकलून देतां येतील अशा जागा तयार करून ठेवल्या आहेत.' हत्यारांच्या बाबतीत विचारलं तेव्हां खड्ग, शल्य, धनुष्य गदा इत्यादि हत्यारं त्यांच्या जवळ असल्याचं कळलं ती हत्यारं जरी खालून आणलेल्या लोखंडाची देवकारागिरानीं बनवली होतीं, तरी तीं पुरेशीं ठाक ठाक होतीं. कोणी कोणच्या जागी, किती सैनिक बरोबर घेऊन कुठल्या तऱ्हेनं लढायचं वगैरे गोष्टी त्याच रात्रीं आम्ही ठरवल्या.

"सिंह, मला वाटतं पार्शव सैन्याचा कशा तऱ्हेनं संहार झाला हें समजण्यापेक्षां तुला देवभूमी विषयीची माहिती जास्त आवडेल, नाहीं ?"

"मला तर तेंहि आवडेल. पण कपिल, कदाचित तुला आपल्या वीरतेचं स्वतः वर्णन करणं पसंत नसेल, होय ना ? अच्छा, तुझ्या इच्छेबाहेर मी नाहीं."

"पण मित्रा, खरी गोष्ट तर ही आहे की या युद्धसाधनामुळं पार्शव सेनेचा कशा प्रकारं सर्वनाश होणं शक्य आहे हें तर तुला समजणं अवघड नाहीं. तेथली काहीं विशेष गोष्ट असेल तर ती ही की त्या युद्धात देवींचा हिस्सा अगदीं सारखा होता. हो, पण एक गोष्ट सांगायची राहिलीच. उत्तर-कुरूंचे लोक स्वतःला देवजातीय म्हणवतात व 'देव' या पदवींत कसल्याहि रहस्य-पूर्ण शक्तीची जाणीव त्यांच्या मनांत बिलकुल नाहीं. आणखी कित्येक वर्षं त्यांच्यात राहून मला असं दिसून आलं कीं स्वतंत्रता त्यांना प्राणापेक्षा प्रिय आहे व स्वातंत्र्याच्या रक्षणाकरतां त्यांना कित्येक वेळां आपले हात रक्तरंजित करून घ्यावे लागलेसं दिसलं. पण त्यांचं अंतःकरण पाहिलं तर ते स्वभावानं अतिशय मृदु व व्यवहारात पूर्णपणानं सच्चे आहेत. शोक चिंता भय इत्यादि गोष्टी वाळूवरच्या रेघेप्रमाणच त्यांच्या मनावर फार वेळ परिणाम करूं शकत नाहींत."

"'देव-देवी' या शब्दाचा आम्ही जसा अर्थ लावतों, मानतों त्या अर्थानं त्यांना स्वतःला कांहीच अभिमान वाटत नाहीं का ?"

"नाही सिंह, ते तो फक्त जाति-वाचक शब्द समजतात."

"ठीक आहे. युद्धानंतरची त्याची मनोवृत्ति व देवभूमीच्या आणखी कांहीं गोष्टींसंबंधीं सांग पाहूं ?"

" युद्धांत देवांनीं एक एक शत्रु निवडून मारला. मीहि आपल्या शक्तीप्रमाणं मदत केली. कित्येक देव-देवी संकटात पडून युद्धांत कामास आले. पण ज्या दोन-प्रहरीं हा नर-संहार संपला त्यावेळी त्यानी वक्षूच्या थंडगार पाण्यात स्नानं केलीं व आपली चर्मवस्त्रं धुतलीं. त्यांच्या अंगकांतीचं वर्णन कसं करूं ? तिची थोडीशी कल्पना आपल्या रोहिणीवरून येईलसं वाटतं. त्याचे केंस जास्त पिंगे; त्यांचे डोळे जास्त निळे; आकारांत ते आमच्यापेक्षां जास्त मोठ्या स्त्री-पुरुषांच्या बरोबर येतील. देवाना क्षौर ठाऊक नाहीं. मला असं वाटतं कीं लोखंडाचा उपयोग देखील त्यांनी पुष्कळ उशीरां व तो सुद्धां शत्रूच्या प्रहारापासून बचाव करण्याकरतां चालूं केला असावा. हाडाच्या हत्याराचा उपयोग ते अजूनहि करतात."

" आणि पोशाख ? "

" पोशाखाच्या बाबतींत मी सांगितलंच आहे. ते फक्त चामड्याचाच उपयोग करतात. तोहि कंचुक म्हणून नव्हे तर चादरीसारखा. तें मी पहिल्यानं सागितलंच आहे. उकाडा होऊं लागला म्हणजे देव किंवा देवी कोणीहि आपल्या शरीरावर कांहींच वस्त्र ठेवीत नाहींत. त्यावेळी देवाचे केस व दाढी, आणि देवीचे भांग काढलेले केंस जणूं काही यज्ञकुंडातून निघालेल्या ज्वालाचे किरणच असल्यासारखं दिसतात. आणि सौंदर्य ? ते तर देवकन्यामध्येंच आहे. त्याला उपमा मानवी स्त्रिया-मध्यें मिळणं कठीणच. तिथं सर्वच रोहिणी आहेत, एवढं सागितलं की त्या सौंदर्य-राशीच्या थोडं तरी जवळपास पोचलो असं होईल. "

" विजय झाला त्या दिवशी संध्याकाळच्या आधीच देवकुमार व देवकन्या यांच्या झुंडीच्या झुंडी मध, दूध व मृगमास घेऊन पर्वताच्या पठारावरील एका हिरव्यागार विस्तृत मैदानावर जमूं लागल्या. एका बाजूला लाकडाची आगटी पेट-वून तींत मास भाजलं जाऊं लागलं. देव अग्नीचं रक्षण मोठ्या काळजीनं करतात व तो विझला असतां दोन लाकडं एकमेकावर घासून तो पुन्हां उत्पन्न करतात. एका ठिकाणी मऊ चामडी पसरून त्यावर बसून हरित सोम (हिरवी भाग) दगडावर वाटला जात होता. द्राक्षांचीं जंगलं असूनहि देवाना सुरा बनवायची ठाऊक नाहीं. अन् अशी सुरा मिळाल्यावरहि त्यांना कदाचित ती पसंत देखील पडणार नाहीं. हें चालूं असतां एकीकडे देव-तरुण-तरुणीचं गाणं सुरूं झालं होतं. परंतु लघुभोजन व सोमपान झाल्यावर देवांचं जें नृत्य त्या रात्रीं मी पाहिलं तें खरोखरच सदैव आठवण राहाण्यासारखं होतं. आम्ही गाधारवासीहि नृत्य-संगीताचे फार भोक्ते समजले जातों. पण मला वाटतं देवांचाच पहिला नंबर लागेल. इंद्राच्या सांगण्यावरून माझी त्या मंडळींना पूर्ण ओळख झाली होती. म्हणून देवकन्यांनीं माझ्या सभोंवतीं

वर्तुळ करून नाच चालूं केला. मध्येंच मी थकलों तर मधुक्षीरमिश्रित सोमरसानं भरलेला चषक घेऊन तो आदरपूर्वक माझ्या तोंडाला लावण्यासाठीं देवांगना तत्पर रहात होत्या.

" त्यांचा युद्धाचा सगळा थकवा या एका रात्रीच्या नृत्यानं नष्ट झाला आहे असं मला दिसून आलं. हे लोक एका मोठ्या युद्धाच्या धामधुमींतून नुकतेच मोकळे झाले आहेत याचा मागमूसहि दुसऱ्या दिवशीं राहिलेला दिसला नाही. इतक्या लवकर युद्धाचा परिणाम विसरण्याचं आणखी एक प्रमुख कारण होतं— "

" हृदयाची निष्ठुरता हेंच का तें कारण ? "

" नाही सिंह, देवांना निष्ठुर व्हायला फारच कमी अवसर असतो. देव-मंडळींना जीवनाबद्दल आणि केवळ जीवनाबद्दलच आपलेपणा वाटतो. सोमरस देवांची फार आवडती वस्तु असली तरी सोमपानानं अमर होण्याची कल्पना चुकीची आहे. वस्तुतः त्याच्या या अमर–आनंदमय जीवनाचं रहस्य जर कोणतं असेल तर व्यक्ति या नात्यानं निर्मम व निष्परिग्रह असणं हेच होय. मी ते सुरवातीलाच सांगितलं होतं. देव-मंडळींत अलग अलग परिवाराची प्रथा नाहीं. "

" तर काय सगळे परिवार एकत्रच राहतात ? "

" नाही, त्यांच्यात परिवारच नसतात, किंवा असं म्हणावं की सर्व देव लोक हा एकच परिवार आहे. "

" अन् लग्नं वगैरे ? "

" या बाबतीतहि त्यांची पद्धत ऐकून मानव नाकं मुरडतील. पण ज्यानं देव-भूमींतलीं दृश्यं आपल्या डोळ्यानीं पाहिलीं असतील त्याला त्यात कांहीं दोष वाटणार नाही. तिथं प्रत्येक देवी उन्मुक्त देवी आहे; ती कोणाची भार्या नाहीं. ती पद्म-सरोवरांत विहरणारी भ्रमरी आहे. ती पाहिजे त्या पद्मकोषात रात्र घालवण्यास स्वतंत्र आहे. त्याचप्रमाणं देवहि स्वच्छंदी आहेत. परंतु ही स्वच्छंदता देवसमाजाच्या सीमेचं अतिक्रमण करूं शकत नाही. कोणत्याहि देवाचा स्वतःचा पुत्र नाहीं किंवा आपला म्हणवण्यासाठीं पुत्र नाहीं. कारण की वेगवेगळ्या वेळो निरनिराळ्या अंकशायिनी देवांगनाच्या पोटच्या देवबालकांना कोणाचा पुत्र म्हणतां येईल ? परंतु यामुळं देवबालक पितृ-प्रेमाला पारखा तर होत नाहीच; पण उलट त्याला तें जास्तच मिळतं. मीहि अडीच वर्षं देवभूमींत राहिलों. एकीपेक्षां जास्त देवकन्यांच्या प्रेमास पात्र होण्याची संधी मला मिळाली. अन् मला वाटतं या अवधींत उत्पन्न झालेल्या मुलांत माझा औरसहि कोणी असेलच. पण तें समजायला काहीं साधन नाहीं. देवबालक दिसल्यावर त्याचं चुंबन घेऊन त्याला थोडा वेळ तरी जवळ घेतल्याशिवाय कोणीही देव पुढं जात नसे; त्यावेळीं पुत्रप्रेमानं त्याचा देह पुलकित

झालेला मला दिसत असे. या बाबतींत मानवांची व देवांची अवस्था मला सारखीच वाटे. मला प्रथम ही गोष्ट जरा चमत्कारिक वाटे पण नंतर ती अगदीं स्वाभाविक वाटूं लागली. "

"काय हा यूथ-विवाह पशूसारखा नाहीं वाटतं ?"

"इथून विचार केला तर तो खुशाल पशुवत वाटो, पण तिथं मात्र डोळ्यांनीं पाहिल्यावर तें एक दिव्य-दृश्य असं वाटतं. प्रत्येक तरुण दुसऱ्या तरुणाचा पितृज बंधू; तशाच सगळ्या तरुणीहि परस्पराच्या स्वसा [ भगिनी ]; हर एक बालक हर एक वयस्काचा स्वकीय पुत्र किंवा कन्या, प्रत्येक वृद्ध-वृद्धा, आजा-आजी, प्रत्येक देव-देवी अकाम असताना भाऊ बहीण, कामना झाल्यावर प्रेमी-प्रेमिका. परंतु तिथं प्रेम एकतर्फी नसतं. खोटं प्रेम व बलात्कार देवलोकांत अक्षम्य अपराध समजतात.

"प्रेमात बलात्कारहि नाहीं व प्रलोभनालाहि कुठं स्थान नाही. वस्तुतः तिथं प्रलोभनाचं काहीं साधनच नाही. कारण मृगया, पशुपालन, मधु-संचालन, यापासून जी काही प्राप्ति होते ती सर्वांची सम्मिलित संपत्ति असते. त्या देवजीवनाच्या मधुरतेचं वर्णन शब्दानी करता येणार नाही. परंतु सर्व देवभूमी व तींतील देव-समाज याच्या स्वरूपाचं चित्रण आपण जर आपल्या मनश्चक्षूंसमोर उभं करून पाहूं लागलों तर त्याच्या दिव्यत्वाची थोडीशी कल्पना येईल."

"कपिल, तर मग तूं देवभूमी कां सोडलीस ?"

"त्या दिव्यभूमीचा आदर्श मानवापुढं सादर करण्यासाठी मी अधीर झालों होतों, असं म्हणा; किंवा असं म्हणा की मानवांकडून मागून घेतलेल्या लोखंडावर अवलंबून असलेलं अस्तित्व मला डळमळीत पायावर उभारलेलं आहे असं वाटलं. अर्थात हेंहि खरं की माझ्या हयातीत हा पाया ढासळेलच असं नव्हतं. असंहि म्हणा हवं तर की बंधु-बांधवांचा वैयक्तिक स्नेह आठवूं लागल्यामुळं तिथं माझं मन लागेना. या सर्व गोष्टींमुळं माझं मनच तिथून उडालं असंहि म्हणा हव तर. पण मी काही चोरून लपून तिथून आलो नाही."

"तर मग मित्रा, तुला त्यानीं राहण्याचा आग्रह नाही केला ?"

"प्रेमाचा आग्रह तर पुष्कळच केला. जबरदस्ती करणं त्यांच्या स्वभावाच्या विरुद्ध आहे. अन् विशेषतः मित्रावर तर अशक्यच. देवकन्यांना कळलं कीं त्यांचा मानव-वीर आपल्या देशीं जात आहे; तेव्हा तर काहीं विचारूंच नको. त्यांनीं आपलं प्रेमजाल आणखीनच विस्तृत केलं. त्या मला फुलानीं बहरलेल्या वनांत घेऊन जात. तिथं रानफुलांनीं त्या आपले केस सजवीत व माझ्या भोंवतीं बसून माझ्या कानांत फुलं लटकावीत. कुणी केंसांत फुल–माळा घालीत; कुणी माझ्या खांद्यावर गाल टेंकवून म्हणत–'प्रिया, ज्यांच्या करतां तुम्ही आम्हांला सोडून जाणार त्या

मानव स्त्रिया असतात तरी कशा ?' मला त्यांच्या प्रश्नाचं उत्तरच सुचत नसे. मला एक वेगळी स्वतःची अशी देवागना पाहिजे; एक वेगळा मुलगा, स्वतंत्र घर, स्वतंत्र गुरं-ढोरं असं सर्व स्वतंत्र पाहिजे, असं मी त्यांना कसं सागणार ? त्यांची सम्मिलित राहणी जरी आमच्या देशांत चालू करणं शक्य नसलं तरीहि त्यांच्या त्या जीवनाबद्दल ईर्ष्या वाटणंहि तितकंच साहजिक होतं. त्यांच्या त्या सुंदर मूर्तींनीं आपल्या मधुर वर्तनानं कित्येक दिवस मला आपल्या निश्चयापासून थांबवलं होतं. आणि पुरुषाची व विशेषतः माझा मित्र इंद्र याची इच्छा मी देवभूमी सोडावी अशी मुळींच नव्हती."

"शेवटीं मी तिथून निघण्याचा विचार कायम केला; तेव्हां देवभूमीच्या संरक्षणाबाबत इंद्र व इतर प्रमुख देव-पितर व देव-माता याच्या बरोबर कित्येक आठवडे चर्चा केली : देवभूमींत—उत्तर-कुरूंत— लिहिण्याची कला कोणालाच ठाऊक नाहीं. तरीहि मी भावी देव-संतानाकरता भूर्जपत्रावर काही गोष्टी लिहून गुहेंत ठेवल्या आहेत. त्या मी आपल्या देव बंधूंना सागितल्याहि होत्या. पहिली गोष्ट म्हणजे दारायोशनं त्यांच्यावर जें मोठं आक्रमण केलं, त्याचा प्रतिकार करण्यास मुख्य मदत लोखंडाची झाली; त्या लोखंडास देव आपली वस्तु असं मानीत नाहींत. जर लोखंड मिळालं नसतं तर हाडं, दगड, लाकडं यांच्या हत्याराच्या मदतीनं त्यांना पार्शवांना पळवून लावता आलं नसतं. हे काही त्याच्यावरचं आक्रमण नव्हे; कादली मृगाच्या उद्गम-भूमीवर लोकाची आसुमलेली नजर पुन्हा पुन्हा धावेलच आणि तिच्या रक्षणाकरतां त्याना मानव लोकात उत्पन्न होणाऱ्या प्रत्येक हत्याराची माहिती करून घ्यावी लागेल. बाहेरील जगाचा अधिक संपर्क झाल्यानं देवभूमीचा देवधर्म [ सामाजिक व्यवस्था ] अशुद्ध होईल ही भीति कांहीं खोटी नाहीं. मला यावर कांहीं उपाय सुचत नाहीं; म्हणून मी एवढंच सागतो की, भूर्जपत्रावर मी जो उपाय लिहिला आहे तो या व्याधीला पुरेसं औषध नाहीं."

"तरीहि मित्रा ! तूं आपल्या शक्तीप्रमाणं त्यांच्या हितचिंतनाचा प्रयत्न तर केलास ना ?"

"होय, मनापासून केला. आज जरी तें स्वप्नलोकासारखं वाटत असलं तरी तीन वर्षांपूर्वी याच डोळयांनीं तें दृश्य पाहिलं होतं. त्यावेळीं तें स्वाभाविक वाटत होतं. परंतु आज तेंच दिव्य दृश्यसं वाटत आहे. तिथं आनंद होता, पण कामुकता नव्हती. म्हणजे असं नव्हे कीं स्त्री-पुरुष एकमेकांना फक्त डोळयांनीच पाहून संतोष मानीत होते. तिथं परिष्वंगहि होता, स्त्री-पुरुष समागमहि होता; परंतु 'मी व माझं' ही आम्हां मानवांची जी नीच भावना, तिचा त्यांत कुठं ठावठिकाणाच नव्हता. त्या ईर्ष्या-शून्य, कपट-शून्य समाजांत सीमारेषाशिवायच मर्यादा घातलेल्या होत्या. या मर्यादांच्या

योगानं प्रत्येक क्रिया, प्रत्येक मनोभाव, खालच्या पातळीवर यायला अटकाव होत असे, या प्रत्येक गोष्टीचा तिथं प्रत्यक्ष अनुभव घेत होतों. तरीहि, कां कुणास ठाऊक, देवभूमी सोडण्याचा संकल्प मी दूर सारूं शकलो नाहीं."

"त्यांत पार्शवांचा सूड उगवण्याच्या भावनेची तर भर पडली नव्हती ना?"

"..................सिंह, कदाचित तुझंच खरं असेल! पार्शव हें नांव माझ्या कानाला शूलाप्रमाणं वाटतं. माझ्या अंतःकरणाला तें विंचवाच्या डंखासारखं सलत आहे. पार्शवांनीं आमच्या स्वतंत्र गांधाराचा अर्धा भाग परतंत्र केला ही गोष्ट विसरणं माझ्या शक्तीबाहेरचं आहे. देवभूमींत मी असतांना कधीं कधीं पार्शवांचं नांव चटक्रन माझ्या तोंडी येई. मी देवभूमी सोडली त्यावेळीं बाल-वृद्ध, देव-देवांगना सर्वांचे डोळे पाण्यानं भरून आले होते. असं वाटलं कीं यांचा कोणी आप्तच दूर होत आहे. मी मेलो असतों तर त्यांना इतकं दुःख वाटलं नसतं, ही माझी खात्री आहे. कारण की जीवन हाच त्यांच्या प्रेमाचा आधार आहे. मला आजहि हा आनंद वाटतो कीं देव पितर आपल्या बालकांना कपिल या नावाबरोबर तक्षशिलेचं नाव सांगतीलच. कपिल नांव कदाचित लौकर विसरेल पण तक्षशिला मात्र त्यांच्या स्मृति-पटलावर चिर-स्थायी राहील."

"मित्र कपिल! उत्तर-कुरू-देवभूमी-खरोखरच फार सुंदर असेल."

"आणि देवकन्याहि पण!" रोहिणीनें पाठीमागून म्हटलें. ती पण गप्प बसून कथा ऐकत होती.

## (९)

# तक्षशिलेचा नागरिक

तक्षशिला माझें कांहीं विशेष स्वागत करणार आहे, अशी कुणकुण मला जरा अगोदरच लागलेली होती. परंतु त्याच्यासाठी सर्वजण माझी प्रकृति बरी होण्याची वाट पहात राहिलेले होते. या आजारी अवस्थेंतहि मला कांही वेगळाच आपले-पणा अनुभवाला आला. आचार्य व आचार्य-पत्नी यांचा ज्या ज्या वेळीं संबंध येई त्या त्या वेळीं ते मला आपल्या स्वतःच्या मुलाप्रमाणं आपल्या परिवारांतलीच एक व्यक्ति मानून मला वागवीत असत. तक्षशिलेच्या गणपती [ राष्ट्रपती ] पासून

साधारण नागरिकापर्यंत सर्वजण माझ्यावरील आपलें प्रेम व सहानुभूति दाखवण्यास येत असत.

पार्शवांनीं आमचा विजय कबूल केला होता. आपला सेनापति मज्ददाद व इतर सैनिकांना सोडवावें व तक्षशिलेशीं तह करावा अशी त्यांची इच्छा होती. प्रथम आम्हांला वाटलें कीं पश्चिम गंधाराला स्वतंत्र करण्यास ही संधी चांगली आहे; आणि आमच्या सेनेनें त्याची राजधानी पुष्कलावतीपर्यंत मजल मारून आमचें काम सोपेंहि केलें होतें. पण तेथल्या नागरिकांची सम्मति व इतर गोष्टींचा विचार केला, तेव्हांच लक्षांत आलें कीं जोंपर्यंत पार्शवांचें सैन्यबळ अजीबात खच्ची केलेलें नाहीं, तोंपर्यंत फक्त तक्षशिलेच्या बळावर पुष्कलावतीला स्वतंत्र करतां येणार नाहीं. शेवटीं असें ठरलें कीं पार्शवांनीं तक्षशिलेच्या नुकसानभरपाई-करतां दंड द्यावा, व अशा प्रकारें त्यांच्याशीं तह झाला. मज्ददाद आणि दुसरे इतर पार्शव परत पाठवले हें सागणें नकोच.

मी अगदीं पूर्ण बरा झालों व हिंडूं फिरूं लागलों तेव्हां एक दिवस संध्याकाळीं आचार्य मला म्हणाले—

" पुत्र सिंह, उद्यां तुला संस्थागारांत [ प्रजातंत्रभवनांत ] चलायचं आहे बरं का. तिथं तक्षशिलेतर्फे तुझं स्वागत होईल. "

" गुरुजी, तक्षशिलेनं माझ्याशीं आतापर्यंत जो व्यवहार केला तें स्वागतच नाहीं तर काय ? "

" तें तिला पुरेसं वाटत नाहीं. अन् तुला आपल्या सैनिकवेशांत यावं लागेल बरं का. मी कवच वगैरे सर्व ठीकठाक करविलं आहे. "

मी मान लववून गुरुजींचें म्हणणें मान्य केलें.

त्या दिवशीं रात्रीं मी रोहिणीबरोबर दुसऱ्या दिवसासंबंधीं बोलत होतों. मला असें दिसून आलें कीं ती माझ्यापासून कांहीं तरी लपवून ठेवीत आहे. परंतु तें कळण्याकरतां मी तिला जास्त आग्रह केला नाहीं. मला ही खात्री होती कीं रोहिणीच्या मनांतली गोष्ट लौकर नाहींतर उशीरा कां होईना मला कळेलच. रोहिणीनें माझें कवच, खड्ग इत्यादि वस्तु आणून मला दाखवल्या. त्या अगदीं नव्यासारख्या केल्या होत्या. त्या रात्रीं रोहिणी लवकरच गेली. जातांना तिनें सांगितलें—
" तुम्हाला सकाळीं लौकर उठून सर्व तयारी करायची आहे म्हणून लवकर निजा बरं का. "

दुसऱ्या दिवशीं सकाळीं मी उठल्यावर पाहिलें तों रोहिणी न्हाणीघरांतून आपले लांब ओले केंस पुशीत पुशीत बाहेर आली. ही जरी नेहमींची गोष्ट नव्हती तरीहि मला तिला विचारण्याची संधी मिळाली नाहीं. मी न्याहारी करून पलंगावर

बसून कवच घालण्याच्या विचारात होतो इतक्यात रोहिणी माझ्या खोलीत आली. तिनें सुंदर कौशेय [ रेशमी ] व काशिक वस्त्रांचें उत्तरीय परिधान केलें होतें. अंतरवासक व कंचुकी घालून ती तयार झालेली होती. तिचे सोनेरी केंस पाठीवर विखुरलेले होते. तरीहि त्यांत सुंदर ताज्या फुलांचा साज सजविलेला होता. तोंडावर हलकासा वर्ण-चूर्णाचा [ पावडर ] हात फिरविलेला होता. व कानांत सुवर्णकुंडलें होती. मी पलंगावरून चटकन उठून उभा राहिलों व जवळ आलेल्या रोहिणीकडे टक लावून पहातच राहिलों. तिचे लाल ओंठ व निळे डोळेहि हंसत होते. ती म्हणाली—"कां? कांहीं नवीन गोष्ट आहे वाटतं ?"

"रोहिणी, तूं मला नेहमीचीच नवी आहेस. तूं कधीं जुनी होणारच नाहींस. पण आज काहीतरी विशेष दिसतं आहे खास."

"विशेष गोष्ट आहे हें तर खरंच. कारण आज तक्षशिला तुमचा सर्वांत मोठा सन्मान करणार आहे. मग आजचा दिवस मला महोत्सवासारखा कां वाटूं नये?"

"पण रोहिणी, तुला हा मोत्यांचा हार व कुंडलं घालतांना मी कधी पाहिली नव्हती तीं."

"आईनं आज ही घालायला दिली मला."

"पण काय ग, मी तुझ्याजवळ येऊं का?"

"तुम्ही काय दरवेळीं याच्यासाठी परवानगी मागतां होय?"

"पण आज परवानगीची जरूर वाटते मला. आज मला अशी धास्ती वाटते कीं तुझे कोमल केंस अस्ताव्यस्त तर नाहीं ना होणार? माझ्या राकट व अस्वच्छ हातांनीं तुझ्या ओढणीवर डाग तर नाहीं ना पडणार? माझ्या शरीरस्पर्शानं तुझा शृंगार तर नाहीं ना बिघडणार?"

"राहूं दे तुमचं तें काव्य." रोहिणीने आपल्या गालाची लाली वाढवीत म्हटले. "मला नटण्या मुरडण्याची मुळीच इच्छा नाहीं. आईनं माझं न ऐकता आपल्या हातांनीं मला सजवलं. तुह्मांला तें आवडलं नाहींसं वाटतं."

"न आवडायला काय झालं? फारच आवडलं. पण नुसत्या डोळ्यांनीं पाहून तृप्ति कशी होणार?"

"मग विचार तरी काय आहे?"

"तें तुला चांगलं ठाऊक आहे—एक चुंबन नि एक दृढालिंगन. बस्स."

रोहिणीनें माझ्या डोक्यावर हात ठेवून माझ्या ओठांवर आपले ओंठ हळूंच टेकले. नंतर हळूंच दूर होऊन ह्मणाली—चुंबनं हवीं तितकीं घ्या. पण आलिंगन आतां नाहीं. आईनं घेतलेली मेहनत फुकट जाईल. मला महोत्सवाला जायचं आहे."

मी पुनःपुन्हां चुंबनें घेऊन तेवढ्यावरचं समाधान मानले.

मी कवच व शस्त्रास्त्रें धारण करून तयार झालों. त्याच वेळीं आचार्य व आचार्य-पत्नी तेथें आलीं, तीहि आज उत्सवाच्या खऱ्या, पण साध्या वेषांत होतीं. आचार्यांनीं माझा व आईनीं रोहिणीचा हात धरला. आणि आह्मी खोलींतून बाहेर आलों. आचार्यकुलांतले सर्व विद्यार्थी व सर्व कर्मकर आज उत्सवाच्या वेषांत होते. आह्मीं दोघें घरांतून बाहेर येऊन संस्थागाराकडे चाललों, तेव्हां तेहि सर्व आमच्या मागून निघाले. संस्थागार अजून थोडें दूर आहे तोंवरच गणपति रोहिताश्व हे सेनापति व इतर कांहीं सभासद यांना बरोबर घेऊन आम्हांला समोरे आले व त्यांनीं आमचें स्वागत केलें. नंतर वाद्यांच्या गजरांत शस्त्रास्त्रांनी सुसज्ज असलेल्या गांधार-सैनिकाची खडी ताजीम घेत आह्मी थाटामाटानिशीं संस्थागारात पोचलो. तेथे गणसंस्थेच्या एक हजार सभासदांनीं तक्षशिला व सिंह यांच्या जयघोषात उभे राहून आमचें स्वागत केलें. नंतर सर्व सभासद खाली गालिच्यावर बसले. गणपति रोहिताश्वांनीं सभापतीचें स्थान स्वीकारलें व मला आपल्या उजव्या हाताकडे बसण्याची सूचना केली. माझ्या उजव्या बाजूस आचार्यहि बसले. चिलखत घातल्यानंतर वीरासन घालूनच बसावें लागतें हें काहीं सांगायला नको.

रोहिताश्व उभे राहिल्याबरोबर सभागृहात सगळीकडे शांतता पसरली. गणपति ह्मणाले—

" भन्ते [ पूज्य ] गण ! [ सदस्य ] ऐका. आयुष्मान् सिंह यांचा पराक्रम आपल्याला सर्वांना ठाऊकच आहे. तक्षशिलेचे शत्रु पार्शव यांना पराजित करणं हें यांचंच काम आहे. याच्याच कौशल्यानं शत्रु-सेनापति कैदी करतां आला. आज सिंह याचं यशोगान, यांची वीरगाथा, सगळ्या पूर्व-पश्चिम गंधारांत गाइली जात आहे. अशा वीर व हितचिंतक सेनापतीविषयीं कृतज्ञता प्रगट करणं हें आमचं कर्तव्य आहे. आज आपण जमलों आहो ते त्या करतांच, हें आपणां सर्वांना ठाऊकच आहे. आपल्या गणाच्या नायक-परिषदेनं नागरिकांचा मनोभाव ओळखून कृतज्ञता प्रगट करण्याचा एक उपाय योजला आहे. तो आमचे सेनापति प्रियमेध हे भन्ते गणांपुढं मांडतीलच. गणाच्या इतर सभासदांना याविषयीं कांहीं सांगायच असेल तर तें त्यांनीं सांगावं. "

गणपति खालीं बसल्यावर सेनापति प्रियमेध उभे राहून म्हणाले--

" भन्ते गण ! ऐका. आयुष्मान् सिंह यांनीं आमच्या गणाची जी सेवा केली आहे, त्या ऋणांतून मुक्त होण्याकरतां गंधारगण वीर सिंह यांना गंधारचे नागरिक ह्मणून स्वीकारीत आहे. आजपासून तक्षशिलेच्या गंधारपुत्रांच्या

बरोबरीचे सर्व अधिकार आयुष्मान् सिंह यांनाहि मिळतील. त्या बरोबरच त्यांना आपल्या गणसंस्थेचे आजीव सभासद ह्मणून हा गण स्वीकारीत आहे. ”

ज्ञप्ति [ ठरावाची सूचना ] मांडल्यानंतर सेनापति आपल्या जागेवर बसले. नंतर गणपति ह्मणाले--

“ भन्ते गण ! ऐका. आमच्या सेनापतींनी आयुष्मान् सिंह यांना तक्ष-शिलेचे नागरिक व गणसंस्था-सदस्य करण्याविषयीं जी ज्ञप्ति सादर केली ती भन्ते गण यांनीं ऐकलीच आहे. सेनापतींच्या ज्ञप्तीला ज्यांची अनुमति असेल त्यांनीं स्वस्थ बसावं. ज्यांची अनुमति नसेल त्यानीं बोलावं. ”

असें पहिल्याने विचारल्यावर कोणी कांहीं बोललें नाहीं. नंतर गण-पति म्हणाले—“ कोणीच बोलत नाहीं. भन्ते गण ! ऐका. मी दुसऱ्यांदां विचारतों कीं आमच्या सेनापतीनीं आयुष्मान् सिंह याना तक्षशिलेचे नागरिक व गणसंस्थेचे सदस्य करण्याविषयीं जी ज्ञप्ति सादर केली ती आपण सर्वांनीं ऐकलीच आहे. सेना-पतींच्या ज्ञप्तीला ज्यांची अनुमति असेल त्यांनी स्वस्थ बसावं. नसेल त्यांनीं बोलावं. ” सभासदांकडे एकदां नजर टाकून गण-पति पुन्हां ह्मणाले —

“ भन्ते गण ! आतां मी तिसऱ्यादा विचारतों— ऐका. आमच्या सेना-पतींनीं आयुष्मान् सिंह यांना तक्षशिलेचे नागरिक व गणसंस्थेचे सदस्य करण्या-विषयीं जी ज्ञप्ति सादर केली आहे ती आपण ऐकलीच आहे. सेनापतींच्या सूच-नेला ज्यांची अनुमति असेल त्यांनी स्वस्थ बसावं, नसेल त्यांनीं बोलावं. ”

सदस्यापैकीं कोणीहि बोलत नाही असें पाहून गण-पति म्हणाले—

“ भन्ते गण ज्याअर्थीं गप्प बसले आहेत त्याअर्थीं त्यांना आयुष्मान् सिंह हे तक्षशिलेचे नागरिक व गणसंस्थेचे सदस्य होणं मान्य आहे असं मी गृहीत धरतों. ”

ज्ञप्ति-स्वीकार जाहीर होतांच गण-सदस्यानी प्रचंड हर्षध्वनी केला. नंतर गण-पति ह्मणाले—

“ आयुष्मान् सिंह, तुह्मीं हा सन्मान आपल्या रक्तानं व वीरतेनं मिळविला आहे. आतां तुह्मी आमच्यांतील एक झालांत. आतां तुह्मांला आमच्या प्रत्येक नागरिकाइतका, गणसंस्थेच्या प्रत्येक सभासदाइतका सर्व तऱ्हेचा अधिकार मिळाला आहे. तुम्हांला या भन्ते गणापुढं दोन शब्द सांगायचे असल्यास जरूर सांगा. ”

मला या सन्मानाविषयीं थोडीशी जर आधीं बातमी मिळाली असती तर मी त्या दृष्टीनें तयारी केली असती. त्यावेळीं आनंदातिशयानें माझ्या हृदयांत भाव-नांचें तुफान माजून राहिलें. मला भीति वाटत होती की मला नीट बोलतां येणार नाहीं. पण बोलले तर पाहिजेच. मी उभा राहून गणापुढें हात जोडून म्हणालों--

" भन्ते गण ! आपणांपुढें मी दोन शब्द बोलणार आहे ते ऐकण्याची कृपा करावी. मला तक्षशिलेला येऊन सात वर्षांवर दिवस झाले. तेव्हां पासूनच तक्षशिलेनं माझ्यावर प्रेमाची पांखर घातली. मला इथं केवळ वात्सल्यपूर्ण प्रेमच अनुभवायला मिळालं. निष्प्रेम असा एक क्षणहि मला आठवत नाहीं. त्यामुळं वैशालीचा वियोग असा मला बिलकुल भासला नाही. मला गुरुजींनीं सांगितलं होतं कीं ' वैशाली ही पूर्वेकडची तक्षशिलाच आहे.' याची सत्यता मला थोड्या अवधीनंतरच पटूं लागली व मातृभूमी व कर्मभूमी यांत भिन्नता नाहीं हेहि पटूं लागलं. मी अंतःकरणपूर्वक स्वतःला तक्षशिलेचा पुत्र समजूं लागलों---तक्षशिलेकरता प्राणोत्सर्ग करणं ही गोष्ट मला वैशालीकरतां प्राणोत्सर्ग करण्याइतकीच आनददायक वाटत होती. भन्ते गण ! आपणांपैकीं पुष्कळांना ठाऊकच असेल कीं पूर्वेकडे कुरु, वत्स, कोसल, मगध इत्यादि कितीतरी राजे आहेत व तिथं अनार्य पद्धतीचं शासन आहे. देव-परिषद-तुल्य अशी ही गणसंस्था तिथं दिसायचीहि नाही. तिथं राजा आपल्या मनाला येईल तसं शासन चालवीत असतो. पार्शव शासानुशासाप्रमाणंच सगळीकडे या राजांचं स्तोम वाढलेलं आहे. परंतु त्यांच्यामध्यें वैशालीचा लिच्छवि गण हा एकच देश असा आहे कीं जिथं आर्य हे स्वतंत्र मानवांप्रमाणं राजाशिवाय आपलं सम्मिलित शासन—गण-शासन—चालवतात. मला कोसलमध्ये परकेपणा वाटला. कुरु देश पण विदेशसा वाटला. परंतु तक्षशिलेत मात्र मला आपल्या मातृ-भूमीसारखं वाटलं. म्हणून भन्ते गण ! मला इतकंच ह्मणायचं आहे की मी जें कांहीं केलं तें वैशालीच्या प्रेरणेनं केलं. याचं सारं यश-श्रेय-वैशालीलाच दिलं पाहिजे. आणि आपण माझा हा जो सन्मान केला आहे, आणि अत्यंत दुर्लभ असा जो अधिकार मला प्रदान केला आहे, तो वैशालीचाच गौरव या नात्यानं मी त्याचा स्वीकार करतो. व त्याबद्दल आपणां सर्वांचा चिर-कृतज्ञ राहूं इच्छितो. आणि माझी अशी अंतःकरणपूर्वक इच्छा आहे की तक्षशिलेच्या सेवेची एकहि संधी माझ्या हातून जाऊं नये. "

मी बसल्यानंतर एकदम हर्षध्वनी झाला. व एक प्रमुख गण-सदस्य शोभित हे उठून उभे राहून म्हणाले--

" भन्ते गण ! आह्मांला जितका अधिकार होता तेवढा खर्च करून आह्मी आमच्या वीर पुरुषाचा सन्मान केला. पण याचवेळीं पूर्वेकडची तक्षशिला अशा वैशालीचाहि सन्मान प्रदर्शित केला पाहिजे. त्याकरतों मी भन्ते गणांना विनंती करतों कीं येथून एक नागरिकमंडळ वैशालीला पाठवावं. त्यांनीं वैशालीविषयीं आदर प्रदर्शित करून दोन्ही गणांत चिर-बंधुत्व उत्पन्न होईल असा प्रयत्न करावा. "

गण-पतींनीं ही विनंती ऊर्फ सूचना गणापुढे ठेवली. सर्वांनीं तिचा स्वीकार केला.

सगळे लोक आपसांत बोलत विनोद करीत होते. त्याचवेळीं आचार्य बहुलाश्व यांनीं गण-पति रोहिताश्व यांच्या कानांत कांहींतरी सांगितलें. नंतर गणपतींनीं उभे राहून " भन्ते गण ! ऐका ! " असें म्हणताच सभेत एकदम शांतता पसरली. रोहिताश्व म्हणाले--

" मी आपल्याला एक आनंदाची गोष्ट सांगणार आहे. आमचे आचार्य बहुलाश्व यांची तरुणी कन्या रोहिणी हिनं आयुष्मान वीर सिंह यांना आपलं प्रेम अर्पण केलं आहे. तिनं स्वतःहि या पार्शव युद्धांत बहाद्दुरी दाखवली आहे. आचार्य बहुलाश्व यांना आपल्या कन्येनं निवडलेला पति पूर्ण पसंत आहे. आणि मलाहि हें ऐकून फार आनंद झाला. "

यावर चारी बाजूंनीं आवाज येऊं लागले : " रोहिणी व सिंह यांचं पाणिग्रहण इथं आमच्यासमोर होऊं द्या. "

त्यावेळीं रोहिणी इतर स्त्रियांबरोबर वक्ष-कोष्ठकांत [ गॅलरींत ] बसलेली होती. आनंदाने व लज्जेनें तिच्या मुखावर गुलाबी रंग आला होता. परंतु गण-पतींच्या आज्ञेला मान्यता तर दिलीच पाहिजे. थोड्या वेळानें पाहिलें तों गण-पतीच्या आसनाच्या मागच्या दरवाज्यानें आपल्या आईच्या पाठोपाठ खाली मान घालून रोहिणी येत आहे. जणूं कांहीं सभेंतील दोन हजार नजराचा भारच तिच्यावर पडला आहे. फुले घालून शृंगारलेले तिचे सोनेरी लांब केंस अजूनहि पाठीवर विखुरलेले आणि फारच सुंदर दिसत होते. ती सावकाश चालत होती तरीहि तिच्या कानांतील कुंडलें मंदमंदपणें डुलत होतीं. अधून मधून श्वास घेण्याचा जणूं विसर पडल्यानें तिचा स्तनभाग अधिकच खालींवर होत होता. मी इतकीं वर्षे रोहिणीचें वाढतें सौंदर्य पहात आलों होतों. तरीहि त्या दिवशीं खरोखरच ती मला मानवी नसून उत्तरकुरूच्या अप्सरेप्रमाणे दिसत होती व तिच्या त्या दिव्य लावण्यापुढें मी काजव्याप्रमाणें दिसत होतों. या महा लाभाला पाहून मी स्वतःला धन्यधन्य म्हणवून घेतलें.

रोहिणी गण-पतींच्या आसनाशेजारीं येऊन उभी राहिली. गण-पति व आचार्य उभे राहिलेले पाहून मी उभा राहिलों. नंतर आचार्यांनीं रोहिणीचे हात माझ्या हातांत दिले. सभागृहांत हर्षध्वनी झाला. तक्षशिलेचा व वैशालीचा जयजयकार झाला. गण-पतींनीं उद्यांचा दिवस नक्षत्र-दिन [ उत्सव-दिन ] घोषित केला. नंतर पुढे गण-पति, त्यांच्या मागें मी व रोहिणी, नंतर आचार्य व मागून इतर सदस्य, असे सभागृहांतून बाहेर पडलों. बाहेर येतांच असें वाटलें कीं सर्व तक्षशिला

उठून इथें आली आहे. वाद्यांच्या गजरांत आम्ही आपल्या घरीं आलों व तेथून बाकीचे सर्व लोक परत गेले.

त्याच दिवशीं संध्याकाळीं तक्षशिलेच्या तरुण-तरुणींची आमच्या आंगणांत अगदीं गर्दी जमली. त्या सर्वांनीं आम्हां दोघांना मध्यें घालून विवाहमहोत्सवाला सुरवात केली. त्यांत गोड गोड मांस, उंची सुरा व नंतर नृत्य-गायन याच गोष्टी प्रमुख होत्या. तेथें जमलेल्या युवती एकीपेक्षा एक सुंदर होत्या. जणूं सर्व सौंदर्य इथेंच एकत्रित केलें आहे; आणि त्यांत माझी रोहिणी सोळा कलांनीं पूर्ण असलेला चंद्रच जणूं. नृत्यांत वधू-वरांनीं नाचणें ही गोष्ट जरूरीची ठरली व त्यात लज्जा वाटण्याचें कांहींच कारण नव्हतें. कारण आमच्यांपैकीं कोणीच त्यांत मागें राहिलें नसतें. रात्र अगदी थोडी राहिली तेव्हां मैत्रिणींहि दमल्या व सुरेचा प्रभावहि होऊं लागला तेव्हां कुठें आम्हांला त्यांच्या हातून सुटका मिळाली.

रोहिणीचे डोळेहि जड होऊं लागले. आणि मला पण झोप येऊं लागली. आणि आम्ही आपल्या शयनगृहांत आलों.

## (१०)

# तक्षशिलेहून प्रस्थान

रिपुंजय दीड वर्षाचा झाला होता. तो सगळीकडे धांवत फिरत असे. आई-बापांपेक्षां त्याचें आजा-आजीवरच जास्त प्रेम होतें व आईचें ऐकून आजीलाच तो आई म्हणे. वैशालीला जाणारें तक्षशिलेचें नागरिक-मंडळ माझ्याकरतां थांबलें होतें. माझा मित्र कपिल याला त्या मंडळाचा प्रमुख केला होता. आज उद्यां करतां करतां सव्वा दोन वर्षें झालीं. आम्ही जाण्याच्या विचारांतच होतों. जास्त वेळ थांबण्याचें कारण एवढेंच होतें कीं कपिलच्या जागीं दुसऱ्या कोणाला तरी पुढारी ठरवायचें होतें. कारण कपिलसारख्या माणसाला फार दिवस एके जागीं डांबून ठेवणें शक्य नव्हतें. आचार्य आणि विशेषतः माताजी यांना जाण्याची गोष्ट सांगणें म्हणजे मोठ्या धैर्याची परीक्षाच होती. प्रथम जाण्याचा विचार केला तेव्हां रोहिणीला दिवस गेलेले होते. अशा स्थितींत साठ योजनांचा संकटपूर्ण प्रवास करणें योग्य नव्हतें. रिपुंजय अगदीं लहान असतांना पण तीच अडचण होती. पण तो एक वर्षाचा झाला आणि मी आचार्यांशीं या बाबतींत बोलणें सुरू केलें. आचार्य अत्यंत

दूरदर्शी व दुसऱ्याच्या भावना ओळखणारे होते. त्यांनीं पहिल्या दिवशींच मला म्हटलें—

" मुला ! तुझं म्हणणं बरोबर आहे. तूं तक्षशिलेंत दहा वर्षं काढलीं आहेस. ज्या गोष्टींची आज वैशालीला गरज आहे त्यांची तयारी करण्यासाठींच तूं हा काळ इथं काढलास. आमचं प्रेम तुला जाऊं देण्यास तयार नाहीं. पण ज्याप्रमाणं रण-विमुख करणारं पत्नी-प्रेम त्याज्य आहे तसंच हेंहि प्रेम त्याज्यच. तूं आपल्या आईला [ सासूला ] धीर देऊन याकरतां तयार केलं पाहिजेस. "

आईची मान्यता मिळवणं सोपं नव्हतं. तिला आपल्या एकुलत्या एक मुलीच्या जाण्यानें तो सात चौकी वाडा किती भकास वाटला असता याची कल्पना मला व माझ्यापेक्षांहि जास्त रोहिणीला होती. रात्री आह्मीं उद्यां आईला सांगायचें ह्मणून ठरवीत असूं. परंतु तिच्या समोर जातांच धैर्य गळून जाई. शेवटीं आम्ही कपि-लला आपला दूत बनविलें.

एक दिवस कपिलनें बोलतां बोलतां म्हटले--

" आईसाहेब, गणसंस्थेनं मित्र सिंह याचा तर खूपच सन्मान केला; पण वैशालीबद्दल कृतज्ञता व्यक्त करायसाठी ती उतावीळ झाली आहे. वैशालीला नजर करण्याकरता सुंदर घोडे व घोड्या, पांढरे गालिचे, जुनी कापिशेयी सुरा व इतरहि कित्येक वस्तु जमवल्या जात आहेत. हें सर्व आपण ऐकलंच असेल. '

' नाहीं बाळ, हा रिपुंजय हल्लीं मला कांहीं काम करूं देत नाहीं; नी कुठलं कांहीं ऐकायला फुरसद देत नाही. तर मग काय ? वैशालीला तुलाहि जायचं आहे ना ? "

" होय, नागरिकमंडळाचा प्रमुख ह्मणून माझीच निवड झाली आहे. '

" मग कधी जायचं ठरलं आहे ? '

" सहा महिन्यांनीं, पावसाळा संपल्यावर. मग रस्ताहि चांगला होईल, नद्यांचे घाटहि नीट होतील; आणि वाटेंत सार्थहि सोबतीला मिळतील. "

" होय, ते दिवस बरे असतात. तुमची सर्व तयारी झाली का ? "

" होय; बहुतेक झालीच. पण अजून एक गोष्ट ठरवायची आहे. त्याकरतांच तर आह्मीं दोन वर्षं थांबलों. "

" मुला, अशी काय गोष्ट आहे ? "

" सिंहाचं जाणं ! आम्हांला त्याच्याच बरोबर जायचं आहे आईसाहेब ! "

आचार्यायणींच्या डोळ्यांतून टपटप अश्रु गळूं लागले. त्यांच्या मांडीवर रिपुंजय निजला होता. त्यांनीं त्याचें एक चुंबन घेऊन सद्गदित कंठानें ह्मटलें--

" बाळ ! मला ह्या दिवस कधीं तरी येणार म्हणून भय वाटतच आहे. रोहिणीचं लग्न झालं त्या वर्षी नागरिकमंडळ गेलं नाहीं तेव्हांच मला ही गोष्ट कळून चुकली. आतांपर्यंत त्यांना थांबवून धरणं अनुचित नव्हतं. पण मी मात्र या गोष्टीचा सारखा विचार करत्यें आहे. रोहिणी व सिंह यांचा वियोग मला किती असह्य होईल याची तुला कल्पना आहेच. आचार्यांबरोबर मी कित्येक वेळां यासंबंधीं चर्चा केली आहे. त्यांच्या युक्तिवादापुढं मला नेहमी निरुत्तरच व्हावं लागलं. पण हृदयाला तें पटत नाहीं." आचार्यपत्नींना पुढें बोलतां येईना.

"आईसाहेब, आपलं म्हणणं अगदी उचित आहे. एकुलत्या एक मुलीचा विरह आईला सहन होणं फारच कठिण आहे.''

" मुला, अतिशयच कठिण. पण तो मी सहन करण्याचा निश्चय केला आहे. मला असं वाटतं कीं या वर्षी सिंह व रोहिणी यांना जायला मी अनुमति देईन. पण मनाला विरंगुळा म्हणून त्यांच्या जवळ या 'जय' ची मी भिक्षा मागेन."

या बोलण्याची बातमी कपिलनें जेव्हां आम्हाला दिली, तेव्हां मला फारच आनंद वाटला. रोहिणीनें तर लागलीच म्हटले— " तो आईचाच मुलगा आहे. भिक्षा वगैरे शब्द आईनं कशाला बोलायचे ?"

दुसऱ्या दिवशीं आम्हीं दोघें सरळ आईच्याकडे गेलों. आईच्या तेव्हांच लक्षांत आलें की कालच्या कपिलच्या बोलण्याशीं आमच्या येण्याचा संबंध आहे. अगदीं एकच क्षण त्यांचें तोंड उतरलेलें दिसलें. पण चटकन स्वतःला सांवरून तोंडावर हंसू आणून त्या म्हणाल्या—

"माझीं इंद्र-इंद्रायणी कुठं निघाली आहेत? "

मी जरा धैर्यानें म्हटलें–" कपिलनं कालचं बोलणं आम्हांला सांगितलं. आम्ही दोघेहि आईचीच आहोंत. मग आमच्या जवळ भिक्षा मागण्याची गोष्ट कशी होईल ? आईनीं हवं तर 'जय' ला ठेवून घ्यावं, किंवा आम्हांला 'जाऊं नका' अशी आज्ञा करावी. आम्ही आपली आज्ञा मानण्यास तयार आहोंत. परंतु मगध राजाची कोपदृष्टी वैशालीवर असल्यामुळं आचार्यांनीं पण मला जाण्यास अनुमोदन दिलं; आणि माझं कर्तव्यहि मला वैशालीला जाण्यास भाग पाडीत आहे."

माझें बोलणें संपेपर्यंत आई गपचुप बसल्या. नंतर त्यांनीं हात पुढें करून रोहिणीला आपल्याकडे ओढून घेतली. त्यांच्या दृष्टीनें जणूं रोहिणी अजूनहि आईच्या अंगावर पिणारी लहानशी रोहिणीच आहे. रोहिणीचें मुख चुंबन करून त्यावर अश्रु ढाळीत त्या म्हणाल्या–

" मुला ! घाबरूं नको. माझ्या जवळ आईचं हृदयहि आहे व कर्तव्याकर्तव्य ओळखण्याची बुद्धीहि आहे. आईचं हृदय जोर करतं त्यावेळीं बुद्धीचं पारडं हलकं

होतं. हे सहा महिने, बुद्धिशून्यता स्वीकारण्यास तुम्ही उभयतां मला अनुमती द्या. माझं वय जवळ जवळ साठ वर्षांचं आहे आणि मला रोहिणी–" असें म्हणतां म्हणतां त्यांचा कंठ सद्गदित झाला. त्यांच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. नंतर थोड्या वेळानें त्या म्हणाल्या—

"बाळ सिंह, ये, माझ्या जवळ बैस."

मी जवळ जाऊन बसलों. रोहिणी अजूनहि त्यांच्या मांडीवरच होती. त्यांनीं माझ्या कपाळाचें अश्रुमिश्रित चुंबन घेतले. नंतर आपले हिमशुभ्र केस आपल्या मुखावरून मागें सारून माझ्या मस्तकावर आपला हात ठेवून त्या म्हणाल्या—

"मुला, मी 'जय' ला तुमच्या दोघांच्या जागीं समजेन. जयला कांहीं त्रास होणार नाहीं. कारण तो माझ्याइतका रोहिणीला लागून नाहीं. दूध पिण्याशिवाय त्याला रोहिणीची काय गरज आहे? आणि अलीकडे तर शेळीचं दूध माझ्या हातांनीं पिऊन तो रोहिणीलाहि विसरूं लागला आहे."

आईंनीं आमचे काम फारच सोपें करून टाकलें.

एकीकडे तक्षशिलेचे मायापाश हृदयाला वियोगाचें दुःख जाणवीत होते, तर दुसरीकडे वैशालीच्या बाळपणापासूनच्या आठवणी आपल्याकडे ओढीत होत्या. रोहिणीला हे पुढले सहा महिने फारच दुर्लभ वाटले. ती आपल्या मैत्रिणीं, बंधु-बांधव, इतकेंच नव्हे तर बागा, उद्यानें, यांच्या सहवासांत शक्य तितका वेळ काढी. तिच्या या वागण्याने कधीं कधीं मला एकलकोंडेपणा पत्करावा लागे. पण तिच्या त्या वागण्यांतील भावना माझ्या पूर्णपणें लक्षांत असे. शेवटच्या दोन महिन्यांत आम्ही दोघें कित्येक वेळां दोन दोन चार चार दिवस रात्रीं शेतांतल्या वस्तींतच काढीत असूं. त्यावेळीं जय आजीच्या सहवासांत आम्हांला विसरत चालला आहे हेंहि आमच्या लक्षांत येई.

हळूं हळूं पावसाळाहि संपला. तक्षशिलेजवळच्या टेंकड्यांवर उगवलेलें हिरवें गवत व वनस्पती आपला काळसर हिरवेपणा सोडून पिवळट होऊं लागल्या. शेतांतून शालीला [ धान्याला ] पोटरे फुटूं लागले. लोक घरांची स्वच्छता व डागडुजी करूं लागले.

कपिलच्या नेतृत्वाखालीं दहा इसमांचें नागरिकमंडळ वैशालीला जाण्याच्या तयारींत होतें. भेटीदाखल दहा उत्तम घोडे, गालिचे इत्यादि वस्तु एकत्र जमा केल्या होत्या. त्यांच्याबरोबरच तक्षशिलागणातर्फे सुवर्णफलकावर एक लेख कोरून पाठविलेला होता. त्यांतील कांहीं वाक्यें अशीं होती—

"वैशाली व तक्षशिला यांचा संबंध फार जुना आहे. पूर्वजांकडून असें सांगण्यांत येतें कीं एका काळीं गंधाराच्या बाजूनें कित्येक आर्य पूर्वेकडे गेले व त्यांनीं

तेथें वैशालीचा गण स्थापित केला. तें कांहीं का असेना, पण हें तर आजहि धड-धडीत दिसत आहे कीं या दोन्ही नगरी व त्यांचे नागरिक यांच्या पुष्कळशा वैशिष्ट्यांत साम्य आहे .. ... ...

" वैशाली ही तक्षशिलेप्रमाणेंच वीरप्रसविनी आहे. तिचा वीरपुत्र सिंह यानें ज्या कौशल्यानें पार्शवांच्या सेनेचा विध्वंस केला, तें कौशल्य आम्ही कधींहि विसरणार नाहीं. आम्ही त्या वीर पुरुषाचा सन्मान केला आहे. अन् आमच्या मतें असा वीर सेनापति वैशालीला मिळाला हे तिचें महद्भाग्य होय. ज्यांनीं त्याच्या शौर्याच्या कथा ऐकल्या असतील त्यांना वैशालीकडे बुभुक्षित दृष्टीनें पहाण्याचें साहस होणार नाहीं......... ...

" आमची अशी इच्छा आहे कीं तक्षशिला व वैशाली कायमच्या भगिनीत्वाच्या सूत्रांत बांधल्या जाव्या. आणि गंधार व लिच्छवि यांनीं एकमेकांना भाऊ समजावें............"

अकरा नागरिक आणि आम्ही दोघे, याशिवाय शुभआदि वैशालीहून आलेले आणखी पांच तरुणहि आपलें शिक्षण संपवून परत जाण्यास तयार होते. अशी आमची एकूण संख्या अठरा होती. तक्षशिलेपासून हस्तिनापुरापर्यंत खुष्कीच्या मार्गानें जाणाऱ्या सार्थांबरोबर चालत जावें, नंतर नावांतून जावे, असे ठरलें होतें. भेटीच्या वस्तु, व खाण्याकरता लागणारे पदार्थ विकत घेण्यास लागणाऱ्या विक्रीच्या वस्तु, आम्ही सहा गाड्यांवर लादल्या. त्यांचे सहा गाडीवान सोडून बाकीचे बाराजण बारा घोड्यांवर बसून चाललों होतों. आम्हां दोघाकरतां आचार्यांनीं आपल्या पागेंतून दोन उत्तम घोडे दिले होते. संध्याकाळीं आम्हांला निरोप देण्यास मित्र व मैत्रिणी यांचें एक सम्मेलनच भरलें होतें. त्यांत आमोद-प्रमोदाची तजवीज होती खरी परंतु यावेळीं मात्र त्यांत मुळींच जोर जाणवेना. उलट एक तऱ्हेची उदासीनताच पसरली होती. सुरा विषासारखी वाटत होती. स्वादिष्ट पदार्थ बेचव वाटत होते. नृत्य-संगीताची कोणाला आठवणहि झाली नाहीं. सगळा वेळ आम्ही विषादपूर्ण वार्तालापांत घालवला. रोहिणीच्या मैत्रिणी अश्रुधारांनीं तिचें मुख न्हाणीत होत्या, व तिला आलिंगन देऊन निरोप घेत होत्या. माझे मित्र पुनर्दर्शनाच्या शुभ कामनेनें मला भेटून माझा निरोप घेत होते.

सकाळीं थोडा अंधार असतांनाच आम्हांला तक्षशिलेच्या पूर्व दरवाज्यांतून बाहेर पडायचें होते. आईनीं तर सारी रात्र तऱ्हेतऱ्हेच्या खाण्याच्या वस्तु करण्यांत घालवली होती. आम्हीं दोघांनीं उठून प्रातर्विधी आटपून कपडे बदलले. नंतर आईच्या हातचे मधुर मांस-गोलक व अपूप घशाखालीं उतरवून आम्ही तयार झालों. जय गाढ निद्रेत होता. आपले आई-बाप एक दिवस सकाळींच

आपण निजलों असतांना आपल्याला सोडून पळाले या गोष्टीची आठवण ठेवण्या-इतकें समजूं लागायला त्याला अजून पुष्कळ वर्षे लागतील. मी व रोहिणीनें हळूच त्याचें चुंबन घेतलें. एकदां मला वाटलें तो गालांतल्या गालांत हंसत आहे; त्याच्या लाल-लाल ओंठांमधून त्याचे चिमुकले पांढरे शुभ्र दांत दिसत आहेत. पण तो भ्रम होता. आमचा जय निःशंक निजला होता. जळत्या दिव्याच्या प्रकाशांत मी पाहिले तों रोहिणीच्या डोळ्यातून अश्रू झरत आहेत. माझ्या डोळ्यांतून पाणीच तेवढें येत नव्हते, पण हृदयांत अतीशय कालवाकालव होत होती.

सार्थाच्या शकटांबरोबर आमचेहि शकट नगरद्वारांतून बाहेर पडले होते. व आमचे इतर सोबतीहि पुढें गेले होते. आई व आचार्य यानीं पुढे वेशीपर्यंत येऊं नये म्हणून त्यांना मोठ्या मिनतवारीनें थाबविलें. ढेलजेंतच त्याचें आलिंगन व ललाटचुंबन घेऊन त्याना नमस्कार करून आम्ही आपापल्या घोड्यावर स्वार झालों.

आम्हीं एक मैलावर शकटांना गांठलें. सूर्योदयाचे वेळीं अनुपम सौंदर्याची मालकीण तक्षशिला एखाद्या देव-नगरीप्रमाणें समोर दिसत होती. आतां आम्ही इतर दहा स्वाराचे बरोबर शकटाच्या मागून चालतो होतों. शेवटीं आतां तक्ष-शिला दिसणार नाहीं, अशा जागीं आम्ही येऊन पोचलों. तेथें आम्ही दोघें घोड्या-वरून उतरलेले पाहून कपिल व इतर लोकहि उतरले. मी तक्षशिलेकडे पाहून हात जोडून म्हणालो —

"शुभे तक्षशिले! कदाचित हा शेवटचा प्रणाम होईल. परंतु तुझ्या ठिकाणी घालवलेलीं दहा वर्षं कधीहि विसरणार नाहीं."

रोहिणीनेंहि नमस्कार केला. पण तिच्या मुखांतून शब्द निघायच्या ऐवजीं तिच्या नेत्रांतून अश्रुधारा वहात होत्या. इतर लोकावरहि याचा परिणाम झालाच. आमचे वैशालिक बन्धू शकटातून पुढें चालले होते. त्यांना या जागी घडलेल्या गोष्टींची कल्पना असेल कीं नाहीं कोण जाणे.

रोहिणी अजूनहि तक्षशिलेच्या बाजूला अश्रुपूर्ण नेत्रांनी पहात होती. मी तिचा घोडा तिच्याजवळ आणून उभा केला तरी तिला कळले नाहीं. जेव्हा मी 'रोहिणी! चल.' असें म्हटलें तेव्हां ती जणूं झोपेंतून एकाएकीं जागी झाल्यासारखी भानावर आली.

स्वार होऊन आम्ही घोड्यांना टांच मारली आणि थोड्याच वेळांत शकट गांठले.

( ११ )

# वैशालीच्या मार्गावर

मद्र [ सियालकोट शहर असलेला प्रदेश ] आणि मल्ल [ माळवा ] या गणांच्या भागांतून दहा वर्षांपूर्वीहि मी गेलों होतों. पण त्यावेळीं ते एखाद्या दूरच्या अपरिचित प्रांताप्रमाणें वाटत होते. मात्र आतां ते ओळखीच्या मित्रांप्रमाणें वाटले. या गणांच्या भागांतील रस्ते सुरक्षित होते. कुठेंहि चोर-दरवडेखोरांची भीति नव्हती. पावसाळा संपतांच रस्त्यांची दुरुस्ती झालेली होती. चंद्रभागा वगैरे नद्यांवर ठिकठिकाणीं पूल बांधलेले होते अगर नावाची व्यवस्था होती. सार्थाला गणाच्या प्रांतांत प्रवेश करतांना थोडासा कर द्यावा लागे. नगराच्या बाहेर सार्थांना उतरण्याकरतां सोइस्कर जागा ठेवलेल्या असत. तेथे माणसांची व जनावरांची खाण्यापिण्याचीहि व्यवस्था असे. जर शहरात आपला कांहीं माल विकायचा असेल तर त्यावरहि थोडासा कर द्यावा लागे.

मद्र व मल्ल या दोन्हीं ठिकाणचे वीर तक्षशिलेच्या रक्षणाकरतां आलेले होते. त्यामुळें त्यांना माझी चांगलीच माहिती होती. मद्र गणाची राजधानी सागल [ सियालकोट ] येथें आम्ही पोंचलों तेव्हां तेथें संस्थागारांत गणातर्फे थाटाच्या स्वागताची तयारी केलेली होती. गांधारी रोहिणी मद्र तरुणींना भेटल्या नंतर थोडा वेळ तरी तक्षशिलेला विसरली. पूर्वेकडील प्रदेशांत मद्रदेश हा सुंदर तरुणींची खाण म्हणून प्रसिद्ध आहे. ही गोष्ट मी रोहिणीला सांगितली तेव्हां तिचे गाल लाल झाले. आणि ती म्हणाली—

“ पूर्वेकडल्या लोकांना मद्र आणि गंधार यांतला फरक ठाऊकच नसेल. ”

“ हो. तें मला कबूल आहे. कारण खरं पाहिलं तर माद्री व गांधारी यांच्यांत अधिकउणा असा फरक दाखवतांच येत नाहीं. ”

जेव्हां आम्ही शतद्रु [ सतलज ] आणि सरस्वती [ घग्घर ] उतरून पूर्वेच्या हद्दींत पाय ठेवला, तेव्हां आम्हांला आमची पहिली निश्चितता सोडावी लागली. आतां रस्ता निष्कंटक नव्हता. जंगल, गुहा, नद्या या सगळ्या ठिकाणीं चोरांची भीति होती. आतां वस्त्याहि लांब लांब होत्या. त्यामुळें कित्येक दिवस जंगलांतून घालवावे लागत. वस्तीच्या ठिकाणीं चोरांची भीति कमी होती असें नाहीं. परंतु

दूध, लोणी, भाजी आणि इतरहि खाण्याच्या वस्तूंची सोय असे. हें राजाचें राज्य आहे म्हणून माणसांच्या व्यवहारांत कृत्रिमता जास्त आहे. लहान-मोठ्यांचा विचार जास्त आहे. गणांशी तुलना करतां इथले लोक जास्त गरीब आहेत. आणि पुष्कळसे दासहि दिसतात.

जंगलांतून मृगयेची सोय चांगली होती. रोज कांहीं ना कांहीं शिकार मिळतच असे. आम्ही कधीं गवा [ नीलगाय ] मारीत असूं, कधीं डुक्कर, कधीं हरिण, कधीं मोर. यामुळें स्वादिष्ट सूप आम्हांला रोज मिळे. आमच्या सार्थांत चारशें लोक होते. सर्वांना कांहीं रोज सूप देतां येत नव्हते. परंतु गवा ( नील गाय ) मिळाला म्हणजे मात्र सर्व सार्थांत हर्षानें धुमाकूळ माजे. आमच्या सार्थाबरोबर कित्येक फालतू बैल होते. एखादा बैल शकट ओढायला निकामी झाला म्हणजे फालतू बैलांतून त्याच्या जागीं एकाला जोडायचा व तो निकामी बैल सार्थासाठी सूप बनवायला उपयोगांत आणायचा. पुढल्या मुक्कामाला बैलाची संख्या पूर्ण केली जाई. गांवांत पोटभर मांस व सुरा पिण्यास मिळे. आमच्या सबंध सार्थाकरतां आम्हाला तीन मोठ्या बैलाचें सूप करावें लागे तेव्हां ते पुरवठ्यास येई. जेथें चोरा-चिलटाचे भय असे तेथें सार्थवाह माणसांना सुरा पिण्याची मनाई करी.

इंद्रप्रस्थ पांच दिवसांचे वाटेवर असतानाच आम्हांला आमच्या सार्थाच्या मागावर दरवडेखोर आहेत अशी बातमी लागली. त्यावेळी सार्थानें मोहिमेवर निघालेल्या फौजेचें रूप धारण केलें होते. त्यात रोहिणी कोणाहि पुरुषाच्या मागें राहिली नाहीं. पण कपिलानें तिला रात्रीच्या सैनिक-कार्यांतून वगळायचें ठरवलें तेव्हां मात्र ती भांडायलाच उठली. रोहिणीच्या स्वभावांत भांडखोरपणा मुळींच नव्हता. पण त्या दिवशीं मी खरोखरच तिला चिडलेली पाहिली.

इंद्रप्रस्थांत येऊन यमुना उतरून गंगेच्या कांठीं हस्तिनापूरला आम्हीं येऊन पोंचलों. वाटेंत आम्हांला कल्माषदम्य राजधानी लागली. कुरूच्या वृद्ध राजाला एक दिवस आम्ही रथांतून नगराबाहेर जातांना पाहिलें. त्याच्या सभोंवती शेंकडों पहारेकरी होते. माझ्या तक्षशिलेच्या मित्रापैकी पुष्कळानी आजपर्यंत एकहि राजा कधीं पाहिला नव्हता. म्हणून त्यांना तें दृश्य पाहून असे वाटलें की राजा कुठल्या तरी युद्धाला चालला आहे. मी त्यांना सागितले कीं तो युद्धाला जात नसून बागेंत क्रीडा करण्यासाठीं जात आहे. तेव्हां त्यांना फार आश्चर्य वाटलें. या कामाकरतां इतक्या सशस्त्र पहारेकऱ्यांची काय जरूरी? राजतंत्रांत [ राजे-शाहींत ] एकच व्यक्ति—राजा—अतिशय मोठी जबाबदारी व अधिकार आपल्या हातांत ठेवीत असते. राजा आपल्या स्वेच्छाचारानें कित्येक वेळां कित्येकांना आपले शत्रू करून ठेवतो. कित्येकदां वारसदार अधिकार मिळवण्याकरता त्याला आपल्या वाटेंतून कायमचा दूर

करण्याची संधी पहात असतात, अशा प्रकारें राजाच्या जिवाला हर हमेश धोका असतो. त्यामुळें त्याला सर्व प्रकारें जपावें लागतें. झाडाचें तोडलेलें फळ त्याला दुसऱ्यानें खाऊन परीक्षा केल्या शिवाय खातां येत नाहीं. तसेंच विहिरीचें स्वच्छ पाणीहि तो इच्छा होईल तेव्हां पिऊं शकत नाहीं. दुसऱ्या कोणी तरी दोन घोट पिऊन त्यांत विष नाहीं हें सिद्ध करीपर्यंत त्यास तहानेलाच रहावे लागते. मग स्वयं-पाक घरांत तयार केलेल्या भोजनाची गोष्ट ती काय सांगावी ! तो रात्रभर निश्चित-पणें झोपूं शकत नाहीं. अर्धीअधिक वर रात्र दुःस्वप्नांनीं भरलेली अशी घालवावी लागते. यावर माझा एक मित्र भद्रिक यानें म्हटलें—

" येवढी जोखीम बघत असतांना देखील राजा आपल्यावर इतकी जबाब-दारी कां घेतो ? "

" कारण भोगांत त्याला अधिक स्वतंत्रता वाटते. तो देशांतील सर्वांत श्रीमंत मनुष्य असतो. व्यापार न करतांच त्याच्याजवळ जगांतली संपत्ति चालून येते. त्याच्याजवळ सर्वांत जास्त शेती असते. तो सर्वांत जास्त दास-दासीचा मालक असतो. नित्य नव्या नव्या सुंदर तरुणी तो आपल्या अंतःपुरात भरणा करीत असतो. "

" परंतु हा सर्व जुलूम सहन करायला लोक कां बरं तयार होतात ? "

" जेव्हां ते स्वतःला नालायक समजून हवी ती गोष्ट सहन करायला तयार होतात, तेव्हांच तर त्याच्यावर राजाची हुकुमत सुरू होते ! "

" आम्ही तर कधींच सहन करणार नाहीं. "

" पण पश्चिम गंधारचे लोक शासानुशासाचं [ शाहनशाह ] जूं ओढीत आहेत. राजा फक्त एका जना [ जाती ] पुरतंच आपलं शासन मर्यादित ठेवून कधीच सुरक्षित राहूं शकत नाहीं. गण जसा दुसऱ्या जनावर शासन करणं शक्य नाहीं, त्याचप्रमाणं राजाला केवळ एकाच जनावर शासन करणं शक्य नाहीं. राजाला आपल्या शासना-साठीं एकापेक्षां जास्त जन हवे असतात. म्हणजे त्यामुळं त्याला एका विरुद्ध दुस-ऱ्याची मदत घेतां येते. त्याला दासांचा समाज पाहिजे असतो. म्हणजे त्यांत त्याला एका जनांतूनहि स्वतःचे सहाय्यक मिळूं शकतात. राजा एका जनांत सुद्धां फाटाफूट घडवून आणून ठेवीत असतो. उत्तरा-पथाच्या गणांतून ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य इत्यादि भेद दिसत नाहींत. त्याच्याकडे देवांच्या पूजा-प्रार्थनेकरतां एखादा वेगळा समुदाय ठरलेला नाहीं. परंतु या राजांच्या इथं ब्राम्हण क्षत्रिय वगैरे भेद बनवले आहेत. तेहि राजाच्या स्वेच्छाचारी शासनाच्या सोईकरतांच केलेले आहेत."

हस्तिनापुरांत आम्हांला कांहीं दिवस राहावें लागलें. जलमार्गानें जाणारे सार्थ तेथें मिळणें कठीण नव्हतें. तेथून नेहमीं काम्पिल्य, कान्यकुब्ज, अलविका, प्रयाग-

प्रतिष्ठान, वाराणसी इत्यादि ठिकाणीं जाण्याकरतां नावा सुटत असत. परंतु आम्हांला आमच्या घोड्यांकरतां विशिष्ट तऱ्हेच्या नावांची जरूरी होती. त्या कोणत्याहि सार्था-जवळ नसल्यामुळें आम्हांला त्या स्वतंत्रपणें बनवाव्या लागल्या.

आम्हांला राजगृहाचे श्रेष्ठी जोतिय यांचा नदी-सार्थ इथें भेटला. कितीतरी सार्थ आम्हांला बरोबर नेण्यास उत्सुक होते. कांहींनीं तर आम्हांला नजराणा देण्याची इच्छा केली. आणि हे कांहीं खोटें नव्हतें कीं बहुतेक अश्वारोही असलेल्या सतरा सतरा बलवान धनुर्धारी सैनिकांची सोबत मिळणें हा कांहीं कमी लाभ नव्हता. जोतिय यांचा सर्वार्थक भीम हा मोठा चतुर आणि देशदर्शी मनुष्य होता. त्यानें पूर्व पश्चिम समुद्रच नाहीं तर कित्येक लांबलांबच्या द्वीपाचा प्रवास केला होता. गंधा-रहि त्याने पाहिला होता. त्याच्या चाळीस विशाल नावातून गंधार व तुषार देशांतील तऱ्हतऱ्हेच्या वस्तु होत्या त्यांत उत्तर-कुरूचें कादली मृगचर्महि होतें. या विक्रीच्या वस्तु फक्त मगध व सुह्म पर्यंतच्याच नसून त्यातल्या कित्येक तर सुवर्णभूमी [ ब्रम्हदेश ] व पूर्व समुद्रा [ बंगालचा उपसागर ] च्या इतर द्वीपांना जाणाऱ्याहि होत्या.

भीमाकडून मगध देशाविषयी कित्येक गोष्टी ठाऊक झाल्या. राजा बिम्बिसार सैन्याची पुन्हां जुळवाजुळव करीत आहे. उत्तरापथा [ पंजाब ] हून त्यानें हजारों घोडे विकत आणले आहेत. त्याचें आतां कोणावर आक्रमण होणार आहे या-विषयीं भीमाला निश्चित असें कांहीं सागतां आलें नाही. जोतिय श्रेष्ठीचे वाणिज्य-दूत सर्व जम्बुद्वीप ( भारत ) आणि सागर पार पर्यंत पसरलेले आहेत. त्यामुळें प्रत्येक राज्यातील अंतर्गत शांतता व युद्ध यांविषयी त्याला पुष्कळ माहिती असे. कारण व्यापार हा तरी शेवटीं देशाच्या शांतता-समृद्धीवरच अवलंबून आहे ना! पण हो. एवढें मात्र कळलें कीं कोसल व वत्स या देशांचे राजे त्याचप्रमाणे लिच्छवी गण सुद्धां सैन्याच्या व्यवस्थेस लागले आहेत. लिच्छवींचे नांव ऐकतांच माझ्या हृदयात धडधडूं लागलें. म्हणजे! लिच्छवींचा प्रहार बिंबिसार इतक्या लौकर विसरला कीं काय? नदी-सार्थाला बैलाची जरूरी नसल्यामुळें घासचाऱ्याची काळजी नसते. आणि शकटांतून मुंगीच्या पावलानें चालावें पण लागत नाहीं. गंगेच्या प्रवा-हांतून खालीं जातांना नावेचा वेग आधींच फार असणार; त्यांतून हल्ली पश्चिमेचे वारे होते. आणि शिडांच्या मदतीनें नावा आणखीच अधिक वेगानें जात होत्या. आमच्या घोड्यांना ओल्या-सुक्या चाऱ्याचा तोटा नव्हता. कधीं कधीं आमचा सार्थ जंगलाच्या कडेला लाकूड वगैरे जमा करण्यासाठीं थांबून राही. त्यावेळीं आम्हीं आमच्या घोड्यावरून रपेट करीत असूं. व एखादी शिकारहि मिळवीत असूं. आम्हांला कांहीं कार्षापण [ नाणें ] खर्च करावे लागत व आमच्या सार्थांतील नावि-

कांकडून आम्हांला रोज मासे मिळत. चांदणें असतांना नावा रात्रंदिवस चालत. अंधाऱ्या रात्रीं आम्हीं प्रवाहाच्या मधोमध नांगर टाकून थांबत असूं. यावेळीं दारू बरोबर खाण्याकरतां नावाडी मशालीच्या उजेडांत मासे मारीत असत. काम्पिल्य, कान्यकुब्ज यासारख्या महातीर्थाचे ठिकाणीं श्रेष्ठी जोतिय यांची वाणिज्य-घरें होतीं. तेथें सार्थांना कांहीं वस्तु उतराव्या व कांहीं चढवाव्या लागत. त्याकरतां आम्हाला तेथें एक दोन दिवस रहावें लागे. ह्या वेळ आम्ही पाळीपाळीनें शहर पहाण्यात व कांहीं वस्तु विकून त्यांतून खाण्यापिण्याच्या जिनसा आणण्यांत घालवीत असूं. थंडीचा मध्य होता. पण रोहिणी म्हणे इथें तक्षशिलेपेक्षां थंडी कमी आहे. रोहिणीला पूर्वेकडील शहरांतील समृद्ध पण्यवीथि [ बाजारपेठा ], भव्य प्रासाद, सुंदर क्रीडा-उपवनें इत्यादि पाहून फार आनंद होई. पण चांडाल, दास व कर्मकर यांच्या जीर्णशीर्ण झोंपड्या व त्यांत राहणारे हीन दीन निवासी पाहून ती अगदीं प्रक्षुब्ध होई. दासप्रथा किती क्रूर असते, गरीबी किती असह्य असते हें आतां तिला कळलें. कान्यकुब्जाचे राजोद्यानांत आम्ही गेलो. उद्यानाचे मधोमध पुष्पित पद्म, सरोज, पुण्डरीक इत्यादीनीं सुशोभित अशी स्वच्छ पाण्याची पुष्करिणी होती. त्यांत हंस-युगुलें आनंदानें कलरव करीत फिरत होतीं. पुष्करिणीच्या चारी बाजूंना स्थल-पद्म, जाती, यूथिका इत्यादि नानावर्ण गंधांच्या फुलांचे रम्य ताटवे लावलेले होते. मधून मधून हरित कंदुक-भूमी होती. तीवर तरुण प्रमदा कंदुक-क्रीडा करीत होत्या. अगर बसल्या बसल्या रहस्यालाप करण्यांत मग्न झालेल्या दिसत होत्या. रोहिणीच्या अंगावर कुंडलाशिवाय कांहीच दागिने नव्हते. तिचीं वस्त्रेंहि साधारण नागरिक-स्त्रियांप्रमाणे होतीं. परंतु तिच्याजवळ गांधारीची रूपसंपदा होती. त्यामुळें इतरांचे लक्ष चटकन तिच्याकडे आकर्षित होई. कान्यकुब्जाच्या त्या राजोद्यानांत पांचाल राजकन्या आपल्या परिवारासह त्यावेळी आलेली होती. आपल्या सखीकडून रोहिणीविषयीं माहिती ऐकून ती आमच्याकडे आली. त्यावेळीं आम्ही एका श्वेत-शिलेवर बसून पुष्करिणीची शोभा पहात होतों. राजकन्येला येतांना पाहून आम्ही उठून उभे राहिलों. राजकन्येच्या एका सखीनें येऊन आम्हाला आपली ओळख करून दिली. मी रोहिणीला राजकन्येला भेटून येण्यास सांगितलें.

त्या दोघीहि एकमेकींना भेटण्याच्या शिष्टाचाराच्या बाबतींत अनभिज्ञ होत्या. कोणाहि कन्येला आपल्या बरोबरीची मानून तिच्याशीं मैत्रिणींच्या भावनेनें वागणें हेंच रोहिणीला ठाऊक होतें. तर राजकन्येला आपल्या वयाच्या सर्व मुली आपल्या परिवारांतल्या आहेत अशा नात्यानें वागणेंच कळत होतें. परंतु रोहिणीच्या रूपाकडे पाहून ही पण कोणी राजकन्याच आहे असा तिला भ्रम झाला. त्यामुळें रोहिणीनें 'स्वागत' असें म्हणतांच तिनेंहि 'स्वागत राजकुमारी' असें म्हटलें. मी जरा

बाजूला राहून पहात होतों. आणि नंतर रोहिणीनें आपल्या संवादाचा जो भावार्थ सांगितला त्यावरून जें समजलें तें असें—

राजकन्या—" सखि ! तूं इकडची दिसत नाहींस; माझ्या जिज्ञासेबद्दल क्षमा कर हं. "

रोहिणी—" नाहीं राजकुमारी, त्यांत कांहीं मोठंसं नाहीं. मला आपल्याला भेटून फार आनंद झाला. "

राजकन्या—" ते तुमचे कोण लागतात ? "

रोहिणी—" माझे पति. "

राजकन्या—" तुमचा जन्म-देश कोणचा ? "

रोहिणी—" गंधार देशांतली तक्षशिला नगरी. "

राजकन्या—" माझी आजी पण गंधार देशांतलीच होती. आपण आपलं नांव सांगाल ? "

रोहिणी—" रोहिणी. आणि आपलं ? "

राजकन्या—" विद्या. रोहिणी, आपण जरा वेळ लताकुंजांत विश्राम केला तर आपली कांहीं हरकत नाहीं ना ? अन् आपल्या पतींनाहि तिथं बोलवावं म्हणत्यें. आम्ही आमच्या गंधारच्या अतिथींचं स्वागत करूं. "

" मला त्यांना विचारून येण्याची परवानगी द्या. " असे म्हणून रोहिणी माझ्याकडे आली. आम्हांला तर पुष्कळच वेळ होता, तेव्हां दुपारचा वेळ लताकुंजांत घालवायला कांहीच हरकत नव्हती.

आम्ही दोघें तिकडे गेलों. राजकन्येच्या साऱ्या अंगावर दागिने लादलेले होते. तिच्या कानांत रत्नजडित मोठमोठीं कुंडलें होतीं. त्यांच्या वजनानें कान खांद्यापर्यंत लोंबले होते. तिच्या गळ्यांत उंची मोत्यांचे मोठाले हार होते. त्यांनी तिचे वक्षःस्थल झांकलें गेलें होतें. तिच्या कमरेला पुष्कळ सर असलेला कमरपट्टा होता. त्याच्या चारी बाजूंस मोत्यांचे घोंस लोंबत होते. तिच्या हातांत कोंपरांपर्यंत तऱ्हेतऱ्हेच्या बांगड्या व अनेक कंकणें होतीं. तिचे काळेभोर केंस सुंदर रचना करून बांधले होते. व डोक्यांत रत्नजडित फुलें घातलेलीं होतीं. पायांतहि झुम-झुम वाजणाऱ्या तोरड्या होत्या. आमच्या वैशालीलाहि दागिन्यांची चाल जास्त आहे. परंतु इतके दागिने एकत्र असे मी सुद्धां कधीं पाहिले नव्हते. इतके दागिने अंगावर घालून राजकन्येला चालणेंहि जड जात होतें. मला तीं भूषणें न वाटतां तीं भारच वाटत होतीं. मी जवळ आलेला पाहून राजकन्या म्हणाली—

" अतिथीं, स्वागत ! मध्यान्ह वेळच्या आमच्या आतिथ्याचा आपण सपत्नीक स्वीकार कराल अशी मला आशा वाटते. "

" आपली आज्ञा शिरसावंद्य आहे. आम्हांलाहि पुष्कळ सवड आहे. "

" आपण या कान्यकुब्जांत [ कनोज ] कांहीं दिवस राहाणार नाही का ? "

" नाहीं राजकुमारी ! आम्हीं नदी-सार्थाबरोबर मगध देशाकडे जात आहों. फक्त आजचा दिवसच राहाणार. "

" तर मग आपण मगधचे राजकुमार आहांत, अन् सखी रोहिणी गंधारची राजकुमारी, असंच ना ? "

रोहिणी--" नाहीं राजकुमारी ! आम्ही राजकुमार व राजकुमारी नाहीं. आम्ही क्षत्रिय आहों. माझे पति वैशालीचे क्षत्रिय कुमार आहेत. ते तक्षशिलेहून विद्याध्ययन करून माझ्यासह परत चालले आहेत. "

बोलत बोलत आम्ही लताकुंजांत जाऊन पोंचलों. तेथे दासी बैठकी घालून आमच्या खाण्यापिण्याच्या व्यवस्थेला लागल्या होत्या. आम्हीं बैठकीवर बसलों. नंतर राजकुमारी म्हणाली--

" आम्हीहि क्षत्रियच आहोंत. राजकुमारी असल्ये म्हणून काय झालं ? बरं, सखि रोहिणी, तूं जातीचीच सुंदर असल्यामुळं तुला दागिन्यांनीं सजवण्याची जरूर नाहीं, हें तर मला दिसतंच आहे. पण तुझ्या हातांत एकहि बांगडी नाहीं हें कसं काय ? "

" राजकुमारी, दागिन्यांमुळं आम्हांला कामांत अडचण होते. " आपल्या तळहातांचे व बोटांचे टणक झालेले घट्टे दाखवून रोहिणी म्हणाली--"आम्हांला धनुष्य ताणावं लागतं, खड्ग चालवावं लागतं, शेतांतून व बागेतून कामं करायचीं असतात. त्यामुळं आम्हांला दागिन्यांची अडचणच वाटते. "

त्या हातांकडे पाहून राजकुमारीला फार आश्चर्य वाटलें. कारण तिची समजूत अशी होती कीं स्त्रियांचे सौंदर्य म्हणजे शिरीष पुष्पासारीखे कोमल असतें. तें जराशा उन्हा-वाऱ्यानें कोमेजून जातें. तिनें आपल्या कोमल हातांत रोहिणीचे राकट हात धरून म्हटलें– " तुमच्या कडच्या राजकुमारीहि इतके परिश्रम करतात ? "

" मी राजकुमारी नाहीं. तक्षशिलेची क्षत्रिय कुमारी आहे. "

" नाहीं, तुझ्या बोलण्या चालण्यावरून व तुझ्या निर्भय वृत्तीवरून तूं राजकुमारीच आहेस असं दिसतं. "

" पण त्याचं कारण वेगळंच आहे, राजकुमारी ! गंधार देशांत कोणी राजाहि नाहीं, व कोणी दास-दासीहि नाहीं. तिथं सर्वच क्षत्रिय आहेत. सर्वांचा दर्जा समान आहे. "

" परंतु माझी आजी गांधारी राजकुमारी होती ना ? "

" ती इथं आल्यावर तिला राजकुमारी म्हणत असतील. आमच्या इथं गण-राज्य आहे. राजकुमारी ! आम्ही आमच्या वरती राणी, राजकुमारी, अशा कोणी पहात नाहीं. म्हणून आम्ही आमच्या समवयस्क स्त्रियांशीं बरोबरीच्या नात्यानं वागतों. व हीच रीत आम्हाला ठाऊक. "

राजकुमारीला या गोष्टी ऐकून आश्चर्य व थोडासा अविश्वासहि वाटला. परंतु त्याचबरोबर रोहिणीच्या निळ्या डोळ्यांतील सत्यतेची भावनाहि तिला दिसली. यावेळीं जेवणाच्या सर्व वस्तु वाढून झाल्या होत्या. म्हणून राजकन्येनें आम्हांला तिकडे बोलावलें. पांचाल हा प्राचीन राजवंश आहे. आज-काल सूरसेन ( व्रज ) आणि वत्स [ अलाहाबाद ] येथील राजांमुळें त्याची प्रभुता मंदावली असली तरी देखील कुरु-पांचाल राजवंश अजूनहि दुसऱ्या राजांना राजस चाली-रीती शिकवीत आहेत. पांचालचें राज-भोजन प्रसिद्ध आहे. परंतु तें मला व रोहिणीला तितकेंसे आवडलें नाहीं. तरीहि आम्ही जेवतांना त्याची खूप प्रशंसा केली हेंहि खरेंच.

भोजनानंतर राजकुमारीनें स्वतः व आपल्या मैत्रिणींकडून वीणा वाजवून कांहीं गाणीं ऐकवलीं. रोहिणीनेहि त्यांत भाग घेतला. पण नृत्याची तयारी होत असलेली पहातांच आमची निघण्याची वेळ झाली असें म्हणून आम्ही सुटका करून घेतली. एका राजकुमारीला बराच वेळ अगदीं जवळून पहाण्याची संधी मिळाल्यामुळें रोहिणीच्या एका मोठ्या जिज्ञासेची पूर्ति झाली. पण त्यामुळे राज-स्त्रियांबद्दल तिला वाटणारा आदर मात्र वाढला नाही. राजोद्यानांतून बाहेर पडतांच ती म्हणाली— " ही पण सरस्वती सारखीच म्हैस होऊन बसेल. "

" तें कां म्हणून ? " मी विचारलें.

" पाहिलं नाहींत का? सोळा सतरा वर्षाच्या वयांत तिच्या हनुवटी खालीं किती मांस वाढलं आहे तें ! आणि तिचे ते दागिने पाहून तर मला तिची कींवच आली. केवढा भार तो ? तशी कांहीं राजकुमारी कुरूप नव्हती, तिनं थोडेसे श्रम केले असते, मोकळ्या हवेत राहिली असती, तर आणखीच सुंदर दिसली असती. अन् तें डोळ्यांतलं काजळ तर किती वाईट दिसत होतं. "

" एकंदरींत काय रोहिणी,आज तूं राजकुमारी तर पाहिलीस ना ? "

" हो, पाहिली, अन् डोळ्यांचं पारणंहि फिटलं. आम्ही गांधार कन्यांनीं नुसती फूंक मारली तरी सुद्धां ही उडून जाईल. "

" फुंक मारतांच उडणं ही तर राजकन्येची प्रशंसा आहे. "

" पण त्यामुळंच स्त्रीत्व कलंकित होतं ना. "

" हो, पण राजांना नारीत्व नको आहे. त्यांना करमणुकीकरतां खेळणं पाहिजे, अन् तेंहि एक पुरत नाहीं?"

" काय, एक नाही पुरत."

" नाहीं पुरत; शेंकडों खेळणीं लागतात त्यांना; म्हणजेच त्यांच्या हातीं नित्य नवीं खेळणीं येत राहातात."

" तर मग त्यांच्या लेखीं नारीत्वाचं मूल्य कांहींच नाहीं?"

" मूल्य कां नाहीं? तूं पाहिलं नाहींस? राजकन्येच्या अंगावर किती दागिने लादलेले होते ते?"

" वजन लादणं हेंच मूल्य! ही तर शिक्षा आहे!"

" परंतु राजमहिला याला शिक्षा समजत नाहीत."

" तर काय त्या सगळ्या निर्बुद्ध असतात?"

" प्रिये रोहिणी, राजकुमारी विद्येला पाहून तूं तें सांगू शकशील?"

" मला तरी राजकुमारी इतकी बुद्धिहीन वाटली नाहीं. तिच्या इतर पुष्कळ गोष्टी मात्र अस्वाभाविक वाटत होत्या."

" प्रिये रोहिणी, राजतंत्र [ राजेशाही ] हें नर-नारींचं बंदीगृह आहे. तिथं राजाच्या पुढं कोणाहि मनुष्याला कांहीहि किंमत नाहीं. तिथं नारीत्व हें क्रीडा व कामुकता यांचं खेळणं आहे. तिथं स्वतंत्र मानवांकरतां कुठंच जागा नाहीं."

" प्रियकरा, म्हणूनच वाटतं तुम्हीं राजतंत्राबद्दल इतका तिरस्कार दाखवतां तो!"

" होय, मी त्याला मानवतेचा कलंक समजतों. आणि त्याला आणखीहि एक कारण आहे रोहिणी! आमच्या वैशालीचे भयंकर शत्रु हे राजतंत्रीच आहेत."

" पण प्रिया! हें राजतंत्र या जनपदामध्यें नेहमींच चालत आलं आहे काय?"

" नाहीं, मी म्हाताऱ्या लोकांकडून जें ऐकलं आहे त्यावरून असं समजतं कीं कुरु, पांचाल, काशी, कोसल, चेदी, वत्स इत्यादि सगळे जनपद हे आरंभीं जनांचे किंवा गणांचे निवास होते. नंतर दास-स्वामी आर्य-अनार्य इत्यादि वर्ण-संकरजन्य अंतर्गत कलहांचा फायदा घेऊन स्वार्थी जन-नायकांनीं आपली प्रभुता स्थापन केली."

" हा सौदा फारच महागांत पडला म्हणायचा."

" हो, यांत काय संशय?"

" तर मग प्रिया, तक्षशिलेंत आर्य-अनार्य-वर्णसंकर व दास-स्वामी हा भेद-भाव जास्त असता तर तिथं गण-तंत्र राहिलं नसतं असं तुम्हाला वाटतं का?"

" रोहिणी, वैशालीचीं संकटं आमच्यापुढं उभीं आहेत. आम्ही आपला गण कायम राखला आहे, व त्याकरतां लिच्छवि-कुमार सर्वस्व अर्पण करण्यास तयार असतो. परंतु आम्हाला हें पुरतेपणी ठाऊक आहे कीं आर्य-आर्येतर, दास-स्वामी हा भेदभाव आमच्या मुळावरच येईल. ही गोष्ट मला वैशालीत असतांना समजत नव्हती. तक्षशिलेचा गण इतका लहान असूनहि इतका सामर्थ्यवान असण्याचं कारण मी शोधत असतां हा निष्कर्ष माझ्या लक्षांत आला."

आम्ही बोलत बोलत गंगातीरीं येऊन पोंचलों, तेव्हां प्रहरभर दिवस राहिला होता. सार्थवाले लोक कान्यकुब्जाच्या विक्रीच्या वस्तु नावांवर चढवीत होते. व रात्रीच्या खान-पानाची व नृत्य-उत्सवाची पण तयारी होत होती. कुठें डुक्कर विस्तवावर भाजलें जात होतें, कुठे मसाला वाटला जात होता, तर कुठें सुरा-पानाची तयारी होत होती. आमचा अठरा माणसांचा सार्थहि आपलें मांस व सुरा मोठ्या सार्थाच्या हवालीं करून खाद्य-पेयांच्या तयारींत गुंतलेला होता. शुभ लिच्छवि हे मृदंगाचे आचार्य मानले जात. ते आपला मृदंग नीट करीत होते. सर्वार्थक भीम हा आपली वीणा निर्दोष करण्याच्या तयारींत होता. कपिल चिंतामग्न दिसत होता. मला पहातांच माझ्या खांद्यावर हात ठेवून मला म्हणाला—

" मित्रा, मला वाटलं गांधारीच्यामुळं तुझ्यावर कांहींतरी संकट आलं असावं."

" संकट ? तें कां म्हणून ?"

" त्याचं असं झालं, सर्वार्थक भीमानं सांगितलं कीं राजे जुलूम जबरदस्ती करतात. पर-धन, पर-दारा यांचं अपहरण करणं हा जणूं त्यांचा धर्मच. आणि त्यांत रोहिणीसारखं स्त्री-रत्न ?"

" रत्न ! " भिवया चढवून रोहिणी म्हणाली- " मी कांहीं निर्जीव रत्न नाहीं. कोणी कामुक राजानं माझ्याकडे दृष्टी टाकली असती तर त्याला नारीत्व म्हणजे काय हें दाखवलं असतं."

" होय भगिनी रोहिणी, यांत मुळींच शंका नाही. पण भीमानं सांगितलेल्या गोष्टी ऐकून मला एकीकडे राजांविषयीं तिरस्कार वाटत होता व दुसरीकडे तुम्हांला उशीर झालेला पाहून थोडीशी काळजीहि वाटूं लागली."

रोहिणी—" होय, थोडा उशीर झाला खरा. आम्ही प्रेमाच्या आग्रहांत सांपडलों होतों."

कपिल—" प्रेमाचा आग्रह ? इथं पंचालाच्या राजधानींत ? कान्यकुब्जांत? वैशालीचा किंवा तक्षशिलेचा एखादा बंधू तर भेटला नाहीं ना ?"

" बंधू तर नाहीं, कपिल भैय्या." रोहिणीनें कपिलच्या खांद्यावर हात ठेवून त्याच्या तोंडाकडे पहात म्हटलें—" मी एक राजकुमारी पाहिली बरं का ?"

" राजकुमारी पाहिली? एखादा विचित्र प्राणी तर नव्हता?"

" विचित्र प्राण्यापेक्षांहि विचित्र. पण मला तिची दया येत होती."

" दया?"

" होय, दया. तिच्यामध्यें आम्हां तक्षशिलेच्या कुमारींसारखी सजीवता तर नव्हतीच. ती दागिने लादलेली एखादी निर्जीव बाहुली अशी वाटत होती. ती वृक्ष-हीन लतेसारखी निराश्रित दिसत होती. म्हणून मला तिची दया वाटत होती."

" तर मग मला कां घेऊन गेली नाहींस? मी तिचं आश्रयस्थान बनलों असतों व तुला दया करण्याचा त्रास पडला नसता." कपिलनें हंसून म्हटलें.

रोहिणीनें गंभीर मुद्रेने म्हटलें—" नाही, कपिल दादा, थट्टा करूं नको. मला तिची बुद्धिहीनता व नारीत्वाचं अज्ञान बघून वाईट वाटलं."

कपिलनें रोहिणीच्या केसांतून बोटे चाळवीत म्हटलें—" बाळ रोहिणी, मी स्त्रीचा अपमान पाहिला आहे पार्शव [इराण], बबेरू [बाबिलोनिया] व इतर पश्चिमेकडील लोकांत स्त्री ही कामुक लोकांच्या हातचा चेंडू समजली जाते. गण हाच एक असा आहे कीं तिथं स्त्री या नात्यानं नारीत्वाचा सन्मान होतो."

त्या दिवशी रोहिणीला खरोखरच राजकन्येबद्दल वाईट वाटत होतें. जेवणा-खाण्यांत तर तिनें भाग घेतला पण नृत्य-संगीताच्या वेळीं तिचें डोकें दुखूं लागलें म्हणून मी तिला घेऊन नावेंतून थंडगार हवेत गेलों. जरा वेळ डोक्यावर गंगेचें गार पाणी घातल्यावर तिला जरा बरें वाटलें. नंतर दुधासारख्या पांढऱ्याशुभ्र चांद-ण्यांत, गंगेच्या सफेत पाण्याच्या प्रवाहांत थांबलेल्या नौकेंत रोहिणीच्या शेजारी बसून मी तिला विरंगुळा आणण्याचा प्रयत्न करीत होतों. पण रोहिणीला मध्येंच राजकुमारीची आठवण होई व ती म्हणे—

" बिचारी अज्ञान बालिका! माझे खरबरीत हात पाहून तिला वाईट वाटलं! सौंदर्य हेच स्त्रीचं जीवनसर्वस्व आहे अशी तिची समजूत आहे!! धिक्!"

" प्रिये! धिक्कार तर खराच, पण त्यांत स्त्रीचा तितकासा दोष नाहीं. तिला जर सिंधू नदाच्या किनारीं पार्शवांशीं लढावं लागलं असतं, तर ती सुद्धां गंधार कुमारींप्रमाणं सुवीरा व स्वावलंबी झाली असती."

" हो, पण स्त्रीला बुद्धि तर आहे. रूपाला कितपत चांगलं वाईट समजायचं हें तर तिला कळलं पाहिजे!"

" होय, बुद्धि तर या हजारों इतर प्रजेला पण आहे. मग ती राजाच्या हातची बाहुली कां झाली?"

या गोष्टींमुळें तिचें मन जास्तच उद्विग्न झालेलें पाहून मी दुसऱ्याच गोष्टींत तिचें मन गुंतवायचें ठरवलें. आणि तिच्या मस्तकावर हात फिरवीत मी सांगू लागलों—

" प्रिये, आतां आपण तक्षशिलेपेक्षां वैशालीच्याच जास्त जवळ आलों. "

" जवळ आलों ? तुम्ही तर आठ महिन्यांनीं तक्षशिलेला पोंचलां होतांत ना ?"

" त्याला कारण मला खुष्कीच्या मार्गानं जावं लागलं. तक्षशिला सोडल्याला दोन महिन्यांच्या वर दिवस झाले. मला वाटतं आणखी एक महिन्यांत आपण वैशालीला पोंचूं. "

" इतक्या लौकर ? "

" होय. कारण आमच्या नावा फार वेगानं अन् रात्रंदिवस चालल्या आहेत. "

" महिन्याभरानं वैशाली. नतर मी आईना पाहीन. "

" होय, अन् सोमालाहि. मी तुझ्याविषयीं आईला लग्नाचे वेळीं लिहिलं तर होतं. पण कोण जाणे तें पत्र आईला मिळालं कीं नाही. "

"तर मग मी एकदम जाऊन दरवाजांत उभी राहिल्ये म्हणजे ती काय म्हणेल?"

" अशी सुंदर सोन्यासारखी सून पाहून तिला आनंदानं स्वर्ग दोन बोटं राहील. पण प्रिये, तसं होईलसं वाटत नाहीं, कारण गंगा व गंडकी यांच्या संगमावर पोंचतांच आम्हांला वैशालीला सूचनेकरतां पुढं स्वार पाठवावा लागेल. कारण आमच्या बरोबर तक्षशिलेचं नागरिक मंडळ आलेलं आहे ना, त्यांच्या स्वागताकरतां लिच्छवींना सवड तर दिली पाहिजे ना ! "

" तर मग गंगेच्या कांठीं आपण त्यांची वाट पहात थांबायचं. निदान मला तरी शुभच्या बरोबर पुढं पाठवा. "

"गंगेपासून पुढं वैशालीला जाण्यास दोन रस्ते आहेत. एक तर उल्काचेल [ गंगेच्या डाव्या कांठावरचें स्थान ] पासून स्थलमार्गानं व दुसरा गंडकीं [मही] तून जलमार्गानं वैशालीच्या अगदी नजीकच्या स्थळापर्यंत; तेथून पुन्हां स्थलमार्गानं वैशाली. पण या दुसऱ्या रस्त्यानं थोडा जास्त वेळ लागतो. "

" आम्ही अठरा माणसं आहोंत. आणि आमच्या जवळ बारा घोडे आहेत. "

" प्रिये, त्याची काळजी करूं नको. आणखी सहा घोडे आपल्याला उल्काचेलहून मागवतां येतील. शिवाय नजराण्यांत आलेले दहा घोडे रिकामेच न्यायचे आहेत. म्हणजे आम्हांला सोळा घोड्यांची गरज आहे. पण ते अगदीं सहज मिळतील. "

" प्रिया, तर मग इतका उशीर कशाकरतां ? "

" नागरिक मंडळाच्या स्वागताकरतां. पण रोहिणी, तुला तरी एवढी घाई कसली झाली आहे ? "

" मला आईंना अन् सोमाला लौकर भेटायचं आहे. "

" परंतु मी वाटेंत तुला वज्जीदेशाचं सौंदर्य दाखवणार आहे. पांच सहा दिवसांत आम्हीं हळू हळूं वैशालीला पोंचूं. त्या वेळांत तुला वज्जीच्या सुंदर आंबराया, व केळींच्या बागा पहायला मिळतील. मी तुला गोपालांच्या गोष्ठांत घेऊन जाईन. हरिण व मोरांच्या शिकारी करवीन. या पांच सहा दिवसांत वज्जीदेशातलं तूं इतकं पहाशील कीं तुला वैशाली परकी अशी राहाणार नाहीं. "

" मी ती परकी असतांनाच जावं म्हणत्यें. त्यांत जास्त आकर्षण व अपूर्वता आहे असं मला वाटतं.

रोहिणीचें डोकें दुखणें कोण जाणें कुठे गेलें ! ती तेथून लौकर निघण्याचा आग्रह करीत होती. मी तिच्या ओंठांचें चुंबन घेऊन म्हटलें—

" प्रिये, ठीक आहे तर. तूं मला सोडून पुढं जावं म्हणतेस ना ? "

" तुम्हांला तर नागरिक मंडळाबरोबर कशाहि स्थितींत यावंच लागेल. "

" अन् तुलाहि तक्षशिलेच्या नागरिक मंडळांत कां सामील करून घेऊं नये ? "

" आतां सामील करून भागायचं नाहीं. "

" पण रोहिणी, माझी अशी इच्छा होती कीं आपण दोघांनीं एकदम आईच्या समोर जावं. जाऊं दे, तुझ्या इच्छेप्रमाणंच का होईना. तर मग तूं शुभच्या बरोबर जा. मी आपला घोडा शुभला देईन. तुम्हीं दुसऱ्याच दिवशीं वैशालीला पोंचाल. "

" होय प्रियतमा. " असें म्हणून तिने माझ्या गळ्याला मिठी मारली. व ती म्हणाली– " अन् मी पुढं जाऊन आपणां दोघांकरतां एक घर तयार करीन. "

" घर तर आईकडे मिळेलच. पण प्रिये, आपल्याला तर आपलं स्वतःचं घर आधीं नीट केलं पाहिजे—म्हणजे पित्याचं घर. "

" पित्याचं घर ? "

" होय. मी गेलों त्यावेळीं तें फक्त उभं होतं. आई त्याच्यावर देखरेख करीत असे. वैशालीच्या बाहेर आमचा एक लहानसा कर्मान्त [ जमीन ] आहे. "

" आणि बागहि आहे ? "

" होय, आमच्या कर्मान्त भूमींतच आंबराई पण आहे एका बाजूला. माझे पिताजी फार श्रीमंत नव्हते. पण त्यांना स्वतःला खाण्यापुरती जमीन होती."

" प्रिया, पित्याच्या गरीबीबद्दल तुम्हांला वाईट वाटतं ? "

"नाहीं, पित्याचं माझ्यावर फार प्रेम होतं. अन् गरीबी वाईट नाहीं. कारण तिच्यामुळंच माझ्यांत साहस व कष्ट-सहिष्णुता उत्पन्न झाली. "

" तर मग आपल्याला आपलं घर व आपला कर्मान्त तयारच करायचा आहे म्हणा ना. "

" आणि वैशालीच्या सेवेसाठींहि कंबर कसून तयार व्हावं लागेल बरं का."

" प्रिया, म्हणजे काय ? बिंबिसार वैशालीवर आक्रमण करीलच असं तुम्हांला खरोखरच वाटतं का ? "

" यावेळीं वैशालीचा पराभव केल्याशिवाय मगध देशाला एक पाऊलहि प्रगति करतां येणार नाहीं. मला वाटतं कीं त्याची सैन्याची तयारी फक्त वैशाली कर-तांच आहे. "

" प्रिया, तर मग आपण अगदीं वेळेवरच आलों म्हणायचे. "

" मलाहि असंच वाटतं. "

" तर मग मलाहि खड्ग बांधण्याची जरूर पडेलच ? "

" होय, असं वाटतं खरं. लिच्छवि स्त्रियांत लढाऊ पेशा पत्करणाऱ्या अगदींच कमी असल्या तरी तुला स्वस्थ नाहीं बसतां येणार. इकडचे राजे फार नीच असतात. विशेषतः स्त्रियांच्या बाबतींत तर फारच नीच असतात ते. "

" मग काय मला पेटींत बंद होऊन पडावं लागेल ? " जरा आवाज चढवून रोहिणी म्हणाली.

मी तिचें मस्तक माझ्या मांडीवर घेऊन म्हटले— " नाही प्रिये, असा कसा अर्थ केलास तूं ? मी म्हणत होतों कीं मला त्याची सूचना प्रथम मिळायला पाहिजे. "

" मी पण तेंच म्हणत्ये; माझ्या हाताला खड्गाचा घट्टा सतत राहो अशीच माझी इच्छा आहे. "

पुष्कळ वेळ आमच्या गोष्टी चालल्या होत्या. नंतर रोहिणीला झोंप लागली. मी तिच्या अंगावर पांघरूण घातलें. किनाऱ्यावर अजूनहि नृत्य चालूं होतें. लोक झिंगून मस्त झाले होते. लवकरच नावा सोडायच्या होत्या म्हणून मला अशी भीति पडली कीं सकाळपर्यंत हें लोक नाचतच राहणार कीं काय ? पण मध्यरात्रीचे आंतच कित्येक नाविक नशेनें बेहोश झाले व त्यांना त्यांच्या त्यांच्या नावेंत पोंचवण्यांत आलें. मग मलाहि कोण जाणे केव्हां झोंप लागली. मी रात्रीं एक स्वप्न पाहिलें. एक मोठें युद्ध चालूं आहे. जवळून पाहिलें तों एकीकडून लिच्छवी लढत आहेत. मी घोड्यावर स्वार झालों होतों. मी महासिंधूतटीं ज्या हत्यारांनीं लढलों होतों, तींच हत्यारें माझ्याजवळ होतीं. मी शत्रुसैन्याची फळी फोडून पुढें गेलों. पाहिलें तों एक हत्ती येत आहे. हत्ती दूर होता. व ताडमाड उंच होता. इतक्या मोठ्या हत्तीला माझा भाला कसा पोंचणार अशी मला काळजी वाटली. तेवढ्यांत मला असें दिसून आलें कीं माझा घोडा जमिनीवर चालत नसून हवेंतून अंतराळीं चालत आहे. माझ्या लगामाच्या इशाऱ्यांवरून घोडा झाडावरून धावूं

लागला. मी सरळ हत्तीच्या डोक्यावर पोंचलों. पाहिलें तों त्यावर मगधराज बिंबिसार आहे. तो मला पाहून भीतीनें कांपूं लागला. दयेची भिक्षा मागूं लागला. मी उत्साहित होऊन म्हणत होतों—" एक वेळ तुला पराभव करून सोडून दिलं होतं; पण आतां सोडणार नाहीं. " असें म्हणून मी आपला भाला सरसावला. तोंच झोंप उघडली. पाहिलें तों नावा सोडण्याची तयारी चालली आहे व चंद्र अस्ताला जाण्याच्या बेतांतच आहे.

आमची नाव पुन्हां पहिल्यासारखी जोरांत सुरूं झाली. वाटेंत दोन तीन ठिकाणीं थांबून आम्हीं वाराणसीला पोंचलों. वरुणा व गंगा यांच्या संगमावर वसलेल्या वाराणसीचा गंगेच्या किनाऱ्याचा भाग फारच सुंदर दिसत होता. इथें आमचा सार्थ चार दिवस थांबणार होता. कारण वाराणसीची दुर्मिळ काशिक वस्त्रें, काशिक चंदन, गंध इत्यादि वस्तु जगप्रसिद्ध आहेत. पुढला मार्ग निष्कंटक असल्यानें रोहिणीला काशीमधील पहाण्यालायक जागा दाखवून आम्हीं अठराजण आमच्या दोन नावा घेऊन पुढे निघालों.

गंगा किनाऱ्यावर जागजागीं पुष्कळ लांबपर्यंत हिरवीं पिकें उभीं होतीं. कुठें कुठें गोपालांच्या कुटिका आणि कोळयांच्या झोंपड्या दिसत होत्या. रोहिणीला या सर्वांपेक्षां जास्त आकर्षक गंगेचा गंभीर व स्वच्छ प्रवाहच वाटत होता. सों सों करणाऱ्या लाटा तिचे मन ओढून घेत होत्या. वाळूवर ऊन खात स्वस्थ पडलेल्या मगरांना ती कित्येक वेळां काळीं लाकडेंच समजे. पण नाव जवळ येतांच ते सुर्रकन पाण्यांत शिरत. तेव्हां ती त्यांच्याकडे मोठ्या कुतुहलानें पाही. मी तिला सांगितलें कीं हे कित्येक वेळां माणसांना पकडून गिळून टाकतात. तेव्हां तिच्या अंगावर कांटा उभा राहिला. गंगा-मही संगमावरून दोन दिवसांनीं प्रहरभर दिवस झाला असतां आम्हीं उल्काचेलला [ हाजीपूर ] येऊन पोंचलों.

---

( १२ )

# लिच्छवींच्या भूमींत

उल्काचेलला पोंचतांच आम्हां सहा लिच्छवींना व रोहिणीला खूप आनंद झाला. तीन महिन्यांचा संकटमय प्रवास करून शेवटीं एकदाचे घराला-वज्जीला आमचे पाय लागले. किनाऱ्यावर पोचतांच शौल्किक [ जकात घेणारा अधिकारी ] येऊन उभा राहिला. मी तक्षशिलेचें नागरिक मंडळ व उपायन [ नजराणा ] वगैरे संबंधीं हकिगत त्याला सांगितली. लिच्छवि फार प्रसन्न झाला व मला घेऊन लगेच तो सेनापतीकडे निघाला. सेनापति माझ्या पित्याचे परम मित्र रोहण हेच होते. त्यांना पाहून मला फार आनंद वाटला. गंगेच्या पलीकडल्या तीराला मगध असल्यामुळें उल्काचेल हें सरहद्दीचें ठिकाण होतें. म्हणून लिच्छवींची सीमान्त-सेना इथेंच राहात असे. मला पहातांच सेनापति रोहण यांचे डोळे भरून आले व त्यांनी मला कवटाळून व माझ्या कपाळाचें चुंबन घेऊन म्हटलें-

" मुला ! तूं अगदी वेळेवर आलास. यावेळी वैशालीला तुझी अत्यंत जरूर होती. "

मी स्वतःविषयीं थोडेंसें व तक्षशिलेचें नागरिक मंडळ व नजराणा याविषयीं सर्व गोष्टी सांगितल्या. नंतर सेनापति रोहण म्हणाले-

" तर मग मुला ! वैशालीला आत्तां एक स्वार पाठवतों. दोन घटकांत आमचं पत्र जाऊन पोंचेल. मी पत्र लिहितों. तुलाहि लिहायचं असल्यास लिही. हें ताडपत्र, लेखणी, मसीपात्र [ दौत ] इथं आहे तें घे. आणखी कांहीं हवं आहे का ? "

" शकटांवर भेटीच्या वस्तु, व त्यांच्या बरोबर दहा घोडे अगोदर पुढं जायला पाहिजेत. कारण चार योजनं वाट चालायला त्यांना जास्त वेळ लागेल. "

" मुला ! आणि शिवाय आम्हांला स्वागताची तयारी करण्याकरतां वेळहि मिळाला पाहिजे. तक्षशिलेला मी कधीं गेलों नाहीं पण आम्हां लिच्छवींना नेहमींचीच ती चांगल्या परिचयाची आहे. पिढ्यानुपिढ्या तक्षशिलेला लिच्छवि हे मातेप्रमाणं मानीत आले आहेत. गंधारगणाच्या नागरिकमंडळाचं स्वागत करायची

ही पहिलीच संधी आम्हांला मिळाली आहे. प्रथम पत्र लिही, मग इतर आवश्यक गोष्टींचा विचार करू. ”

मी एक पत्र आमचे गण-पति सुनंद यांना व दुसरें आईला अशीं दोन पत्रें लिहिलीं. गण-पतींना जरा विस्तारानें लिहिलें व आईला रोहिणीसह लौकरच येतों असें लिहिलें. उल्काचेल पासून एक एक योजनावर एक एक स्वार रात्रंदिवसाचे ठेवलेले आहेत. प्रत्येक स्वार पुढल्या स्वाराचे हातीं दौडत जाऊन पत्र देतो. अशा व्यवस्थेमुळें चार योजन रस्ता काटण्यास किती वेळ लागणार ? सेनापतींनीं पत्र थोडेसें विस्तारपूर्वक लिहिले. त्यावर आपली मोहोर केली,नंतर ताडपत्राची घडी करून ती दोरीनें बांधून त्याच्या जोडावर मऊ मातीची गोळी चिकटवली. त्यावर एक मोठी मोहोर करून तें पत्र स्वाराचे हातीं दिले व त्यास वैशालीला जाण्याची आज्ञा दिली. त्या कामांतून मोकळे झाल्यावर ते मला म्हणाले—

“ आतां पहिल्यानं तुमची सर्वांची दुपारच्या जेवणाची व्यवस्था करतों. किती माणसं आहेत ? ”

“ नागरिक मंडळाचीं दहा माणसं, त्यांतच सेनापति कपिल व इतर सैनिक आहेत. शुभ व इतर चार असे लिच्छवि-पुत्र युद्ध-विद्या शिकून वैशालीला परत जात आहेत ते. मी व माझी स्त्री रोहिणी— ”

“ तुझी पत्नी ! माझी पुत्र-वधू ! तक्षशिला-- ” असें म्हणून पुन्हां एकदां मला आलिंगन देऊन ते म्हणाले-- “ मुला, तूं तक्षशिला व वैशाली यांचा संबंध आणखी दृढ केलास. आपल्यांमधील साठ योजनाचं अंतर हें आमच्या दृढ संबंधावर परिणाम करणार नाही, असा आम्ही प्रयत्न केला पाहिजे. बरं आहे. मी तुझ्या काकीला कळवून येतों; घरांत गेल्यावर सुनेच्या विशेष स्वागताची तरतूद करील ती. अठरा माणसाना आज ओदन [ भात ] आणि शूकर मार्दव [ डुकराच्या पोराचें मांस ] हा कसा काय बेत होईल ? ”

“ वा ! ठीक आहे काका ! ”

“ दहा घोड्यांना दहा सईस हवेत. अन् गाड्या किती ? ”

“ पांच पुरेशा होतील. ”

“ तर मग पाच गाड्या अन् पांच गाडीवान. घोड्यांच्या बरोबर मी आपल्या सारथ्यांना पाठवतों. आजानीय [ जातिवंत ] सैंधव घोडे इथं कुठले यायला ! ”

“ अन् काका, हे तक्षशिलेचे आजानीय [ जातिवंत ] घोडे आहेत. ”

“ गाड्यांच्या बरोबर मी सेनानी तिष्य याला पाठवीन. त्याच्या बरोबर पांच सैनिकहि राहतील. बसायला घोडे किंवा रथ जें हवं तें मिळेल. मी आतांच सेनानी तिष्य यांना सांगायला जातों कीं घोडे व सामान नावेंतून उतरून लगोलग वैशालीकडे

रवाना करा. तोंपर्यंत तूं आपल्या काकीला जाऊन भेट. नंतर आपण दोघेहि घाटावर अतिथीच्या स्वागताकरतां जाऊं."

सेनानायक असें म्हणून व आचाऱ्यास जेवण लौकर करण्याची आज्ञा देऊन बाहेर गेले. मी 'काकी' अशी हांक मारीत अंगणांत गेलों. दासींनीं अगोदरच सिंह आल्याची सूचना दिलेली होती. त्या आवाज ऐकतांच धांवतच आल्या, आणि मला आलिंगन देऊन कपाळाचें चुंबन घेऊन रुद्ध कंठानें म्हणूं लागल्या--

"मुला! तुझी कित्येक वर्षांत कांहीच बातमी नाही मिळाली. परवां मी गण-समज्या [महोत्सव] निमित्त वैशालीला गेले होत्ये. तेव्हां मल्लिकाताई विषण्ण होऊन म्हणत होती कीं सिंहाची कांहीं बातमीच मिळत नाही. मुला, तुला घर सोडून बारा वर्षं झालीं ना!"

"नाहीं काकी, दहाच वर्षं."

"बरं बाबा, दहा वर्षं काय थोडी झाली! सोमाहि फार रडत असते. बाळ! तुला ठाऊक नसेल कीं सोमा--माझ्या बहिणीची मुलगी--माझी सून झाली आहे. शूर-सेन व सोमा यांनी जेव्हां लग्नाला आमची सम्मति मागितली तेव्हां आम्हा सर्वांनाच फार आनंद झाला. सोमा व शूरसेन तुला वैशालीला भेटतील. अन् बाळ! तुझं तोंड रे किती सुकलं आहे. अग काली! माझ्या मुलाचं सुकलेलं तोंड दिसत नाहीं का? जा मधुगोलक [लाडू] व कढत दूध--"

तेवढ्यांत काका येऊन पोचले व तिचें बोलणें थांबवून ते म्हणाले--'मुला-चीच तेवढी काळजी करतेस! अन् सुनेच्या थकव्याचा काहीं विचार आहे कीं नाहीं?"

"सून! होय बाळ? लग्न करून माझ्या सुनेला आणलीस होय?"

"होय होय, बायकोला घेऊनच आला आहे. घाटावर सूनबाई व इतर सोळा पाहुणे यांना आणण्याकरताच आम्ही चाललो आहोंत. मी सुनीथला दुपारच्या जेवणाची सूचना दिली आहेच; पण सुकुला! तें तुझ्या अधिकारांतलं काम आहे. सुनेच्या स्वागताची तयारी कर जा. चल बाळ जाऊं या. लोक घाटावर आपली वाट पहात असतील. शौल्किकानं त्यांना उतरून घेण्याची व्यवस्था केलीच असेल; पण त्यांना इथं लौकर आणावं हे बरं."

आम्ही दोघे सेनानायकांच्या प्रासादांतून निघून घाटावर गेलों. तिथें पहातों तों शौल्किक आपल्या सुंदर गवती झोंपडीत त्या सोळाजणांना नेऊन दूध व लाडू देऊन आदरातिथ्य करण्यांत दंग झाला आहे. दुसरीकडे सेनानी तिष्य नावांतून सामान काढवून गाड्यावर लादवीत होते. घोडे काठावरील हिरवे गहूं मोठ्या आव-डीनें खात होते. सेनानायक म्हणाले--

" बाळ सिंह, तूं घाटावरच थांब. तुला तिकडे काकीकडेहि खाऊं दिलं नाहीं, अन् इथं शौल्किक मनोरथचाहि पाहुणचार घेतां आला नाहीं. दोन्हीकडचा पाहुणा उपाशी अशी स्थिती झाली तुझी. "

मनोरथनें सेनानायकाचें बोलणें ऐकून म्हटलें—

" नाहीं आर्य, सुनेला भामानं घरांत नेलं आहे. बायका बायकांचीच बाजू घेणार हें तर ठाऊकच आहे. अन् आयुष्मान् सिंहालाहि तिकडे बोलाबलं आहे. "

" मग काय, बिचाऱ्या सुकुलाचे मधुगोलक व दूध तिथल्या तिथंच राहणार तर ! बरं असो ! बाळ, जा तूं त्यांच्या घरी. " काका म्हणाले.

नंतर तक्षशिलेच्या मंडळीकडे जाऊन ते त्यांना म्हणाले--

" बंधूनो ! लिच्छवीच्या भूमीवर त्यांचा सेनानायक रोहण आपलं स्वागत करीत आहे. या वज्जीभूमीला आपली गंधार भूमीच समजा. इथं आपल्याला कांहीं त्रास तर झाला नाही ना ? "

दुग्धपान संपले. नंतर मी प्रथम सेनानायक कपिल याचा परिचय करून दिला. त्याला रोहण काकानी आलिंगन दिलें. नंतर बाकीच्या नऊ नागरिकांची व शुभआदि लिच्छवि कुमाराची ओळख करून दिली. काकांनीं सर्वांना आलिंगनपूर्वक भेटून कुशलवृत्त विचारले. नंतर मला शौल्किक मनोरथांनीं आपल्या घरीं नेलें. तें एक अस्थायी पर्णकुटीर असूनहि पुष्कळच स्वच्छ व सुखद असें होतें. आमच्या पायाची चाहूल लागतांच भामा धांवत बाहेर आली--

" सिंह भावोजी ! तुमचं स्वागत असो. या सूनबाई तुमचीच वाट पाहात आहेत. "

आंत जाऊन पाहिलें तों फराळाची तयारी करून ठेवलेली दिसली. आम्हीं चौघेहि आसनावर बसलों. मनोरथ माझ्याहून एकच वर्षानें मोठे होते. म्हणून भामाला धाकट्या दिरावर अधिकार गाजवायला मिळाला. तिनें माझ्या गालाला गाल चिकटवून म्हटले--

" सिंह भावोजी ! मी तुमची वाट पाहिली, तुम्ही आलां नाहींत. नंतर वाटलं कीं अशीच म्हातारी होऊन जाईन. मग कोणी लिच्छवि विचारणारहि नाहीं अशी भीति वाटली. शेवटीं पराभूत होऊन नाईलाजानं मनोरथांचा हात धरला. "

" अन् तरीहि घरांतच राहिलीस ना वहिनी ? "

" होय भावोजी, पत्नी व वहिनी यांत अंतर थोडंच आहे. "

रोहिणी जरा चकित होऊन पाहात होती. भामानें तिच्या हनुवटीला हात लावून म्हटलें--

" रोहिणी, तुला ईर्ष्या वाटते होय ? मी सिंहांना तुझ्यापासून हिरावून घेत नाहीं. आणि समजा हिरावून घेण्याचा विचार केला तरी तुझ्यापुढं माझ्यासारख्या म्हातारीला विचारतं कोण— "

आम्हांला उशीर झालेला पाहून सेनानायक येऊन म्हणाले— " मी पाहुण्यांना घेऊन पुढं जातों, तुम्ही सावकाश या. पण जेवणाच्या वेळेपर्यंत मात्र येऊन पोंचा हं. तुझी काकी मधुगोलक अन् दूध घेऊन तुम्हां दोघांची वाट पहात उतावळी झाली असेल; पण मी तिची समजूत घालीन. अन् मनोरथ, तुम्ही दोघेहि या बरं का. "

रोहिणी उत्तर देतां देतां थांबली होती. मी तिचा हात धरून तिला अंगणांत नेले. अन् त्यावरून ती कोण आहे हे काकांना कळून चुकलें. त्यानीं तिच्या खांद्यावर हात ठेवून तिच्या कपाळाचें चुंबन घेतले. नंतर आनंदी स्वरांत म्हटलें--

" मुली, तुझं स्वागत असो. तुझी आई—सोमाची सासू—सुकुला तुझी वाट पाहात आहे. बेटा सिंह, लवकर या. " असें म्हणून काका निघून गेले.

वहिनीची अडकित्त्यासारखी चालणारी जीभ—जी मधें थाबली होती—ती पुन्हां सुरूं झाली.

" हं, काय म्हणत होत्यें मी, हो, तुला वाईट वाटूं देऊं नको. आमच्या प्रेमाची सीमा इतकीच गेली होती की नृत्याच्या वेळीं सिंहांनीं माझ्या गालाचं चुंबन घेतलं होतं. प्रिय मनोरथ, हें रहस्य ऐकून तुम्हीं माझा तिरस्कार करणार नाहीं अशी मी आशा करत्यें. "

" रहस्य अन् घृणा ! लिच्छवि तरुण-तरुणींमध्यें कोणी कोणाच्या गालाचं चुंबन घेतलेलं नाहीं ? " मनोरथ म्हणाले.

" तुम्हीं मोठे उदार आहांत मनोरथ ! "

" भामा आतां तूं दिराला सोडून आपल्या पतीबरोबरच भाडूं लागलीस. ती रोहिणी काय म्हणेल ? "

" काय म्हणणार ? एवढंच म्हणेल कीं बिचारी भामा फार दुःखी आहे. तिचा पहिला प्रेमी तक्षशिलेला पळून गेला. अन् म्हातारपणांत मिळालेला पति तिची तिळाएवढीहि पर्वा करत नाहीं. "

" वहिनी ! तूं म्हातारी केव्हांपासून झालीस ? माझ्याहून फक्त पांच वर्षांनींच काय ती लहान, अर्थात रोहिणीहून तीन वर्षांनीं मोठी. " मी म्हणालों.

" वर्षांशीं काय करायचं भाऊजी ? "

" तर काय, तुझे भुंग्यासारखें काळे केंस अजूनहि तसेच आहेत. तुझे गाल–जरा पाहूं " असें म्हणून मी तिच्या गालांचें चुंबन घेतलें– " हं, तुझे गालहि

तसेच गुलाबी व गोड आहेत. तुझी मान थरथरत नाहीं. अन् तुला काठी घेऊन चालावंहि लागत नाहीं. अन् तुझे दांतहि पडलेले नाहींत. भामा वहिनी ! मी तर तुला होती तशीच पाहतों आहे. जणूं कालच सोडून गेलों होतों. ”

“ चांगलं ! सोडून गेलों हें तरी तुम्हींच कबूल केलंत. आणि मनोरथ तर रोजच सोडून देण्याची धमकी देत असतात. ”

“ भामा ! पुन्हां माझ्यावर शेकलंच का ! मनोरथला बांधून ठेवायला तुझ्या डोक्याचा एकच केंस पुष्कळ होईल हें तुला ठाऊक आहे. अन् शिवाय रोहिणीला काय वाटेल ? ”

“ तिला काय वाटणार ? ” असें म्हणून भामानें रोहिणीला घट्ट मिठी मारली. ती माझी धाकटी बहीण आहे. ती म्हणेल मोठ्या बहिणीला बडबडण्याचा रोग जडलाय. नाहीं का ग ? तुला तर भीति नाहीं ना वाटत कीं तुझ्या सिंहाला मी आपल्या पदरांत—किंवा माझ्या स्वामींनी म्हटल्याप्रमाणं केंसांत—बांधून घेईन ? ”

“ नाहीं भगिनी, तुमच्यावर माझा पूर्ण विश्वास आहे. ” रोहिणीनें हंसत हंसत म्हटले.

“ नाहीं नाहीं ! नंतर तुला पश्चात्ताप वाटेल. माझ्या हाती सिंहाला सोंपवूं नको. ”

“ भगिनी, स्वतःलाहि ! ”

“ भगिनी, तूं मोठी चतुर आहेस ! तुझे सोनेरी केस माझ्या निळ्या केंसांपेक्षां जास्त मौल्यवान आहेत. ”

“ ताई, सोनं जास्त मौल्यवान असतं. पण लोखंडात शक्ति जास्त असते. ”

“ तर मग तुला खरोखरच भीति वाटते म्हणायची. अन् मला वाटतं माझ्या बोलण्यानं मनोरथहि भ्याले असावे. भिऊं नका प्रियतमा ! ” ( मनोरथाच्या मिशाळ ओठांचें चुंबन घेऊन ) “ मी तुम्हांला माझ्या केशपाशांतून मुक्त करीन. अन् पाहिलंस रोहिणी, मनोरथाच्या बाबतींत मी जी उदासीन असत्यें त्याचं मुख्य कारण म्हणजे त्याच्या या लांब मिशा. त्या माझ्या ओठांना टोंचतात. तेच सिंहांचे श्मश्रुहीन ओंठ पहा ना, किती कोमल आहेत ! ”

“ बरं बाबा, मी उद्यांच मिशा काढून गुळगुळीत ओंठ करतों. मग तर झालं. ”

“ पाहिलंस रोहिणी, आज नाहीं उद्यां अशीं युगं घालवलीं, याचा उद्यां कांहीं येतच नाहीं. यांनीं कुठं तरी सरहद्दीवर सेनानायक व्हावं असं मला वाटतं. अन् हे तर इथं वजनं मापं करीत बसले आहेत. याचाहि मला मोठा राग येतो. रोहिणी, तूंच सांग, यांच्या हातांत तलवार चांगली दिसेल का तराजू ? ”

" पण वहिनी ! " मी सांगू लागलों. " यांत बंधू मनोरथाचा काय अपराध ? गणाच्या इच्छेनुसार आमच्या हातीं पाहिजे तर खड्ग येईल किंवा तराजू येईल. खड्ग व तराजू यांत लिच्छवी फरक मानत नाहींत. "

" भाऊजी, मी तुम्हांला नाहीं विचारलं ! पाहिलंस रोहिणी, पुरुष पुरुषांचा किती पक्षपाती असतो तो ! आपण दोघींनीं एक झालं पाहिजे. नाहीं तर घरांतलाच शत्रु उत्पन्न झाल्यावर आमचा निभाव लागणं कठीण होईल. "

" होय ताई, मलाहि असंच कांहींतरी दिसतं आहे. मी नेहमीं तुलाच साथ करीत राहीन. "

भामानें रोहिणीचें चुंबन घेऊन म्हटलें—"तर मग आपण नक्कीच विजयी होऊं. अन् शिवाय मला आणखी एका गोष्टींत तुझी मदत पाहिजे. हे लिच्छवि मोठे गर्विष्ठ आहेत. ते आम्हां स्त्रियांना लिच्छवियांनी म्हणायलाच तयार नाहींत. आम्हीं कांहीं लिच्छवि कुमारिकांनीं म्हटलं की मगधविरोधी युद्धासाठीं आम्हांलाहि सैन्यांत भरती करून घेतलं पाहिजे. तर हे वेगवेगळे बहाणे सांगतात. "

" तर मग भाई मनोरथ ! मगधाच्या बाजूनं युद्धाची भीति आहे म्हणायची. " मी विचारलें.

" बहुतेक आहे. लिच्छवि कुमार सशस्त्र होऊन आजकाल युद्धाच्या तालमी करीत आहेत. युद्ध कोणच्याही दिवशी घोषित केलं जाईल. आह्मी बागमती व गंगा किनाऱ्याजवळ मगधांचे कित्येक गुप्त हेर पकडून कैद केले अन् त्यांच्या बदल्यांत आमचे कित्येक व्यापारी नागरिक बिंबिसारनं पकडून ठेवले आहेत. "

" तर मग मी वेळेवर आलों म्हणायचा. "

" होय, बरोबर, अन् लौकरच कोणीतरी म्हातारा लिच्छवि शौल्किक [ जकात अधिकारी ] म्हणून येईल व मला तराजू सोडून खड्ग उचलावं लागेल. "

भामानें चटकन आपल्या पतीच्या ओठांचे चुंबन घेतलें. व ती प्रसन्नवदन होऊन ह्मणाली—

" तर मग प्रियकरा, ही गोष्ट माझ्यापासून कां लपविली ? "

" कारण तूं स्त्री आहेस. "

" हो, आमच्या पोटांत गोष्टी राहात नाहींत. पाहिलंस रोहिणी ! या पुरुषांच्या मनांत आमच्याबद्दल काळंबेरं कसं असतं तें ! "

" मी हरलों अन् तूं जिंकलंस भामा, झालं ! तूं मात्र हवी तशी थट्टा करावीस, अन् मला एकदांहि संधी देऊं नयेस का ? "

" माझ्या मनोरथा, प्रथम थट्टा कशी करावी हें तर शिकून घ्या. "

" कोणाजवळ ? "

" त्याकरतां लांब जायची जरूर नाहीं. घरांत तुमची भामा हजर आहे. बरं, पण हें तर आधीं सांगा कीं इतकी महत्वाची गोष्ट असतांना तुम्हीं मला का सांगितली नाहीं ? " कपाळाला आंठ्या घालून भामा म्हणाली.

मनोरथनें हात जोडून म्हटलें-- " देवी ! क्षमा कर आपल्या या दासाला. पण माझ्या बदलीची सूचना आतां इतक्यांतच आली. "

भामानें पार्श्वालिंगन करतां करतां म्हटलें— " नाहीं मनोरथ, मी तुमच्यावर कधीं तरी रागावेन का ? तुम्ही वैशालीला गेल्यावर आपल्या प्रतिज्ञेनुसार आम्हां लिच्छवि स्त्रियांच्या सैनिक भरतीचा प्रश्न अमलांत आणण्याची खटपट कराल अशी मला आशा आहे. रोहिणी, काय करूं ? मी गण-संस्थेची सभासद नाहीं म्हणून, नाही तर तिच्याकडून मी माझ्या मताला मान्यता मिळवलीच असती. सैन्यांत शिरकाव झाल्यानंतरच रोहिणी आम्हीं गण-संस्थेत [ पार्लमेंटांत ] अधिकार मागूं शकतों. तुझं काय मत आहे ? "

" माझा तुलाच पाठिंबा आहे. पण ताई, आधी खड्ग धारणाच्या बाबतींत काय तो निकाल होऊं दे. "

मी व मनोरथ एकदम बोललों— " यांत आम्हीं तुम्हांला मदत करूं. "

भामानें आपल्या पतीच्या खांद्यावर हात ठेवून म्हटलें-- " प्रियकरा, अन् पाहिलं नाहीत का आपण ! युद्धानंतर कित्येक लिच्छवि तरुणी वीर-गति प्राप्त झालेल्या आपल्या पतीच्या अपार प्रेमाची स्मृति जागृत असूनहि दुसऱ्या पतीकरतां संतान उत्पन्न करायला नाइलाजानं तयार होतात; ज्याप्रमाणं पति-पत्नींना जोडी-जोडीनं जिवंत राहायचा अधिकार आहे, तसाच त्यांना जोडी-जोडीनं मरायचा पण अधिकार मिळाला पाहिजे. " नंतर उशीर झाल्याचे लक्षांत येऊन भामा म्हणाली-- " बरं आहे, चल रोहिणी ! सुकुला काकी सारा राग माझ्यावर काढील. म्हणेल : 'त्या महामायेनं गप्पागोष्टींत गुंतवलं असेल.' आणि उशीर झालेला पाहून ती इकडे सुद्धां येईल, अन् त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. "

आम्ही चौघेंहि झोंपडींतून बाहेर निघालों. मनोरथानें आपल्या हाताखालच्या लोकांना कामाच्या सूचना दिल्या. नंतर आम्हीं काकांच्या घराकडे वळलों. रस्त्यांतच आम्हांला काली दासीनें पाहिलें व ती परतली. भामा वहिनीनें म्हटलें-- " पाहिलंत ना, ती काली दासी आमच्या करतांच येत होती. जरा लौकर लौकर चला. "

दारांतच आनंदाश्रूंचा वर्षाव करीत काकीनें रोहिणीला आलिंगन दिलें. नंतर तोंडाकडे पाहून पाहून तिच्या ओठांचें चुंबन घेतलें. रोहिणीच्या तोंडावरील लाली

पाहून वाटलें कीं तिची मातृ-स्नेहाची भूक थोडी तरी शमली आहे. नंतर काकी म्हणाली—

" मुली, आपल्या घरांत तुझं स्वागत असो. कित्ती चांगली आहे माझी बाळी! वाटेनं तुम्हांला फार त्रास झाला असेल. बरं, तुम्हीं दोघं आपल्या काकांकडे जा. ये ग भामा, बोलघेवडी कुठली! " असें म्हणून रोहिणीला हातीं धरून काकी घरांत गेली.

काकांनी दहा घोडे व गाड्या पाठवून दिल्या होत्या. आमचे दोन्ही घोडे अश्वशाळेंत विश्रांती घेत होते. आम्हीं दोघें काकांचेकडे गेलों, तों काका तरुणांच्या घोळक्यांत बसून कांहीं गोष्टी सांगत आहेत असें दिसले; आणि मधून मधून सर्वच मोठ्यानें हंसत आहेत. आम्हांला आलेले पाहून काकांनीं जरा सांवरून बसून म्हटले--

" या मुलांनो! मागच्या वेळेस कशा तऱ्हेनं आम्हीं मगधांचा जीव वांचवला, दांत विचकून कशा तऱ्हेनं त्यांचे सेनानी आमच्या जवळ प्राणभिक्षा मागत होते; आणि तुझा पिता सेनापति अर्जुन यानं कमलाद्वारावर सबंध मगध सेनेला अडवून कसं कैद केलं होतं; वगैरे गोष्टीं आम्हीं बोलत होतो. त्यावेळीं मी अर्जुनाचा उपनायक होतो. आम्ही विजयी झालो पण आमच्या सेनानायकाला रात्रीं कपटानं एका नीच मगध कैद्यानं ठार मारलं. त्याच कैद्यावर अर्जुनानं विशेष दया दाखवली होती. पण त्या कृतघ्नाचं हृदय फार नीच होतं. "

इकडे आमच्या गोष्टी चालल्या होत्या. अन् तिकडे घरांत काकींकडून सुनेचें फार मोठें स्वागत होत होतें. त्या स्वागतामुळे रोहिणीचें मन फिरलेलें दिसलें. रात्रीं मी तिला म्हणालों— " रोहिणी, तूं अगोदर वैशालीला जाणार ना ? "

" नाहीं, आतां नाहीं जाणार. "

" कां, विचार बदलला ? "

" काकी सुकुला तर आईची मामेबहिणच आहे ना ? "

" ठीक आहे तर. एकीच्या जागीं दोन आयांना मुठींत ठेवायचा विचार आहे तर. "

" प्रिया, खरोखरच सुकुला काकींचा स्वभाव भारी गोड आहे. आतांच त्या माझ्या अश्रुभरित मुखाचं वारंवार चुंबन घेत होत्या. तेव्हां मला आईची आठवण होत होती; आईच्या प्रेमाची तीन महिन्यांची भूक आज तृप्त झालीशी वाटली. "

" तर मग लिच्छवि भूमींत पाय ठेवल्याला बारा घटकाहि झाल्या नाहींत तोंच तिची मोह-माया वाढूं लागली ? "

" कां नाहीं वाढणार ? भामाताई रात्रंदिवस हंसवण्याची विद्या जाणते आहे, अन् काकी सुकुला तर माझी दुसरी आईच आहे. प्रथम मी विचार केला होता कीं घोड्यावरून पुढं जावं. पण आतां काकींची मुलगी त्यांच्या बरोबर रथांतून जाईल."

" रथांतून ? "

" होय, काकींनीं कबूल केलं आहे. त्या मला आपल्या बरोबर घेऊन जातील. "

" केव्हां ? "

" त्यांना वाटेल तेव्हां. पण त्या तक्षशिलेच्या नागरिक मंडळाचे स्वागताचे वेळीं वैशालींत असतील हें मात्र खरं. "

" तर मग काय तूं काकींच्या बरोबर जाणार; अन् बिचारा सिंह पहातच राहाणार. "

" तुम्हांला हेवा वाटतो ? "

" काकीबद्दल ? नाहीं. हेवा तर भाई मनोरथला वाटायला पाहिजे होता. "

" नाहीं प्रिया, भामाताईची संगत सोडूं नयेसं वाटतं. काकीहि तिच्यावर प्रेम करतात. पण तिला भितातहि. "

" भितात कां म्हणून ? "

" त्या म्हणतात— भामेच्या जिभेला हाड नाहीं. पण काम करण्यांत मात्र पटाईत. तिला थकवा कसा तो ठाऊकच नाहीं. आल्याबरोबर तिनं शूकर-मार्दव शिजवण्याचं काम हातीं घेतलं. नंतर दुपारचं जेवण संपल्यावर रात्रीचं भोजन-पान व नृत्य-गान याच्या तयारीला लागली. आपणहि क्षणभर विसांवा घेतला नाहीं व दुसऱ्याला पण घेऊं दिला नाहीं. आणि उल्काचेलच्या लिच्छवि स्त्रिया तर तिच्या बोटाच्या इशाऱ्या बरोबर नाचत आहेत. तिनं फक्त काली दासीला सांगितलं—घरो-घर जाऊन सांग कीं ' काकीच्या घरीं भामा तुम्हाला बोलावीत आहे. ' अन् तासभरांत सर्व उल्काचेलचं तरुणीमंडळ तिथं हजर. "

रोहिणीच्या रोमरोमांत आनंद भरलेला दिसला. तीन महिन्यांच्या कोमेजलेल्या लतेवर जणूं श्रावणांतील मेघांनीं वर्षाव केला व ती पुन्हां हिरवीगार टवटवीत झाली. मी तिला हृदयाशी कवळून धरून म्हणालों—

" प्रिये, लिच्छवि भूमीबद्दल तुला इतक्या लौकर आपलेपणा वाटला हें पाहून मला फार आनंद झाला. "

" प्रिया, मला पण कल्पना नव्हती. अन् विशेष म्हणजे कान्यकुब्जाची राजकन्या पाहून असं वाटलं कीं यांच्यांत मिसळायला निदान एक वर्ष तरी लागेल, अन् पुष्कळच मानसिक त्रासहि होईल. "

" पण मग आतां ? "

" एका दिवसांतच मी पुरती लिच्छवियानी बनल्यें. असं वाटतं कीं मी जन्मतःच लिच्छवियानी होत्यें. बाबा म्हणाले तेंच खरं कीं वैशाली ही पूर्वेकडची तक्षशिलाच आहे. हें फक्त काकी व भामा यांना पाहूनच मी म्हणत्यें असं नव्हे; तर आज संध्याकाळीं जितक्या लिच्छवियानी इथं आल्या होत्या त्या सगळ्या कान्यकुब्जांतील स्त्रियांपेक्षां अगदी वेगळ्याच धातूच्या बनलेल्या होत्या. त्यांना पाहून वाटलं कीं वैशालीमध्यें कान्यकुब्जाचा वास सुद्धां नाहीं. "

" खात्रीनंच. पण दासींच्या बाबतींत तुला काय वाटतं ? "

" काली दासी सारख्यांच्या बाबतीत ? "

" होय, अन् काकदास सारख्याच्या बाबतींतहि. "

" यांनाच तुह्मी खरेदी-विक्रीचीं माणसं ह्मणतां ? "

" होय ! "

" त्यांच्या बद्दल दया येते. त्यांना माणसापेक्षां कमी समजलं जातं. त्यांना मनुष्य बनवण्याचा कांही मार्ग नसला पाहिजे; नाही तर इतक्या गोड स्वभावाच्या लिच्छवींनी त्यांच्याकरतां खात्रीनं कांही तरी केलंच असतं. "

" बरोबर आहे. त्यांच्या करतां कांहींहि करणं फार कठीण आहे. त्यांची संख्या थोडी असती तर कांही शक्य तरी होतं. परंतु ते पुष्कळ आहेत. आणि लिच्छवींपेक्षां देखील अलिच्छवीचे दास जास्त आहेत. "

" अ-लिच्छवि ? "

" होय, वज्जीमध्यें लिच्छवींपेक्षां थोडीशीच कमी अ-लिच्छवींची संख्या आहे. त्यांच्यांत कर्मकरांच्या जोडीला ब्राह्मण, गृहपति [ वैश्य ] यांच्या सारख्या कित्येक धनाढ्य जातीहि आहेत. त्यांना राजशासनांत अधिकार नाहीं, युद्धांत मरण्याची भीति नाहीं. पण त्यांच्याजवळ पुष्कळशी शेती आहे. त्यांचा लाखोंचा वाणिज्य-व्यापार आहे. ते स्वतंत्र व समृद्ध जीवन घालवतात. दास-दासींना मुक्त करण्याच्या बाबतींत सर्वांत जास्त विरोध त्यांच्याकडूनच होईल. अन् त्याबरोबरच आमच्या दक्षिणेस व पूर्वेस मगधांचं राज्य आहे. पुष्कळसे दास तर तिथूनच येऊन स्वतःच्या इच्छेनं विकले गेलेत. "

" प्रिया, मला असा प्रश्न पडला आहे कीं इतके जास्त अ-लिच्छवि इथं आले कसे ? "

" हें लिच्छवींच्या न्यायप्रियतेचं व दयेचं फळ आहे. आमचे पूर्वज जेव्हां पहिल्या प्रथम वज्जी भूमीत आले तेव्हां इथं चारी बाजूला महा अरण्य होतं. त्यांत त्यांनीं आपली गुरं-ढोरं पाळलीं. व्याघ-सिंह, गेंडे-हत्ती यांनीं भरलेलं हें जंगल

स्वच्छ करून तिथं त्यांनीं आपलं एक गांव वसवलं. त्याच्या चारी बाजूंनीं त्यांनीं काष्ठ प्राकार तयार केला. जन–वृद्धि झाली व प्राकाराच्या आंत घरांना जागा पुरेनाशी झाली; तेव्हां तो प्राकार तोडून विशाल करण्यांत आला. अशा प्रकारं कित्येक वेळां विशाल करावी लागल्यामुळे त्या नगरीचं नांव वैशाली पडलं. जंगलांत वैशालीच्या लिच्छवींची शेतकी वाढूं लागली; त्यांच्या जवळ जनावरंहि पुष्कळ झाली. पूर्वजांच्या रक्ताबरोबरच वीरताहि त्यांच्या नसानसात भरलेली होती; व भोवतालच्या राजांप्रमाणं त्यांना विलास पूर्ण जीवनाची संवय नव्हती. त्यांच्या भूमींत सत्य व न्यायाचं राज्य होतं. ते शरणागताचं रक्षण करणं हे आपलं पवित्र कर्तव्य समजत होते. आणि म्हणून असे पीडित ब्राह्मण, गृहपति, तसेंच इतर लोक त्यांच्या जवळ शरण आले. त्यांनीं त्याना शत्रूपासून अभय दिलं. त्यांना शेती करतां जमिनी दिल्या. त्यांच्या जनावरांना चरायसाठी जंगल खुलं केलं. त्यांच्या व्यापाराचं रक्षण आपल्या बाहुबलानं केलं. अशा रीतींनं समृद्ध अ-लिच्छवि कुलांची मोठी संख्या आमच्या इथं एकत्रित झाली. शासनांत ते आमच्या आधीन आहेत. पण ते मगध, कोसल, यांच्याशीं तुलना करतां अधिक स्वतंत्र आहेत. व त्यांना आपल्या वज्जी देशाबद्दल प्रेमहि आहे. अन् शिवाय कितीतरी कर्मकर परिवार इथं वस्ती करून राहिले. ते पगार घेऊन खुषीनं काम करतात. दासांचा संबंध केवळ लिच्छवींशीच नसून या अ-लिच्छवींशीच जास्त आहे. अन् त्यांचं पुष्कळसं धन या दासांमध्यें गुंतलेलं आहे. त्यामुळंच दास-प्रथा नाहींशी करणं ही आमच्या हातातली बाब राहिलेली नाही. तरी पण आह्मी दासांना वाईट रीतींनं वागवणारास शिक्षा करतों; व इथले दास वज्जीच्या बाहेर विकण्याची मनाई केली आहे. वज्जीचा दास बाहेर विकून घेण्यास तयार नसतो. यावरून आह्मी लिच्छवि त्याच्याशी–दासाशीं–किती चांगलं वर्तन ठेवतों ते तुला समजून येईल."

"होय प्रियकरा, गंधारपेक्षां इथं जास्तच गुंतागुंत आहे. गंधारांत एकाच वर्णाचे लोक आहेत. एकच भाषा आहे."

"म्हणून तिथं समानता ठेवणं फार सोपं आहे. इथं काळे दास वेगळे आहेत. निमगोरे कर्मकर वेगळे, शिवाय ब्राह्मण, गृहपति इत्यादि मिश्र जाती आहेतच. इच्छा असूनहि सर्वांना लिच्छवि मानणं आम्हांला अशक्य आहे. पण लिच्छवींच्या नऊ कुळांत कांहींच भेदभाव मानला जात नाहीं हे मात्र नक्की."

"नऊ कुळं?"

"होय, ज्ञातृ [ जथरिया ], दीर्घव [ दिघवहत ] इत्यादि लिच्छवींचीं नऊ कुळं आहेत. ते पहिल्या पूर्वजाच्या नऊ सन्तानांचे वंशज आहेत."

" पण प्रिया, इथं इतक्या भिन्न-भिन्न जाति असूनहि लिच्छवींमध्यें इतके शुद्ध वर्णी कसे राहिले ? "

" त्याकरतां आमचे नियम फारच कडक आहेत. आम्ही कोणत्याहि अ-लिच्छवि माता किंवा पित्याच्या संतानाला लिच्छवि मानत नाहीं. वैशालीच्या अभिषेक-पुष्करिणींत जो माता व पिता दोन्हीं कडून पूर्ण लिच्छवि आहे, अर्थांतच जो गौर-दीप्तवर्ण असतो, त्यालाच आभिषेक मिळण्याचा मान आहे. "

" हो, अन् मला हेंहि दिसलं कीं इथं आलेल्या लिच्छवि तरुणींचे केंस कमी पिंगट होते. बहुतेकींचे भामाताईच्या सारखे निळे होते. पण वर्ण मात्र तुमच्या माझ्या सारखा सर्वांचा होता. "

" होय, पण त्याकरतां लिच्छवींना फारच कडक नियम करावे लागले आहेत. आपल्या संतानांशीं कधीं कधीं त्यांना निष्ठुरतेनं वागावं लागतं. परंतु लिच्छवि रक्ताच्या शुद्धते करतां तिचा सगळेच स्वीकार करतात. "

" प्रिया, खरोखर ही निष्ठुरता पाहून मला वाईट वाटलं. कालीला 'अग काली' म्हणून मारलेली हांक अगदीं कर्णकटु वाटली. "

" अन् प्रिये, काली हें काहीं तिचं नाव नाहीं. तिचा वर्ण काळा आहे म्हणून तिला काली व दासांना काक म्हणजे कावळा असं म्हणतात. कधीं कधी माझ्या मनांत असं येतं कीं अगदीं पहिल्या लिच्छवींनीं अ-लिच्छवि शरणार्थींना जर स्थान दिलं नसतं तर ? "

" पण तीहि फार निष्ठुरता झाली असती. "

" अगदीं बरोबर बोललीस. एकंदरींत काय, ही गुंतागुंत आम्ही नाहीं सोडवूं शकणार; समयच [ इतिहास ] एखादे वेळीं सोडवील. बरं, जाऊं देत या रुक्ष गोष्टी. प्रिये रोहिणी, आजचा नाच कसा काय वाटला ? "

" प्रिया, भामाताई तर सर्व गुणांचं आगरच वाटली. तुमच्या बरोबर कोण नृत्य करीत होती ? "

" त्रिपदी. "

" हो, त्रिपदीच; मला तिचे पाय, हात, अन् कमरेची हालचाल पाहून मत्सर वाटूं लागला. मी पहात होत्यें, तुम्हीं अगदीं घामाघूम झालां होतांत. अन् तरी ती भवानी तुम्हाला सोडीत नव्हती. "

" भवानी ? "

" प्रिया, तो रागाचा नव्हे, प्रेमाचा शब्द आहे. आतां भामाताईसमोर बोलल्यें नाहीं, पण तिनं मला अगदीं हरबऱ्याच्या झाडावर बसवलं होतं. मला काय कळत नाहीं ? त्याबद्दल एखाद्या दिवशीं तिला चांगलाच हात दाखवीन. "

" अन् ती तें कबूल करील ? भामा असाधारण स्त्री आहे रोहिणी! ती असाधारण पदवीचा नेहमींच स्वीकार करील. अन् तिचं सौंदर्य ? "

" ती तक्षशिलेच्या कुणाहि सुंदरीची बरोबरी करूं शकेल. "

" हा तर खरोखर पक्षपात आहे रोहिणी. पण ती आतां तीन वर्षांपूर्वीपर्यंत वैशालीची जनपदकल्याणी [ सौंदर्य सम्राज्ञी ] ठरली आहे. "

" होय प्रियतमा, अन् तें खरं आहे. अन् तिचे केंस किती निळे व चमकदार आहेत. "

" तेल लावल्यामुळंच ते तसे दिसतात. "

" मलाहि ती तेल लावायला सांगत होती. पण मला तें चपचपीत तेल लावणं आवडत नाहीं. "

" आणि त्यानं उशा पण वाईट होतात. पण रोहिणी, नहायच्या अगोदर तेल लावून धुवून टाकायला तर कांहींच हरकत नाहीं. "

" पण माझे केंस काळे तर होणार नाहींत ? "

" काळे होण्यांत भीति काय आहे ? "

" भामाताईच्यासारखे निळे झाले तर कांहीं हरकत नाहीं. पण काळे नकोत. "

" माझी लाडकी, सोनुकली ग तूं! " असें म्हणून मी तिच्या हंसऱ्या ओठांचे चुंबन घेऊन म्हटलें—आतां आम्हांला इथं आणखी रहावं लागेल. "

" पांच दिवस ? मी मोठ्या आनंदानं राहीन. मला पण आणखी ओळखी करून घ्यायच्या आहेत. "

" अन् आपला गांधार कंठ व गांधार नृत्य यांच्या बद्दल प्रशंसा मिळवायची आहे. होय ना ? आज वैशालीहून उत्तर आलं आहे. त्यांत स्वागतपर मजकूर असून नागरिक मंडळाच्या सुख सोईंकडे जातीनं लक्ष घालण्याची सूचना सेनानायकांना मिळाली आहे. आम्हीं वैशालीला जायला कोणच्या दिवशीं निघायचं त्या विषयीं उद्यां पत्र येईल. तूं तर कार्कीच्या रथांतून जाणार ना ग रोहिणी ! "

" होय, मी कार्कीच्या रथांतून जाईन. अन् तेवढ्यांत जर नवा शौल्किक आला तर भामाताई पण आमच्या बरोबर येईल. "

" तर मग इथून एक फौजच तयार करून न्यायचा विचार आहे वाटतं ? "

" मग त्याकरतां कांहीं एवढा हेवा वाटायला नको. मी अन् भामाताई जर जिवंत राहिलों तर तुम्ही लिच्छवि स्त्रियांची फौजहि पहाल. आमचा जन्म कांही नुसतीं अंडीं उबवत बसायसाठीं नाहीं, म्हटलं. "

"पण प्रिये, अंडी उबवत बसणं हें वाईट नसतं कांहीं ! तूं गौरैय्या पक्षांच्या जोडप्यांना प्रसवाची तयारी करतांना कधीं पाहिलं आहेस ? गौरैय्यांची मिथुनाची कित्येक

दिवस चाललेली प्रणयलीला, मधुर कूजन, नंतर माता-पिता बनण्याची तयारी. पति-पत्नी दोघें मिळून ठिकठिकाणांहून गवताच्या काड्या चोचींतून आणतात. एक नवं घरटं बनवतात. नंतर पत्नी अंडीं घालते, तीं उबवते, पति येऊन त्यांचं रक्षण करतो. नंतर त्यांतून लहान लहान पोरं निघतात. तीं चिंव-चिंव बोलतात. पति-पत्नी दोन्हीं उडून जातात व आळीपाळीनं पोरांना खाण्याकरतां धान्याचे कण किंवा बारीक बारीक आळया आणतात. माता-पित्यांना पाहून पोरं चिंव-चिंव करीत उठतात. तीं त्यांच्या उघड्या तोंडांत आहार घालून पुन्हां भुर्रकन जातात. दांपत्यानं कसं वागावं याचं सुंदर शिक्षण हे पक्षी आम्हांला देतात. "

" तसंच शत्रु आला तर त्याच्याशीं दोघंहि जिवाच्या करारानं लढतात. "

" होय, अन् ते मलाहि पटतं. प्रिये रोहिणी ! जर तूं मला आपणहून आनंदानं चुंबन दिलंस तर मी गण-संस्थेंत लिच्छवि स्त्री-सेना तयार करण्याबाबत जबरदस्त समर्थन करीन. "

रोहिणीनें माझ्या ओठांचें चुंबन घेऊन म्हटलें—

" शेवटीं लांच घेऊनच ना ? "

" प्रिये, लांच घेऊन नाहीं ! तुझ्या चुंबनानं मला त्या वाग्युद्धांत मोठी शक्ति येईल. "

आम्हीं आधींच पुष्कळ रात्र झाल्यावर आपल्या शयन-गृहांत पोंचलों होतों. त्यांत या बोलण्यामुळें आणखीच उशीर झाला. पण मग झोंप इतकी गाढ लागली कीं मी जागा झालों तेव्हां ऊन पुष्कळच वर चढलें होतें. रोहिणी अजूनहि झोंपेतच होती. मी हळूंच पलंगवारून उठून गेलों.

दुसऱ्या दिवशीं कळले की परवांचे दिवशीं आम्हीं वैशालीला जाण्यास निघणार.

उल्काचेलचे तीन दिवस केव्हां संपले ते आम्हांला कळले सुद्धां नाहीं. आज कोणाकडे तर उद्यां कोणाकडे असें जेवण होई व रात्रीं काकांचे घरीं नृत्य-गायनाची धामधूम उडे. रोहिणीचा संकोच आतां दूर झाला होता. म्हणजे कांहीं ती भामेप्रमाणें बोलण्यांत पटाईत बनली होती असें नाहीं. तीच भामा रोहिणीची सर्वांत अधिक प्रिय सखी बनली व दोघींचे हें सख्य आजीवन वाढत गेलें. गांधारी सून आल्याची बातमी आसपासच्या कर्मान्तांपर्यंत कळली. अन् तिसऱ्या दिवशीं मी पाहिलें तों बाहेरील कर्मान्तांमधील तरुणींच्या झुंडीच्या झुंडी येत आहेत. थोडा वेळ तर असें वाटलें कीं उल्काचेल हें सुंदर तरुणी व त्यांचें नृत्य संगीत यांच्या प्रदर्शनाचें स्थान बनलें आहे. या बाहेरून आलेल्या तरुणींत उल्काचेल [ हाजीपूर ] पासून पूर्वेकडे एक कोसावर दीर्घी [ दिग्घी ] गांवीं राहणारी एक तरुणी सर्वांत जास्त आकर्षक

होती. तिचे काळे कुरळे लांब केस, तिचे काळेभोर टपोरे डोळे, तिचा लवचिक व कृश पण भरींव बांधा, तिचें विकासोन्मुख तारुण्य व उरोज, तिचा मधुर आवाज, तिचा चतुर-मनोरम पाद-निक्षेप या सर्वांत एक वैशिष्ट्य होतें. त्या दीर्घी तरुणीच्या बरोबर तिचा पतीहि आला होता. तो मनोरथासारखा दिसत होता. या दीर्घी तरुणीच्या अंगींहि आपला पति चंद्र याला एका केसानें बांधण्याचें सामर्थ्य दिसत होतें. दीर्घी तरुणी जितकी चंचल तितकाच तिचा पति सुस्त. हो, पण त्याचे डोळे मात्र चंचल होते. बिचारी तरुण पत्नी आपलें नृत्य-संगीताचें कौशल्य दाखवण्यास आली होती. परंतु चंद्र या चढाओढींत आपल्या पत्नीच्या यशस्वितेकडे संदेहानें पहात होता. ती स्वतः नृत्य करून साऱ्या दर्शक मंडळींचा थट्टेचा विषय झाली असती. पण दीर्घी तरुणीला कपिलनें आपली जोडीदारीण निवडून दोघें नृत्य-स्थानीं आलीं, तेव्हां चंद्राचे तोंड पहाण्यालायक झालें होतें. तो मधून मधून चोरून त्या जोडीकडे पाही. हें गुह्य भामेला कळलें. तिनें दुसऱ्या नृत्य-चक्रांत जाऊन चंद्राला पकडलें. बिचाऱ्याला स्वतःच्या अडाणीपणाची जाणीव होती; म्हणून सुटका करून घेण्यासाठीं तो भामाची हात जोडून प्रार्थना करीत होता. मनोरथ, शुभ आदि तरुणांनी ही रस्सीखेंच पाहिली. तेव्हां तेहि म्हणूं लागले— " नाहीं चंद्रभैया! तुम्हांला नाचावंच लागेल. तुमच्या ' मुनि मोहिनीला ' कपिलनं नाचायची संधी दिली, तर तुम्हीहि भामाचा आग्रह मानला पाहिजे. " भामा हात सोडायला तयार नव्हतीच.

" सगळ्या वर्जामध्यें माझ्या बरोबरीनं नाचणारा जर कोणी तरुण असेल तर हे एकटे प्रिय चंद्रच– " असे म्हणून तिनें चंद्राच्या गालाचे चुंबन घेतलें. चंद्राची ही दुर्गति पाहून ' मुनि मोहिनी ' फार खुष दिसली. त्यावरून असें वाटलें कीं छायेप्रमाणे चंद्राचें तिच्या मागून फिरणें तिला आवडत नव्हतें. आपल्या भोंवतीं खूप गर्दी झालेली पाहून रडवें तोंड करून शेवटीं चंद्रानें उभें राहून म्हटलें—

" भामा! तुम्हीं हे बरोबर करीत नाहीं. माझ्या नृत्य-कलेंतील अज्ञानाची तुम्हीं थट्टा करतां आहांत. "

कपिल म्हणाला— " मित्रा चंद्रा! भामेसारख्या त्रिभुवन मोहिनीनं माझा हात धरला तर मला इंद्राच्या सिंहासनावर बसल्या सारखं वाटलं असतं. "

शुभ–" मित्र कपिल, अन् मग तुम्हीं ' मुनि मोहिनी 'च्या बरोबर नाचायचं भाग्य या गरीब शुभाला दिलं असतं. "

मनोरथानें आतां चंद्राविषयीं सहानुभूति दाखवून म्हटलें– " भाई चंद्र! आपण दोघे सारख्याच भाग्यचक्रांत सांपडलों आहोत. पहा बरं, मुनि मोहिनी कपि-

लचा उजवा हात धरून त्याच्या पाठीला चिकटून उभी आहे. अन इकडे माझी भामा मला रडत ओरडत सोडून तुमचा हात धरून बसली आहे. काय करायचं! यालाच नशीब म्हणतात. ”

शुभ म्हणाला—“ पण भाई मनोरथ, तुम्हीं लालसेनं तिकडे पहात राहिलां असतां म्हणजे त्यांना कळलं असतं. ”

भामानें मान फिरवून मनोरथाला म्हटलें—“ चांगले समदुःखी झालां आहांत हो! आतांच ना रोहिणी बरोबर नाचत होतांत! ”

मनोरथ—“कां, तुला तें बरं वाटलं नाहीं, भामा? ”

भामा—“ मला तुम्ही चंद्राच्या बरोबर नाचायला आडकाठी केली असतांत तर वाईट वाटलं असतं. ”

मनोरथ—“ मी कशाला आडकाठी करूं? तुम्ही दोघं नाचा ना. पण भामा! कोणालाहि इच्छेविरुद्ध नाचायला लावणं हाहि बलात्कारच नाहीं का? इकडे तर माझ्या मित्राचं अंतःकरण धडपडतंय, कारण त्याला धडधडीत दिसतंय कीं आपली ‘ मुनि ’ त्या कपिलवर बेहद्द अनुरक्त होऊन त्याच्या बरोबर नाचते आहे व दुसऱ्या जोडप्यांचा आडोसा घेऊन कपिलची कोण जाणे किती चुंबनं घेते ती. अन् तें पाहून त्याचं अंतः करण विव्हल झालं आहे. ”

“ आडून कशाला? ” असे म्हणून ‘ मुनि मोहिनीने ’ त्याचवेळीं कपिलच्या गालाची एकामागून एक तीन चुंबनें घेतलीं. बिचाऱ्या चंद्रानें मान खाली घातली.

शुभ मनोरथ जवळ येऊन म्हणाला—“ मोठा आला आहे मित्राचा कैवार घेणारा. भामानं कपिलचा हात धरला असता आणि अशीच चुंबनाची सरबत्ती सुरू केली असती म्हणजे तुला त्याचा कदाचित बरोबर अनुभव आला असता. कपिल अन् मुनि मोहिनीचं मन जमलं असतं म्हणजे मग कुठं दीर्घी अन् कुठं तक्षशिला? बिचाऱ्या चंद्राला पत्ता पण लागला नसता. अन् तुमचा लिच्छवींचा कायदा तर असा आहे कीं स्त्रीवर तिच्या इच्छेविरूद्ध कोणत्याहि गोष्टींत जबरदस्ती करतां येत नाहीं. ”

भामानें भिवया चढवून शुभकडे पाहून म्हटलें—“ शुभ, तुम्ही माझ्या पुढं जास्त हुशारी दाखवूं नका. तुम्हांला वाटतं कीं अशानं मी कपिलचं चुंबन घ्यायला जाईन व इकडे तुम्ही माझ्या लाडक्या चंद्राला घेऊन पोबारा कराल असंच ना? ” असें म्हणून भामाने चंद्राच्या दुसऱ्या गालाचें चुंबन घेऊन पुढें बोलणें सुरू केलें. “प्रिय चंद्र, तुम्ही जर त्यावेळीच मला भेटलां असतां तर मी या मनोरथांच्या पदरीं कशाला पडल्यें असत्यें? ”

रोहिणी जवळ येऊन म्हणाली-- " भगिनी, मग तर तूं नाचवून नाचवून चंद्राला मारून टाकलं असतंस. "

भामा--"तर मग पुन्हां मनोरथांची झाल्यें असत्यें. पण इथं मारण्या जगण्याची गोष्टच नाहीं मुली ! त्या दीर्घांच्या मुलीनं माझ्या चंद्राला कुठल्याच कामाला लायक ठेवला नाहीं. तिला वाटतं जर चंद्राला नाचतां येईल तर नृत्यशाळेंत आपल्याला रोज नवा जोडीदार निवडतां येणार नाहीं. मी आज माझ्या चंद्राला नृत्य शिकवीन. चल मित्रा ! लोकांची गर्दी इथं जमूं लागली आहे. नगाऱ्यावर इतक्यांत थाप पडेलच. "

मी म्हणालों-- " नाहीं भामा वहिनी ! आज भाई चंद्राला सोडून दे. मला ठाऊक आहे तो नाचायला भीत नाहीं. "

भामाने बसून चंद्राच्या पायांवरून हात फिरवीत म्हटलें-- " हे पाय नृत्य करूनच तर सुंदर झाले आहेत. "

मी म्हणालों-- " होय, चंद्रभाईचं सगळं शरीर नाचण्याकरतांच बनलं आहे. त्याचं डोकं दुखत असेल किंवा त्याला दुसरं कांहीं होत असेल. "

चंद्रानें दीर्घ निःश्वास सोडून म्हटलें- " हीच गोष्ट खरी आहे मित्रा. आज डोकं दुखत आहे व थोडं हृदयांतहि- "

शुभ— " हृदयांत सुद्धां म्हण. "

मनोरथ—" अन् मला कधीं हृदयांत दुःख होत नाहीं तें. "

शुभ-- " सगळ्यांना एकाच तऱ्हेचं दुःख व्हावं असं थोडंच आहे. "

मनोरथ-- " तर मग मी या भांडणाला तोड सुचवतों. "

सर्वांनीं एकदम म्हटलें— " सांग ! सांग ! ! "

मनोरथ— " अशी गोष्ट मी उगाच सांगणार नाहीं. चंद्रभैय्या प्रथम स्वीकार करील तर सांगेन. "

मी-- " न जाणतांच स्वीकार करायचा, हा चांगला धंदा आहे. "

मनोरथ-- " नाहीं, मानण्यासारखीच गोष्ट सांगेन. "

मी— " एकच गोष्ट, पण ती कोणाला पटते, कोणाला नाहीं पटत. मग ? "

मनोरथ--" तर मग सिंह, तुमच्या म्हणण्याचा अर्थ हाच ना कीं त्याचं डोकं दुखत असतांनाहि भामानं चंद्राला नाचायला लावावं. "

मी-- " बरं तर मित्र चंद्र ! तुम्ही म्हणा कीं विशेष अनुचित गोष्ट नसेल तर मी स्वीकार करीन. "

चंद्रानें " हूं " म्हटलें.

मनोरथ-- " भाई चंद्राचं चुंबन नृत्यशाळेंतल्या सगळ्या तरुणींनीं घ्यावं."

शुभ-- " जणूं काय चंद्राचा पुन्हां विवाहच होत आहे. अन् म्हणून सगळ्या कुमारिका जमून चुंबन घ्यायला येतील. अन् हा दंड झाला कीं पुरस्कार ?"

मी--" चंद्र ! चटकन 'हो' म्हण. नाहीं तर इथं विरोधी लोक पुष्कळ जमले आहेत."

चंद्रानें " हं " केलें.

मनोरथ-- " पण हा झाला अटीचा अर्धा भाग. दुसरा भाग हा कीं 'मुनि मोहिनीचं' चुंबन इथं जमलेल्या सर्व तरुणींनीं घ्यायचं."

चंद्राचा चेहरा लालीलाल झाला होता. अन् त्यानें बोलण्याच्या आधींच मी म्हणालों--" हा तरी काय दंड झाला ? वज्जीच्या तरुणी तर रात्रंदिवस चुंबनांची खैरात करीत असतातच. प्रिय चंद्र ! चटकन् 'हो' म्हण."

चंद्रानें चटकन् 'हो' म्हटलें, अन् त्याने पाहिलें तों 'मुनि'च्या डोळ्यांत खोडसाळ हंसूं आहे.

चंद्राचें चुंबन प्रथम भामानें घेतलें, नंतर रोहिणीनें; नंतर दुसऱ्या तरुणींनी. 'मुनि' पुढें जाऊं लागली तेव्हा भामानें तिला थांबवून म्हटलें--

" तुला तर तें रोजच मिळत. आज तुझी पाळी नाहीं." परंतु कपिलनें 'मुनिला' चंद्राजवळ पोंचवलेंच. 'मुनिनें' चंद्राच्या ओठांचें चुंबन घेतलें.

नंतर 'मुनि' वर गरमा गरम चुंबनांचा मारा सुरूं झाला. नृत्यापेक्षांहि या चुंबन महोत्सवानेंच लोकांचें अधिक मनोरंजन केलें.

त्या दिवशीचें नृत्य-गायन आणखी पुष्कळ वेळ चालूं राहिलें. आणि आम्हीं दोघें जेव्हां झोंपायला गेलों तेव्हां आमचे सर्वांग ठणकत होते.

# ( १३ )

# वैशालींत स्वागत

उल्काचेलहून आम्हीं त्या दिवशीं सकाळीं निघालों व रात्रीं कोटिग्रामांत वस्ती केली. तेथून वैशालीला दुसऱ्या दिवशीं सकाळीच पोंचतां येत होतें. काकींच्या बरोबर रोहिणी व भामा दोघी रथांतून गेल्या व त्या त्याच दिवशीं वैशालीला पोंचल्या.

काकी रोहिणीला आपल्या घरी घेऊन गेल्या. सोमा तिथेंच होती. रथाच्या चाकांचा आवाज ऐकतांच ती दारांत येऊन उभी राहिली. काकींनीं आज्ञेच्या स्वरांत म्हटलें—

" सोमू, पहातेस काय ? आपल्या वहिनीला उतरून घेऊन जाऊं नयेस ? "

सोमा रथाजवळ जाऊन पोंचली नाही तोंच भामाने तोंड वाईट करून म्हटलें-- " ये बाळ सोमा ! आपण दोघी मदत करूं. बिचारीचा पाय- " सोमाचें तोंड उतरून गेलें. तिला वाटलें पायाला काहीं तरी झालें आहे. तिनें येऊन रोहिणीचा पाय धरला. भामा हंसूं दाबून धरून म्हणाली--

" सोमा वन्सं, अगदीं हळूं धरा हं. नाहींतर दुखेल. " सोमानें आणखी हळूं धरून म्हटलें-- " भामाताई, तूं तिकडून नीट धर पाहूं. आपण दोघीहि हळूंच उतरवूं. "

भामानें आणखीच तोंड वांकडें करून म्हटलें-- " फार कठीण आहे ग, सोमा बाळी ! जराहि पाय हलला कीं तुझी सोनुकली वहिनी हातची निसटून जाईल. काय बरं करावं. बरं असूं दे. मी तिला आपल्या पाठुंगळीच घेत्यें. या हो नव्या सुनबाई. "

सोमानें चटकन पाठ फिरवून म्हटले-- " मी घेऊन जात्यें पाठुंगळी; तूं थोडीशी मदत कर म्हणजे झालं. "

भामा मदत करण्यास पुढें होणार इतक्यांत काकी बाहेरून सईसाला घेऊन आल्या. भामा खूप मोठ्यानें हंसली. सोमानें मागें वळून पाहिलें व ती लज्जित झाली. काकींना सुगावा लागलां होताच. त्यांनीं लगेच रागवायला सुरवात केली--

" भामा ! तुला भारीच खट्याळपणा सुचत असतो. "

" नाहीं काकी, वैशालींत नवी नवरी प्रथम येतांच नणंद तिला पाठीवरून नेऊन उंबरठ्या पलीकडे पोंचवते. ही चाल मी सोमाला सांगितली." भामा नम्रतेनें म्हणाली.

" चाल सांगतेय कपाळ ! मी कधीं वैशालीची नवरी नव्हत्यें का ? "

" तुमच्या वेळीं ही रीत नसेल काकी ! आज काल सर्वच असं करतात. विचारून पहा सोमा वन्संना. "

बिचारी सोमा भामेला ओळखत असूनहि फसली होती; अन् आतां लज्जेनें ती खालीं मान घालून उभी होती. याच वेळीं रोहिणीनें रथांतून उडी टाकून सोमाला आपल्या दोन्ही बाहूंनीं कवटाळलें व तिच्या मुखाचे चुंबन घेऊन ती ह्मणाली—

" प्रिय भगिनी सोमू ! तूं भामाताईला ओळखत नाहींस काय ? मग त्यांत लज्जेचं काय कारण ? "

सोमाच्या डोळ्यांत आनंदाश्रु चमकले. तिचा संकोच कोण जाणे कुठें नाहींसा झाला, अन् ती आपल्या नव्या भावजयीला बगलेंत हात घालून जवळ घेऊन ह्मणाली—

" भामेला ओळखत असूनहि लोक तिच्या तावडींत सांपडतातच, " भामेनें याच वेळी येऊन सोमाच्या गळ्याला मिठी घातली. सोमा म्हणाली— " राहूं दे ग वहिनी ! प्रथम दुखवायचं नी नंतर कुरवाळायचं. "

" सोमा ! तुरट आंबट आंवळ्यावर पाणी किती गोड लागतं. "

आतां गल्ल्यां गल्ल्यांतून नव्या पाहुणीची वार्ता पसरली होती व घरोघरच्या लिच्छवि स्त्रिया सूनबाईचें स्वागत करण्यास येत होत्या. वृद्ध स्त्रिया वारंवार तोंड पहात व तिच्यावर कुंकू वगैरे उडवीत मंगलगीत गात तिला आंतल्या दालनांत घेऊन गेल्या. तेथे जमिनीवर गालिच्या घातलेला होता. नव्या नवरीस मधोमध बसवलें. इतक्यांत मल्लिकाबाई पण येऊन पोंचल्या. बायकांनीं त्याना वाट दिली. काकींनी रोहिणीच्या कानांत सांगितले, " हीच सिंहची आई मल्लिका. " मल्लिकाबाईनीं रोहिणीला आलिंगन देऊन सजल नेत्रांनीं तिच्या मुखाचे चुंबन घेऊन ह्मटलें— " माझी गुणाची बाळ ती ! वैशालींत तुझं स्वागत असो. "

सगळ्या जणी बसल्यानंतर नवरी करतां मधुपर्क—कालवडीचें भाजलेलें मांस व अंगुरी सुरा—आणण्यांत आला. तिनें थोडासा त्याचा स्वाद घेऊन रूढीला मान्यता दिली.

लिच्छवि स्त्रियांनीं आपल्या कोमल कंठांनीं मंगल गाणीं ह्मटलीं. त्यांत भामाचा पुढाकार होता. अंधार पडल्यावर सर्व स्त्रिया आपापल्या घरोघर गेल्या. सगळ्या जणी गांधारी नवरीच्या सुंदरतेचें वर्णन करीत होत्या. कुणी तिच्या विशाल नेत्रांची प्रशंसा करीत होत्या, तर कुणी तिच्या पातळ, लाल अधरांची. कुणी तिच्या सोनेरी

लांब केसांची तारीफ करीत होत्या, तर कुणी तिच्या गौर प्रशस्त ललाटाची व स्निग्ध चंद्रमुखाची. सर्व जणी एकमतानें सांगत होत्या कीं ती वैशालींतील सर्व-सुंदरी तरुणी आहे.

दुसऱ्या दिवशीं दोन घटका दिवस वर आल्यावर नागरिक मंडळाच्या बरोबर आम्हीं वैशालीच्या दक्षिण द्वारावर येऊन पोंचलो. याच्या पुष्कळच अगोदर रथांतून सामोरे येऊन लिच्छवींनीं आमचे स्वागत केलें व तेथून मिरवत मिरवत ते आम्हांला घेऊन चालले होते. मिरवणुकीच्या अग्रभागीं रणवाद्यें वाजत होतीं. त्यांच्या मागून तक्षशिलेचे दहा घोडे चालले होते; त्यानंतर नजराण्याच्या वस्तु शिबिकांमधून; नंतर तक्षशिलेहून परत आलेले अश्वारूढ असे आम्ही सहा लिच्छविकुमार. अन् त्यानंतर लिच्छवीचे शेकडों रथ; त्यांत लिच्छवि सेनापति सुमन यांचा रथ सर्वांच्या पुढें होता.

दक्षिण द्वारानें शहराच्या प्रमुख रस्त्यांतून मिरवत मिरवत आम्हीं संस्थागाराच्या [ पार्लमेंट भवनाच्या ] समोर येऊन पोंचलों. इथे लिच्छवि गण-पति सुनंद यानीं अमात्य-परिषदेसह सामोरे येऊन मंडळाचे स्वागत केले. सेनापतिहि पुढे होऊन गणपतीच्या बरोबर राहिले. गण-पतीनीं घोडे व उपायन-शिबिका यांच्याकडे दृष्टि-क्षेप केला व अतिथीना घेऊन ते संस्थागारांत गेले. आम्हां सहा लिच्छवि पुत्रांना सभासदांपासून वेगळीं अशी एका बाजूला विशिष्ट आसनें देण्यांत आली. संस्था-गारांत गणसंस्थेच्या ९९९ सभासदापैकी ९०० पेक्षां जास्तच उपस्थित होते. गण-पतींनी हात वर उचलताच सभागृह एकदम शांत झालें. नंतर सेनानी कपिल उभे राहून म्हणाले—

“ भन्ते लिच्छवि गण, ऐका ! वैशाली व तक्षशिला पूर्वीपासून परस्परांना सुपरिचित असून एकमेकांचा सन्मान ठेवीत आल्या आहेत. परंतु तक्षशिलेनं आपल्या पूर्वेच्या भगिनी विषयीं हार्दिक सन्मान व प्रेम व्यक्त करण्याकरतां आपलं नागरिक मंडळ पाठवलं अशी मला वाटतं ही पहिलीच वेळ आहे. गंधारगण हा वैशाली व लिच्छवि यांच्या विषयीं काय भावना ठेवतो हे शब्दांनीं सांगण्यापेक्षां आम्हीं दहा गंधार पुत्र तुम्हां लिच्छवि-पुत्रांना समक्ष येऊन भेटलों यांतच ती उत्कृष्ट रीतीन व्यक्त झाली आहे. आणि या बाबतींत बोलायला हवंच असेल तर तें हें सुवर्ण-पत्र आप-णांस सांगेल.” असे म्हणून कपिलने सुवर्ण-पत्र गणपतीच्या हातीं अर्पण केलें. व आपलें भाषण तसेंच पुढें चालू केलें—“ माझें भाषण समाप्त करण्याच्या आधीं मी स्वतःचे म्हणून दोन शब्द सांगणार आहे. त्यावरून एका लिच्छविकुमारानं तक्ष-शिलेला वैशालीकडे कसं आकर्षित केलं हें कळून येईल. शेकडों वर्षांपासून पूर्वे-कडील इतर विद्यार्थ्यांप्रमाणें शेंकडों लिच्छविपुत्र विद्याभ्यासाकरतां तक्षशिलेला

जात असतात. तक्षशिला त्यांच्याविषयीं स्नेहभाव ठेवते. तेहि तक्षशिलेचा अभिमान बाळगतात. परंतु लिच्छविपुत्र सिंह यांचं काम त्याहून जास्त व असाधारण असं झालं. तक्षशिलेच्या संकटसमयीं तिथं हजर असलेल्या कोणाहि लिच्छविपुत्रानं–सिंह व त्यांचे पांच मित्र यांच्या प्रमाणं–गंधार करतां आपलं रक्त सांडलं असतं. याच्या आधीं असं उदाहरण ऐकिवांत नव्हतं, कारण तशी वेळच कधीं आली नव्हती. तरीसुद्धां दोन वर्षांपूर्वी ज्या लिच्छविपुत्रांनीं तक्षशिलेकरतां मोठ्या निर्भयतेनं तलवार गाजवली त्याचं महत्व कांहीं कमी होत नाही. मी स्वतःदेखील या युद्धांत आपल्या गंधार भूमीकरतां लढलो; व मी शुभ आदि पांचहि लिच्छविपुत्रांचे पराक्रम जाणतों. त्याच्या पराक्रमाचा कुणाहि गणाला अभिमानच वाटेल. एवढ्या लहान वयांत त्यांनीं दाखिविलेली बहादुरी त्यांच्या उज्वल भवितव्याची फार मोठी हमी आहे.सेना-नायक सिंह यांच्या रण-कौशल्याविषयीं गंधार गणानं आपलं मत या सुवर्णपत्रांत नमूद केलं आहे. मी त्यांचा उपनायक होतों. त्यामुळं त्यावेळीं मला सिंहाना अगदीं जवळून पहाण्याची संधी मिळाली. सिंह याच्या सारखा सेना-संचालक मिळणं हे कुणाहि देशाला अभिमानास्पदच आहे. या बाबतींत मी व तक्षशिलेचे भूत वर्तमान सेनापति, सेनानायक आणि युद्धविद्याविशारद या सर्वांचं मतैक्य आहे. या सेनानायकाला ज्या युद्धक्षेत्राचं आधिपत्य दिलं होतं, तेच सर्वांत महत्वाचं मर्मस्थान होतं. पार्शव सैन्याची सर्वांत मोठी चढाई इथंच होणार हें आम्हीं जाणून होतों. आमचे पूर्वीचे सेनापति, तक्षशिलेचे दिशा-प्रमुख युद्ध-विद्याचार्य बहुलाश्व याना सिंहाची योग्यता कळली होती. व त्यांच्याच संमतीनं आमच्या सेनापतीनं सिंह यांना सिन्धुनदीच्या या महत्वपूर्ण घाटाचं सेनानायकत्व दिलं. सेनानायकानं तिथं कशा तऱ्हेनं व्यूह-रचना केली, सेनेचं संचालन कसं केलं, व शत्रूचा प्रत्येक डाव अगोदरच कसा जाणला, इत्यादि गोष्टी मी इथं सांगूं इच्छीत नाहीं. भन्ते लिच्छविगण ! पार्शवांसारख्या अद्वितीय शासानुशासाच्या [ शाहेन्शाहा ] सेनेचा सर्वांत महत्वाचा भाग सिंह यांनीं एकाच तडाख्यांत खलास करून टाकला व पार्शव सेनापतीला कैद केलं. यावरूनच आपल्याला सिंह यांची योग्यता समजून येईल. सिंह यांना या युद्धांत जबर जखमा झाल्या होत्या. आणि मी अगदी निःसंदेहानं असं सांगतों कीं आचार्य बहुलाश्व यांची कन्या व मागाहून सिंह यांची पत्नी रोहिणी यांनी आपल्या तलवारीचं पाणी जर त्यावेळीं दाखवलं नसतं तर सिंह यांच्या कृपेनं आम्हांला विजयश्री अगोदरच मिळाली असून देखील रोहिणीच्या कृपेअभावीं सिंह मात्र आम्हांला मिळाले नसते. ”

कपिल भाषण संपवून खालीं बसला, तेव्हां सभासदांकडून आवाज येऊं लागला–“ आम्हीं रोहिणी व सिंह यांना पाहूं इच्छितो. ” रोहिणीला कोपऱ्यांतून

पकडून आणलें. सिंह पण गणपतींच्या आज्ञेनें तिच्या जवळ आले. आणि दोघेंहि गणासमोर उभीं राहिलीं.

गणाने सहस्र कंठांनीं घोषणा केली--

" जय जय गंधार गण ! "

" जय जय लिच्छवि गण ! "

" जय जय तक्षशिला ! "

" जय जय वैशाली ! "

आणि नंतर--

" चिरंजीव लिच्छवी-पुत्र सिंह ! "

" चिरंजीव गंधार-पुत्री रोहिणी ! "

गणपतींनीं सुवर्ण-पत्र वाचण्याचे आधीं म्हटलें--

" भन्ते गण ! प्रथम मी आपल्या वतीनं तक्षशिलेच्या आपल्या बांधवांचं स्वागत करतों. आयुष्मान् कपिल ! आपण व आपले सहकारी वाटेंतील अतिशय त्रास व संकटं सोसून वैशालीपर्यंत आलांत तें आम्हीं जाणून आहों. परंतु तीं कमी करणं आमच्या हातांतली गोष्ट नव्हती. तरीहि आमच्या वज्जी भूमींत–वैशालींत–त्या कष्टांचा थोडासा परिहार करूं शकलों तर आम्हीं आमचं भाग्य समजूं. आपण लिच्छवि भूमीला गंधार व वैशालीला तक्षशिला मानावं. हें आपलंच स्वतःचं घर आहे असं समजा व आम्हीं करीत असलेला स्वागतसत्कार हा आपल्या स्वजनांनींच केलेला स्वागत-सत्कार आहे असं समजून त्याचा स्वीकार करा. "

यानंतर गणपतींनीं तक्षशिलेचें सुवर्णपत्र वाचलें. तें वाचत असतां मधून मधून ' साधु--साधु ' [ धन्यवाद ] असा हर्षध्वनी होत होता. नंतर कोषाध्यक्षांनीं घोडे व इतर नजराणा यांची यादी वाचून दाखवल्या नंतर सांगितलें कीं ज्यांना या गोष्टी पहायच्या असतील त्यांना गणाच्या अश्वशाळेंत घोडे व कोशशाळेंत नजराण्याच्या वस्तु पाहायला मिळतील. नंतर गणपतींनीं सभा संपल्याचें सूचित केलें व जयघोष करीत करीत सगळेजण आपापल्या घराकडे चालूं लागले.

कपिल वगैरे लोकांची उतरण्याची व्यवस्था संस्थागाराच्या उत्तर पथाकडील गृहपतीच्या प्रासादांत केली होती.

मी रोहिणीला घेऊन सभागृहांतून बाहेर आलों. आणि पाहिलें तों काकींच्या बरोबर आई तेथें उभी. मी धावतच आईजवळ गेलों. तिनें मला जवळ घेऊन अश्रुभरल्या मुखानें माझें मुखचुंबन चालविलें. जरा शांत झाल्यावर तिच्या तोंडून इतकेच शब्द बाहेर पडले-- " ये बाळ, मला वाटलं आतां कांहीं तूं मला भेटत नाहींस. "

आम्हांला काकींच्या घरीं जायचें होतें. मला वाटतें त्याचवेळीं आम्हांला तेथेंच राहवून घ्यायचें ठरलें. मी आपल्या पित्याचें घर बघण्याची इच्छा दर्शवतांच आई मला तिकडे घेऊन गेली. घराची दुरुस्ती सुरूं केली होती, ती पुढें चालूं ठेवली. आमच्या शेताचें कामहि चालू आहे असे आईकडून कळलें. इथून आम्हीं जवळच असलेल्या माझ्या सावत्र पित्याच्या घरीं गेलों. फार दिवसांनीं भेटलेल्या पुत्राप्रमाणें त्यांनीं मला आलिंगन देऊन माझें स्वागत केलें. तिथें त्या घरांत सोमाचे लग्न होऊन गेल्यानंतर आई व ते अशीं दोनच माणसें राहिलीं होतीं. मी त्यांना कांहीं विचारणार तोंच त्यांना बहिरेपणा आल्याचें आईनें सांगितलें. तसा तर आईच्या शरीरांतहि खूपच फरक झाला होता. तिचे अर्धे केंस पांढरे झाले होते. पण पिताजी तर फारच थकले होते. त्यांनीं दीर्घ निःश्वास सोडून म्हटलें--

" बाळ, सोमाचं लग्न करून तिकडून तर निष्काळजी झालो. आतां फक्त तुझ्याच वाटेकडे डोळे लागले होते. तूंहि आलास, फार चांगलं झालं. "

" अन् बाबा, ही सून पण आली आहे. " रोहिणीला पुढें करून मी मोठ्यानें म्हणालों.

अश्रूंनीं डबडबलेल्या नेत्रांनीं त्यांनीं रोहिणीचें चुंबन घेतलें, व ' ज़रा थांब हं ' असें म्हणून ते आपल्या शयनगृहाकडे धांवत गेले. म्हातारा करतो आहे तरी काय म्हणून आम्हीं वाट पहात होतों. जरा वेळानें त्यांनीं एका निळ्या लोकरीच्या वस्त्रांत गुंडाळलेली मोतीं-पोवळ्यांची माळ काढली; व ती आपल्या हातांनीं रोहिणीच्या गळ्यांत घालून ते म्हणाले—

" मुली ! मी ही सिंहाच्या पत्नीकरतां मल्लिकेला सुद्धां न दाखवतां जपून ठेवली होती. आतां जिवाची आस एकदांची पूर्ण झाली. "

" नाहीं बाबा ! तुम्हांला अजून पुष्कळ जगायचं आहे. "

" नाहीं बाळ ! जीवननौका कशी तरी इथंपर्यंत आणली. आतां तुला पाहिलं ना, आतां मी आनंदानं मरेन. सत्तर वर्षं पूर्ण झालीं. कानहि चालले. असलं जीवन लिच्छवींना शोभत नाहीं. "

आपलें आयुष्य संपत आलें आहे अशी बाबांची पक्की खात्री झाली होती. मला वाटे कीं म्हातारपण म्हणजे दुसरें बाळपणच. चौथ्या दिवशीं पाहिलें तों बाबांना महानिद्रा लागलेली.

तेथून आईबरोबर आम्हीं दोघें काकींच्या घरीं परत आलों. आंतील दालनांत भामा वहिनीचा विशिष्ट आवाज व इतरहि पुष्कळांचें मोठमोठ्यानें हंसणे ऐकूं आलें. आंत पुष्कळशा बायकांचा जमाव पाहून आई म्हणाली— " पुन्हां या भामीनं नवा

उच्छाद काय मांडलाय आणखी ? " असें म्हणून ती काकींच्या खोलींत गेली. मी दृष्टीस पडतांच भामा पांच लिच्छवि सुंदरींना बरोबर घेऊन हंसत उड्या मारीत माझ्या जवळ येऊन ठेपली. रोहिणीच्या गळ्यांत नवीन माळ पाहून ती म्हणाली— " बाळ रोहिणी ! ही माळ तुला फारच चांगली दिसते. " असें म्हणून तिनें तिच्या मुखाचें चुंबन घेतले. नंतर माझ्याकडे मोर्चा फिरवून ती म्हणाली— " भावोजी, तुमच्या स्वागतासाठीं वैशालीची तरुण-रूपराशी एकत्रित झाली आहे. "

" स्वागतासाठीं का आणखी कशासाठीं तरी, होय ग वहिनी ? " मी हंसत हंसत म्हणालों.

भामानें कांहीं उत्तर न देतां रोहिणीचा हात धरला, व मला येण्याची खूण करून दालनाच्या एका बाजूला बैठकीवर आम्हांला नेऊन बसवलें. नंतर कांहीं तरुणींनी वीणा, मृदंग इत्यादि वाद्यें हातीं घेतली व त्यांच्या सुरावर कोकिल कंठी तरुणींनी वर-वधू घरीं आल्याच्या स्वागताचें मधुर मंगल गाणें म्हटलें नंतर भामेनें एक एक तरुणीला बोलावून तिची रोहिणीशीं ओखळ करून दिली. आलिंगनांत जास्त श्रम पडतात म्हणून फक्त मुखचुंबनावरच काम भागविलें. भामेनें लिच्छवींच्या एकूण एक प्रमुख कुलांतली सुंदर तरुणी, मुलगी अगर सून इथें बोलावून घेतलेली होती.

परिचयानंतर थोडा वेळ बैठकींत शांतता होती. नंतर भामानें जरा खांकरून आवाज साफ करून म्हटलें—

" वहिनींनो आणि बहिणींनो ! कुमारींनो व सौभाग्यवतींनो ! आम्हां सर्वांना आपले सिंह कुमार व त्यांची गांधारसुंदरी पत्नी रोहिणी यांचं स्वागत करतांना फार आनंद होत आहे. सिंह कुमार आम्हां तरुणींचे फार आवडते होते. आपल्यांतील कित्येकींना त्यांच्या चुंबनाचा आनंद मिळाला आहे. त्यांच्या बरोबर कित्येकींनीं नृत्य केलं आहे. त्याच्याबरोबर सह-पान केलं आहे. ते किती मधुर दिवस होते. आज ते स्वप्नवत झाले. पण त्या हृदय हालवून सोडणाऱ्या मधुर दिवसांची आठवण करायची जरूरी नाहीं. कारण आपण आज गोड स्वागत करण्यासाठीं जमलों आहोंत. आपण सर्वांनीं रोहिणीला पाहिलं ना ? सोन्याची सून, पेटींत बंद करून ठेवण्यालायक आहे ही. आहे कुणी वैशालि सुंदरी या तक्षशिला सुंदरीशीं स्पर्धा करणारी ? जर तसं असतं तर आमची आजची जनपदकल्याणी [ सर्वांग सुंदरी ] क्षेमा आपला पराजय कबूल करण्यास चटकन तयार झाली नसती—बाळ क्षेमा ! आणखी एकदां इकडे ये पाहूं "—एक अठरा वर्षांची तप्त-कांचन-वर्णा, विशालनेत्रा, घन-नील-मूर्धजा, अशी एक अतुल सौंदर्यवान तरुणी लज्जेनें मान खालीं घालून अपराधिनीसारखी भामेजवळ येऊन उभी राहिली. रोहिणीनें तिच्याकडे खूप न्याहाळून

पाहिलें— तक्षशिलेंत या तोलाची सुंदरी मिळणें कठीण आहे. भामानें आपलें बोलणें पुढें सुरू केलें—" तर मग भगिनींनो ! पाहिलंत, क्षेमासारख्या स्त्रीबद्दल वैशालीनं जर अभिमान बाळगला तर अनुचित होणार नाहीं; पण मला वाटतं रोहिणीला आमच्या या रूपराशीत सर्वोच्च स्थान दिलं गेलं तर तें कांहीं अनुचित होणार नाहीं. क्षेमाकडून झालेल्या पराजयाबद्दल भामा तिचा सूड घेत आहे असा आक्षेप माझ्या या बोलण्यावर कोणीहि घेणार नाहीं. अन् त्या बरोबरच आपण हेंहि लक्षांत ठेवावं कीं आम्हीं इथं जनपद कल्याणीची निवड मांडलेली नाहीं. म्हणून क्षेमाला याबद्दल काळजी करण्याचं कारण नाहीं. इथं मी आणखी एक गोष्ट सांगूं इच्छित्यें. लिच्छवि कुमारिका अलीकडे सौंदर्यकलेंत जास्त प्रवीण होऊं लागल्या आहेत. विशेषतः ती काळतोंडी—मला वाईट वाटतं कीं ती अक्षरशः काळतोंडी नाहीं—अंबापाली हिनं आपल्या सौंदर्याचं दुकान मांडलं तेव्हांपासून वैशालीच्या प्रत्येक तरुणीला आपला संसार नष्ट होण्याची भीति वाटूं लागली आहे. सर्वजणी नटण्या-मुरडण्यांत नगरभवानी अंबापालीवर मात करण्याची इच्छा करीत आहेत. हें मी कांही वाईट समजत नाहीं. कांही झालं तरी सर्वांचे पति मनोरथ सारखे स्वतःला पत्नीच्या एका केंसानं बांधून घेऊन फिरणारे नाहीत. लिच्छवि कुमारींनीं एक पक्षीं अंबापालीला सौंदर्यकलेचा गुरू मानलं व त्या कुलंकिनीपासून कित्येक रात्रींचे हजारों कार्षापण वांचवले खरे, पण दुसऱ्या पक्षीं एक फारच मोठा अक्षम्य अपराध त्यांच्या हातून झाला आहे.

" होय, मी पूर्ण विचार करूनच बोलत्यें आहे. लिच्छवि कुमारिका सौंदर्योपासनेच्या मागं लागून इतक्या वेड्या होत चालल्या आहेत कीं त्यांना आपण लिच्छवि आहोंत याचा विसर पडला आहे. भगिनी रोहिणी ! तुझे हात जरा दाखवं पाहूं. " रोहिणीनें आपले हात भामाच्या हातीं दिले. माझा श्वासोच्छ्वास भीतीनें जोरांत होऊं लागला. नंतर भामा म्हणाली—" आपण सगळ्या उतावळया होऊं नका, मीं दहा दहा जणीना बोलावून रोहिणीचे हात दाखवत्यें. तिचे हात फारच सुंदर आहेत. विचार करून पहा सुंदर हात कसे असतात ते. बरं आहे, तुम्हीं जवळच्या प्रथम पहा. रोहिणीच्या हातावर हात फिरवून पहा. आहेत ना वज्रासारखे कठीण, राकट ! खरं खरं सांगा हं. " सर्वजणींनीं होकारार्थी माना हलविल्या. नंतर अशा तऱ्हेनें दहा दहा जणींना बोलावून भामानें रोहिणीचे हात दाखविले. तसें पाहिलें तर कांहीं-जणी जरा बिचकत होत्या. पण गांधारी कन्येच्या दर्शन स्पर्शनाची लालसा एकदम थोडीच नाहींशी होणार होती ? सर्वांचें हात पाहून झाल्यावर भामानें आपलें बोलणें पुन्हां सुरू केलें—

" भगिनींनो ! रोहिणी आपणां सर्वांपेक्षां काय कमी सुंदर आहे ? तोंडापुरतं नको, खरं सांगा. "

सर्व जणींनीं एकदम म्हटलें--आम्हां सर्वांपेक्षां जास्त सुंदर आहे ती. क्षेमापेक्षांहि."

"परंतु भगिनींनो! रोहिणीच्या सौंदर्यांत एक फार मोठा दोष आहे. तिचे हात शिरीष अगर पद्म पुष्पासारखे कोमल नाहींत. अंबापालीच्या शाळेंत त्यांना सुंदर म्हणत नाहींत. मग काय या हातांच्या दोषांमुळं रोहिणीला आपण अ-सुंदरी म्हणायचं? अंबापालीच्या शिष्यिणी मात्र असंच म्हणतील. पण मी व माझ्या आधीच्या सगळ्या जनपदकल्याणी असं म्हणतील कीं अंबापाली व तिची शाळा कांहीं तरी खोटं बकतात. भगिनी रोहिणीचं सौंदर्य अनुपम असूनहि तिच्या या राठ हातांना सुंदर कां म्हणायचं, तर लिच्छवि स्त्रियांना असेच हात भूषणावह आहेत म्हणून. अत्याचारी मगधराज सर्व संकटांना तोंड देऊन एका रात्रीं लपत-छपत अंबापालीचं सौंदर्यपान करण्याकरतां वैशालीला आला होता. तोच बिंबिसार--केव्हां तरी वज्जीवर आक्रमण करणार आहे; आमचे बंधू, पति, दीर, पिता, काका, सासरा, त्याला तोंड देण्याची तयारी करीत आहेत. आतां तुम्हींच सांगा आम्हां लिच्छवि स्त्रियांना आमच्या आजींपणजींप्रमाणं शत्रूशीं लढण्यांत जर भाग घ्यावा लागला तर काय अंबापालीप्रमाणं कमलासारखे कोमल हात आमच्या कामीं येतील? हे हात खड्ग व भाला चालवूं शकतील? हे असले कोमल पंजे ढालीचा धक्का थांबवूं शकतील? नाहीं, पण भगिनी रोहिणीचे हात आतां तुम्ही पाहिलेतच. या हातांनी शंभर बिंबिसारांची बरोबरी करणाऱ्या बलवान पार्शव राजाचा मद नष्ट केला आहे. ह्मणून मी ह्मणत्यें ज्यांनीं कुणीं अंबापालीकडून नाजूक हात विकत घेतले आहेत त्यांनीं ते तिचे तिला परत करावेत; ते फार महाग आहेत. आम्हांला लिच्छवि स्त्रियांचे हात पाहिजेत. रोहिणीचेच हात लिच्छवि स्त्रियांचे आदर्श हात आहेत. रोहिणीची माझी भेट झाल्याला आज पांचवा दिवस आहे. पण असं वाटतं कीं आम्हीं जन्मजन्मांतरींच्या भगिनी आहोंत. माझेहि हात रोहिणीच्या सारखे आहेत हें मी माझं भाग्य समजत्यें. व आम्हीं दोघींनीं ठरवलं आहे कीं मनोरथ व सिंह यांच्या हातीं खड्ग दिसलं कीं आम्हीं खड्ग-धारिणी बनलोंच. भगिनींनो! काय तुम्हांला नाहीं वाटत आपणहि खड्ग-धारिणी व्हावं म्हणून?"

"होय, आमचीहि इच्छा आहे." बहुतेकींनीं म्हटलें.

भामा पुन्हां म्हणाली--"इच्छा आहे तर प्रथम हे हात बदलून घ्या. कलंकित अंबापालीच्या हातांसारखे ज्यांचे हात आहेत त्यांना मी हें सांगत्यें आहे. ते बदलायचा उपायहि मी सांगत्यें. दळण-कांडण स्वयंपाक यां सारखी श्रमाचीं व हात मजबूत करणारीं कामं फक्त दासींच्या वरच सोडूं नका. खड्ग, शल्य, ढाल, धनुष्य इत्यादींचा रोज सराव करा. शेतांत गेल्यावर स्वतः कुदळ चालवा. उन्हांत

हिंडण्याची संवय करा. नाचून उड्या मारून अंगांतील सर्व चर्बी घालवून टाका. मी आज फार मोठा उपदेश केला तरी आपण मला क्षमा करावी. आतां मनोरंजनाच्या गोष्टी सुरूं करूं या. "

नंतर मांस, सुरापात्र व पेले आले. सर्वजणी खाण्यापिण्यांत मग्न झाल्या. भामा स्वतः सुरापात्र घेऊन आम्हां दोघांजवळ बसली व आमच्या पेल्यांतून सुरा ओतूं लागली. मी म्हणालों--

" वहिनी तूंहि पी कीं. "

" पिईन कीं मग. "

" पेला तर आण. "

" राहूं दे. यांतनंच पिईन. "

" यांतनंच ? "

" होय, याच्यांतनंच. कारण तुमच्या ओठांचा स्पर्श झाला असल्यामुळं ती जास्त गोड लागेल. "

माझ्या हृदयांत धस्स झालें. भामाचा गंभीर उपदेश ऐकून मला वाटलें होतें कीं चला, आज सुटलों, पण आतां काळजी वाटूं लागली. मला स्वस्थ बसलेला पाहून भामा ह्मणाली—

" काय भावोजी, भावजयीला बरोबर बसून एक घोंट मदिरा पिण्याचा पण अधिकार नाहीं ? "

नंतर तिनें इतर तरुणींना उद्देशून म्हटलें-- " ऐकलंत कां ग सख्यांनो ! सिंह भावोजी भावजयीबरोबर एक घोंट मदिरा पिण्याचाही अधिकार देऊं इच्छीत नाहींत. मी तर ह्मणत्यें हा अगदीं अन्याय आहे. "

शामा— तिच्या पिवळसर डोळ्यांच्या कडा लाल लाल होऊं लागलेल्या होत्या—ती प्रथम ह्मणाली--" होय भगिनी, हा अगदीं अन्याय आहे. अन् सिंह कुमारांना लहानपणापासून अन्याय करायची संवयच आहे. त्यांनीं किती जणींचीं तरी हृदयं दुखावलीं आहेत. मी आम्रवनांत यांच्या बरोबर कित्येक वेळां फिरल्यें आहे. धान्याच्या वाफ्यांतून सिंहांनीं मला कित्येक वेळां उचलून पलीकडे नेलं आहे. नृत्यांगणांत कित्येक रात्रीं आम्हीं बरोबर उतरलों आहोंत. त्यांनीं मला चुंबनं व आलिंगनं इतके वेळां दिलीं कीं त्यांची गणतीच नाहीं. अन् शिवाय मला वचन दिलं होतं कीं, ' शामा, या अंतःकरणांत फक्त तुलाच जागा आहे. ' आतां तुम्हींच सांगा ! सिंहांनीं वचन मोडून न्याय केला कीं अन्याय ? "

" अगदीं धडधडीत अन्याय. " भामा म्हणाली.

" तर मग याकरतां काय शिक्षा केली पाहिजे ? "

सिंह भावोजी, एका पायावर उभे राहून हात जोडून शामाची माफी मागा नाहीं तर— "

" ही कांहीं पार्शव सेना नाहीं भावोजी !. ही लिच्छवियानींची सेना आहे. इथं तुमची एकट्याची काय दशा होईल ठाऊक आहे ? "

चार तरुणींनीं माझा हात धरून मला उभं केलं. नंतर एकीनें माझा पाय उचलून म्हटलें-- " बस्स. माफी मागा. "

" माफी, उशीर करूं नका. आमच्या सेनापतीची आज्ञा आहे. "

रोहिणीकडे पाहिलें तों तिनें हंसून तोंड फिरविलें. मी म्हटलें— " ठीक आहे. सांगाल तशी माफी मागतों. "

शामा जवळ येऊन बसली. मी सख्यांच्या शब्दांची पुनरावृत्ति करून माफी मागितली.

आतां उषेनें तोंड वाईट करून म्हटलें— " सखी भामे, माझा पण न्याय कर. किती वर्षं झाली त्या गोष्टीला ते आठवत नाहीं. पण आम्हीं दोघं फिरायला गेलो होतों. सिंह म्हणाले— ' उषा, पांच चुंबनं दे, नंतर मी परत करीन. ' मी त्यांना तेव्हांच पांच चुंबन दिलीं. अन् तीं अजून त्यांनीं परत केलीं नाहींत."

भामानें माझ्याकडे वळून म्हटलें--" सागा यावर तुमचं काय म्हणणं आहे ? "

" वहिनी, ती लहानपणची गोष्ट आहे. आम्हीं चार-सहा वर्षांचीं असूं त्यावेळीं."

" म्हणजे याचा अर्थ असा कीं कर्ज फार जुनं आहे; व्याज खूप वाढलं असेल."

" मग आतां ? "

" मग काय ? उषेला दहा चुंबनं घेण्याचा अधिकार आहे. आमच्या गणांत दामदुपटीपेक्षां जास्त व्याज होत नाहीं. ठीक आहे उषा ! तूं आपलं कर्ज फेडून घे."

चार तरुणींनी येऊन माझे हात पकडले. व उषानें पांच-पांच चुंबनें एकेका गालाचीं घेतलीं. मी अगदीं घाबरून गेलों. अशा तऱ्हेने जर जुनें कर्ज द्यावें लागूं लागलें तर तें फेडण्यांत मी स्वतःच खतम् होईन.

भामानें नंतर उच्च स्वरानें म्हटलें— " सख्यांनो ! बस्स. आजचाच दिवस भामा न्यायासनावर आहे. अन् आजचाच दिवस निर्दोष न्याय मिळेल. "

रमा न्याय मागण्यास उठणार इतक्यांत बाहेर वाद्यांचा आवाज ऐकूं आला. एका दासीनें येऊन सूचना दिली कीं नृत्यसमाज एकत्रित झाला आहे; तक्षशिलावाले तरुण पण आले आहेत. भामेनें एकदम म्हटलें-- " भगिनींनो ! आतां नृत्य-शाळेंत चला. " माझा आपल्या कानांवर विश्वासच बसेना. नंतर आम्ही तिघांनीं-भामाहि आमच्यांत होती-भराभर मांसाचे तुकडे संपवले. व दोन तीन पेले सुरा घशाखालीं उतरवून आम्हीं त्या दालनांतून बाहेर गेलों.

नृत्यशाळा काकींच्या घरापासून दूर नव्हती. तिथें जाऊन पाहिलें तों वैशालींची सर्व तरुण-लिच्छवि-मंडळी जमली आहेत. त्यांत तक्षशिलेचें नागरिक मंडळ सोडून माझे बरेचसे बालमित्र आहेत. आपल्या बालमित्रांची इतकी मोठी संख्या पाहून मला फार आनंद वाटला. ज्या सर्वांना मी आठ आठ दहा-दहा वर्षांची मुलें या सदरांत सोडून गेलों होतों त्यांना आज चांगलेच वाढलेले व बलवान असे पाहात होतों. आज चालीप्रमाणें मला रोहिणीच्या बरोबर नाचायचें होतें. जनपदकल्याणी क्षेमानें माझा मित्र कपिल याला आपला सहनर्तक ठरविलें होते. यूथ-नृत्य, मिथुन-नृत्य आदि कित्येक नृत्यें होऊं लागली. आजच्या नृत्यांत वैशालीच्याच नाहीं तर साऱ्या वज्जी देशांतल्या प्रसिद्ध तरुण-तरुणींनीं भाग घेतला होता. त्यामुळें त्याच्या प्रशंसेविषयीं कांहीं सांगणें फुकटच आहे.

मधून मधून पहिल्या चक्रांतील लोक विश्रांति घेत तेव्हां दुसरे लोक नृत्यांगणांत उतरत होते. विश्रांतीच्या वेळीं खाण्या-पिण्याची व्यवस्था गणामार्फत असे. हा नृत्य-महोत्सव वस्तुतः अतिथींच्या सन्मानाकरतां केलेला होता.

अगदीं थोडी रात्र शिल्लक असतांना आम्ही दोघें घरीं परत आलों.

## ( १४ )

# लिच्छवि-अभिषेक

माझे सावत्र पिता गणसंस्थेचे सदस्य होते. त्यांच्या मृत्यूनंतर एक नवा सभासद निवडण्याची जरूरी होती. माझ्या घराण्यांतील गृहमुखींनीं [ मुख्य लोकांनीं ] मला सदस्य करण्याबद्दल सल्ला दिली. परंतु माझा चुलत भाऊ अजित सदस्य होण्याकरतां फार उत्सुक झाला होता. आमच्या कुलांत सर्वांत जास्त शेती व जनावरें त्याच्याच जवळ होतीं. म्हणून त्याला वाटे सदस्य होण्याचा हक्क आपल्यालाच आहे. पण या मतभेदाचा अंतिम निर्णय गणसंस्थेनेंच करायचा होता. मला वाटलें आपण बाजूला व्हावें. परंतु माझ्या कुलांतल्या मंडळींपेक्षांहि गणपति सुनंद व सेनापति सुमन यांचाच जास्त आग्रह होता. त्यांचे म्हणणें असें कीं आपल्या गणावर मोठें संकट येण्याची ही वेळ आहे. या वेळीं सदस्य होण्याला इन्कार करणें हा स्वार्थत्याग नसून उलट लिच्छवींच्या बाबतीतील कर्तव्याला विन्मुख होणें आहे. नाइलाजानें मला माघार घ्यायचा बेत सोडावा लागला. अजितला

लोकांनीं पुष्कळ समजावलें पण त्यानें ऐकलें नाहीं. आपले मामा सुमन सेनापति व दुसरे प्रमुख नातेवाईक आपल्याला मदत करतील अशी त्याला खात्री होती, अन् शिवाय गरीबाचा मुलगा सिंह याच्यापुढें तर आपली जीत आहेच आहे, असा त्याचा विश्वास.

एक दिवस संस्थागारांत गण-सन्निपात [ सदस्यांची बैठक ] झाला. आई व काकी यांच्या बरोबर रोहिणीहि प्रेक्षकांच्या जागी जाऊन बसली. संस्थेच्या कार्याला सुरवात करतांना गणपति सुनंद म्हणाले—

" भन्ते गण ! ऐका. आज गणाची सभा कशा करतां बोलावली आहे हें आपणां सर्वांना ठाऊकच आहे. आपलं ज्ञातृकुल ( जथरिया ) या कुलांतील एक जागा रिकामी झाली आहे. तिच्या जागी एक सदस्य आपल्याला निवडायचा आहे. सभासदत्वाकरतां उभे राहिलेल्या उमेदवारांचीं नांवं सांगण्याचे आधीं सभेपुढं मला एक सूचना करायची आहे कीं या वेळी लिच्छवीवर एक मोठं संकट आलेलं आहे. आम्हांला प्रत्येक पाऊल त्या संकटाचा विचार करूनच टाकलं पाहिजे. आम्हांला आपली संस्था सुदृढ व बलवान बनवायची आहे ही गोष्ट नेहमीं लक्षांत ठेवली पाहिजे.

" भन्ते गण ! सभासदत्वाकरतां आमच्यापुढं दोन नांवं आलेली आहेत. तीं म्हणजे सिंह व अजित. दोघेहि ज्ञातृकुलाचे आहेत. आम्हीं यां पैकीं फक्त एकाला निवडायचं आहे. प्रथम मला हें कळलं पाहिजे कीं या गणांत दोघांच्या बाजूचे लोक आहेत का एकाच्याच. आयुष्मान् सिंह यांच्या पक्षाचे जे असतील त्यांनीं ' हो ' म्हणावं." यावर सभागृहाच्या कोपऱ्या-कोपऱ्यांतून ' हो '' हो ' आवाज आला. नंतर अजितला पसंत करणाऱ्या लोकांविषयीं विचारलें तेव्हां पहिल्यापेक्षां कमी पण कितीतरी ' हो ' ' हो ' आवाज आले. गणपतींनीं नंतर म्हटलें—

" भन्ते गण ! इथं दोघांहि आयुष्मानांच्या बाजूचे सदस्य आहेत असं दिसतं. म्हणून छंद-शलाका [ मताच्या लाकडी कांड्या ] उचलण्याशिवाय दुसरा कांहीं उपाय नाहीं. आयुष्मान् गण-गणक यांना मी असं विचारतों कीं आजच्या सन्निपाताला [ बैठकीला ] किती सदस्य आले आहेत. "

गण-गणकानें ८७२ ही संख्या सांगितली.

गणपति म्हणाले—"वज्जीमध्यें हजर असलेल्या गणसंस्थेच्या प्रत्येक सभासदाला आजच्या सन्निपाताची सूचना पाठवली होती. म्हणून भन्ते गण ! जितके सभासद इथं येण्यासारखे होते तेवढे सर्व आले आहेत. इथं या गणांत कोणी वेडा तर नाहीं ? असेल तर त्याच्याजवळच्या आयुष्मानानं मला तसं सांगावं." ( थोडा वेळ थांबून ) " सर्वजण गप्प आहेत त्याअर्थीं कोणी वेडा नाहीं असं मी गृहीत धरतों. कोणी

सुरामत्त आहे का ?" (थोडा वेळ थांबून) "सर्वजण गप्प आहेत त्या अर्थी इथं कोणी सुरामत्त नाहीं असं मी गृहीत धरतों." नंतर दोन शलाका हातीं धरून ते म्हणाले– "भन्ते गण! या दोन लाल व काळी अशा शलाका आहेत. लाल रंगाची स्वीकाराची सूचक आहे व काळी नकाराची सूचक आहे. शलाका-ग्रहायक [मत-पत्रिका वाटणारे] दोन वेग-वेगळया टोपल्यांतून दोन्हीं प्रकारच्या ८७२ शलाका घेऊन आपल्या जवळ येतील. मी आपल्यापुढं नांव उच्चारीन तेव्हां त्या नांवाबद्दल 'होय' किंवा 'नाहीं' तें आपापल्या मतानुसार त्या रंगाची एक छंद-शलाका उचलून घ्यावी. अशा तऱ्हेनंच दुसऱ्या नांवाबद्दलहि करावं. एखादी शलाका खालीं पडली तर ती उचलून आयुष्मान् शलाका ग्रहायक यांच्या जवळ द्यावी.

"भन्ते गण! आमचे तेच जुने दहा शलाका-ग्रहायक अजूनहि आहेत. जर त्यांच्यापैकीं कुणाविषयी कोणाला अविश्वास वाटत असेल तर त्यानीं बोलावं. अविश्वास नसेल तर गप्प बसावं......! दोन वार......त्रिवार देखील विचारतों कोणाचा अ-विश्वास असेल तर बोलावं; अविश्वास नसेल तर गप्प बसावं......भन्ते गण गप्प आहेत त्या अर्थी जुन्या दहा शलाका-ग्रहायकांवर गणाचा विश्वास आहे असं मी गृहीत धरतों.

"भन्ते गण! ऐका. आयुष्मान सिंह यांचं नांव मी प्रथम आपणांपुढं सादर करीत आहे. शलाका-ग्रहायक आयुष्मान् आपणाजवळ आलेले आहेत. सर्वांनीं आपापल्या जागी बसून राहावं. शलाका-ग्रहायक स्वतःच आपणांकडे येतील. ज्यांना आयुष्मान् सिंह यांना मत द्यायचं असेल त्यांनी लाल शलाकांपैकीं एक उचलावी. आणि ज्यांना द्यायचं नसेल त्यांनी काळया शलाकांपैकीं एक उचलावी. आता आपण शांतपणं शलाका ग्रहण करा. कोणाला काहीं शंका असेल तर त्यानी शलाका-ग्रहायकाला कानांत विचारावं."

शलाका-ग्रहायक लाल काळया शलाकांच्या टोपल्या प्रत्येक सभासदापुढें करीत व ते त्यांतून पाहिजे ती एक एक उचलीत. शलाका वांटून झाल्यावर शलाका-ग्रहायक परत आले. नंतर गणपति म्हणाले––

"भन्ते गण! छंद-शलाका वांटून झाल्या. ज्या आयुष्मानांना शलाका मिळाली नाहीं किंवा जास्त मिळाली वा कांहीं गोंधळ झाला असेल तर त्यांनीं बोलावं. ज्यांना बरोबर मिळाल्या असतील त्यांनीं गप्प बसावं. दोन वार......त्रिवार...... सर्वजण शांत आहेत त्या अर्थी सर्वांना बरोबर मिळाल्या असं मी गृहीत धरतों."

नंतर गणपतींनीं तांबड्या व काळया शलाका वेगवेगळया मोजल्या. त्यांत तांबड्या पांच शलाका शिल्लक राहिल्या होत्या व काळया ८६७ होत्या. नंतर गणपतींनीं जाहीर केलें––

" भन्ते गण ! ऐका. शिल्लक राहिलेल्या छंद-शलाकांमध्यें लाल पांच व काळया ८६७ आहेत. यावरून हें स्पष्ट झालं कीं आपणांपैकीं ८६७ जणांनीं आयुष्मान सिंह यांना आपलं मत दिलं व पांच त्यांच्या विरुद्ध आहेत. कोणीहि आयुष्मान तटस्थ राहिले नाहींत. आतां आपल्या जवळ शलाका-ग्रहायक येत आहेत त्यांना आपण आपल्या शलाका परत द्याव्या. "

शलाका परत आल्या त्या मोजून तशाच टोपल्यांतून ठेवण्यांत आल्या. नंतर गण-पति म्हणाले—

" भन्ते गण ! ऐका. आतां मी आयुष्मान अजित यांचं नांव आपल्याला सादर करीत आहे.... जे आयुष्मान् आपला छंद आयुष्मान् अजित यांना देऊं इच्छितात त्यांनीं लाल शलाकांपैकीं एक घ्यावी व ज्यांची इच्छा नसेल त्यांनी काळ्यांतील एक घ्यावी.... "...

परत आलेल्या शलाका मोजल्यानंतर लाल ८७२ व काळी एकहि राहिली नव्हती. नंतर गण-पतीनीं जाहीर केलें--

" भन्ते गण ! ऐका. शिल्लक राहिलेल्या शलाकांत काळी एकहि नाहीं. व तांबड्या ८७२ आहेत. यावरून असं स्पष्ट दिसतं की आपणांपैकीं कोणाहि आयुष्मानानं आयुष्मान अजित यांना आपलं मत दिलेलं नाहीं.

" भन्ते गण ! ऐका. आयुष्मान् सिंह व आयुष्मान् अजित यांच्यासाठीं छंद-शलाका स्वीकारल्या गेल्या त्या मोजल्यानंतर मला असं दिसून आलं कीं हा गण आयुष्मान् सिंह याना आपला सभासद म्हणून स्वीकार करीत आहेत. भन्ते गण ! आणखी थोडा वेळ थाबा. मी अमात्य-परिषदेशीं आतांच्या आतां विचारविनिमय करून आयुष्मान् सिंह यांच्या अभिषेकाचा दिवस सांगतो. "

गणपति व अमात्य परिषद जवळच्या खोलीत गेले व थोड्या वेळानें बाहेर येऊन गणपतींनीं जाहीर केलें--

" भन्ते गण ! आजपासून पाचवे दिवशीं आयुष्मान् सिंह यांना लिच्छवि-अभिषेक होईल. "

संस्थागारांतून बाहेर येतांच पहिल्याप्रथम दृढालिंगन देणारी व्यक्ति अजित हीच होती. तो म्हणाला--" बन्धू सिंह ! धन्यवाद. सर्वांत योग्य माणसाला मत-दान झालं. अन् या विषयीं मला फार आनंद झाला आहे. "

मीहि त्याला प्रत्यालिंगन देऊन आपली कृतज्ञता प्रगट केली. नंतर रोहिणीला जवळ पाहून अजित म्हणाला--" रोहिणी वहिनी ! सहस्र धन्यवाद ! " रोहिणीनें जवळ आलेल्या अजितच्या कपाळाचें चुंबन घेतलें.

नंतर अजित म्हणाला–"भाऊ, आज संध्याकाळीं माझ्या घरीं या. तिथं ज्ञातृ-कुलांतील तरुण-तरुणी जमणार आहेत. अन् त्यावेळीं तक्षशिलेच्या नागरिक मंडळाला पण मी बोलावणं करीत आहे."

रोहिणी मध्येंच म्हणाली—"अन् भामाताईला?"

"भामा ज्ञातृ-कुलाची नाही, पण वहिनी, तुमचं म्हणणं असेल तर तिला बोलावीन; पण तिच्यापासून तुम्ही माझा जीव मात्र वांचवा."

"भामाताई काय तुमचा जीव घेईल होय?" रोहिणी हंसत म्हणाली.

"वहिनी, जीव घेणं सुद्धां त्या पेक्षां बरं. भामा इतकं डोकं भंडावून सोडते कीं जीव गेलेला बरा. मीहि एकदां दुर्दैवानं तिच्या तावडींत सांपडलों होतों. क्षमा करा वहिनी, मी तिला बोलावीन पण तिच्या जिभेपासून मात्र माझं रक्षण करा."

"अजित भावोजी, त्या बाबतींत तुम्हीं अगदीं निष्काळजी रहा."

गण संस्थेच्या सभासदांनी माझें अभिनंदन केलें व पुष्कळ वेळपर्यंत आलिंगन-प्रत्यालिंगन चालूं राहिले.

घरीं पोंचल्यावर पाहिलें तों तेथे भामा हजर. ती चटकन उडी मारून माझ्या जवळ आली. मी घाबरलों. मला अजितच्या बोलण्याची आठवण झाली. भामाने मला आपल्या भुजापाशात घेऊन माझ्या कपाळाचें, भुंवयाचें व गालांचे चुंबन घेतलें. नंतर मला सोडून रोहिणीला मिठी मारून ती सजल नेत्रांनी तिच्याकडे पाहात राहिली. नतर किती तरी वेळ ती मूक-भावानें तिच्या मुखाचीं चुंबनें घेत राहिली. रोहिणीचे डोळेहि ओलसर झाले. नंतर प्रथम भामाच बोलली--

"रोहिणी! प्रिय रोहिणी!! मला फार आनंद वाटतो, मला अभिमान वाटतो. एवढ्याशा वयांत फारच थोडे लिच्छवि गण-संस्थेच्या सभासदत्वाच्या मानास पात्र होतात. परंतु आमचा सिंह त्या योग्यतेचाच आहे. अन् प्रिय रोहिणी! अजित तुझ्याशी हंसत हंसत काय बोलत होता?"

"हंसत नव्हता कांहीं भामाताई! नंतर तो रडतच बोलत होता."

"मला सांगायला कांहीं हरकत आहे?"

"भामाताई, जें मला ऐकण्यालायक आहे तें तुलाहि ऐकण्यालायक आहेच."

भामानें रोहिणीचें मुखचुंबन घेऊन म्हटलें "रोहिणी! या विश्वासाबद्दल धन्यवाद."

"भामाताई! मला सख्खी बहिण नाहीं, अन् सख्खा भाऊ पण नाहीं. अन् मला त्या बद्दल वाईट वाटत होतं. पण तुझ्या रूपानं मला एक प्रेमळ सख्खी बहिण मिळाली. आपल्या बहिणीपासून एखादी गोष्ट लपवून ठेवायची मला कधींच इच्छा होऊं नये." असें म्हणतां म्हणतां तिच्या डोळ्यांत अश्रू आले.

भामानें रोहिणीला घट्ट मिठी मारली व डोळयांतील अश्रू पुशीत ती म्हणाली– "बाळ रोहिणी! तूं किती प्रेमळ आहेस. मला तुला पाहिल्याशिवाय चैनच पडत नाहीं. सख्ख्या बहिणीलाहि दुर्लभ असं स्थान तूं माझ्या हृदयांत मिळवलं आहेस."

"बरं आहे, मग काय भामाताई? तूं मला अजित बद्दल ना विचारीत होतीस? अजितनीं आम्हां दोघांना आज संध्याकाळीं बोलावलं आहे. ज्ञातृ तरुण-तरुणींचा आमोद-प्रमोद होणार आहे."

"ज्ञातृ-तरुण-तरुणींचा?"

"हो, पण तुझ्याशिवाय मी कसं आमत्रण घेऊं? मी जेव्हां तुलाहि बोलावण्याबद्दल म्हणाल्यें तेव्हां तो बिचारा घाबरला."

"घाबरला?"

"हो, ते म्हणाले–' मी बोलावीन, पण भामाच्या जिभेपासून मला वांचवा '!"

"ठीक, अजित बाळा! भामाच्या जिभेची भीति वाटते तुला! पण रोहिणी! तूं त्याला वचन तर दिलं नाहींस ना?

"ताई, दिलंय मी."

"द्यायला नको होतं. मग मी पाहिलं असतं अजित बाळ दहावेळां नाक घांसून भामेला न्यायला कसा येत नाहीं तें."

"ताई, म्हणूनच त्यानं बोलावण्याचं चटकन कबूल केलं असेल. अन् नंतर गयावया करूं लागला."

आईला व काकींनाहि आनंद झालाच होता. त्यांची सभा वेगळ्या खोलींत भरली होती. तिथें वृद्ध लिच्छवि स्त्रिया धन्यवाद देत होत्या. मी आल्याची बातमी ऐकून शूरसेन उत्तरेच्या सरहद्दीवरून आजच आला होता व आमचा आवाज ऐकतांच तो सोमाला घेऊन धांवतच तेथें आला. त्याचे डोळे अजूनहि सुजलेले होते. त्यानें रात्रभर घोड्यावरून प्रवास केला असला पाहिजे असें अनुमान ओघानें आलेंच. त्यामुळें इथे आल्याबरोबर झोपेशिवाय त्याला दुसरे कांहीं करणें शक्य झालें नाहीं. त्याने रोहिणीच्या कपाळाचें चुंबन घेतलें. नंतर माझ्या गळ्याला घट्ट मिठी मारून तो म्हणाला—" बंधू सिंह! तुला किती किती धन्यवाद देऊं. मला काल सकाळीं बातमी कळली अन् त्या क्षणाला मी निघालोंच."

"शूरसेन! उत्तर सीमेवर कांहीं भीति तर नाहीं?"

"नाहीं भाऊ! उत्तर सीमेला हत्ती, गेंडे किंवा सिंह यांचं तेवढं भय आहे. मी दोन मोठे हत्ती मारले. काय करावं, उशीर होईल म्हणून दांत काढून आणतां आले नाहींत. एकाचे दांत चारचार हात आहेत. मी ते रोहिणी वहिनीला नजर करीन."

भामानें मध्येंच म्हटलें--" रोहिणीला; सिंहांना नाहीं. या पक्षपाताला कांहीं सीमा आहे ? "

शूरसेन—" जर मीं भाऊला नजर केले असते तर भामावहिनी म्हणाली असती-'पुरुषालाच ना ? या पक्षपाताला कांहीं सीमा आहे ? ' "

भामा—" बरं, जाऊं दे, दातांचा नजराणा वहिनीच्या चरणीं अर्पण झाला. पण सिंहांना कोरे तर नाहीं ठेवलेंत ? "

शूरसेन--" कोरा नाहीं, भाऊकरतां गेंड्याची ढाल वाट चालते आहे. एक नाहीं सहा. "

भामा--" अरे राम ! भावोजी ! मी तुमची भावजय काय खोटीच झाल्यें ? माझीं हजारो चुंबनं फुकट गेलीं ना ? "

शूरसेन—" पण वहिनी यावेळीं तर तूं नुसता अभिनयहि केला नाहींस; त्याची वाट काय ? "

भामाने चटकन त्याला आलिंगन देऊन त्याची कित्येक चुंबनें घेतलीं. मग ती म्हणाली--" झालं ? आतां बोला. "

शूरसेनाने चटकन आपल्या अंगरख्यांतून हस्तीदंताच्या म्यानांत ठेवलेली कट्यार काढून भामाच्या हातांत दिली; व चटकन गुडघे टेंकून हात जोडून तो म्हणाला--" देवी ! शूरसेन दासाच्या या भेटीचा स्वीकार कर, अन् त्याच्या बाहूंना बल दे. "

भामाने कट्यारीकडे पाहून गालांतल्या गालांत हंसून म्हटले--" एवमस्तु दास शूरसेन ! तुमची देवी तुम्हांला उभे राहाण्याची आज्ञा करीत आहे. व त्याचबरोबर मनसोक्त चुंबनं घेण्याचीहि. "

शूरसेनानें उभा राहून भामाचे गाल चुंबून चुंबून लाल करून सोडले. नंतर सर्व-जण कट्यारीच्या म्यानावर काढलेलीं चित्रें लक्षपूर्वक पाहूं लागले. त्याच्या एका बाजूला रान-हत्तींचा कळप काढला होता. त्यांच्या मोठ्या दांतवाल्या म्होरक्याचे चित्र काढ-ण्यांत चित्रकारानें आपलें कौशल्य चांगलें दाखवले होते. दुसऱ्या बाजूला वृक्षांचे राईत सिंह-सिंहीण आपल्या दोन शावकांना घेऊन बसलेले काढले होते. सिंहीण आडवी झालेली होती व सिंह आपल्या जिभेनें आपल्या प्रेयसीचे कान चाटीत होता. शावक आईच्या शेपटीशीं खेळत होतें. पुष्कळ वेळ पाहिल्यावर भामा म्हणाली--

" शूरसेन भावोजी ! अशी तीक्ष्ण कट्यार व सुंदर म्यान दिल्याबद्दल हजारों धन्यवाद." नंतर शूरसेनाचे डोळे पाहून ती म्हणाली--" इतरांना तर तुम्हीं अजून तोंडी जमाखर्चांतच गुंतवून ठेवलंयत् भावोजी ! पण भामा वहिनीला ही कट्यार प्रदान करून मात्र तुम्हीं हें सिद्ध केलंत कीं तुम्हांला या वहिनीच्या चुंबनांची कदर आहे."

" भामा वहिनी ! मी यांत कांहीं विशेष केलं नाहीं. हे निळे केंस व विशाल नेत्र यांचा हा सगळा प्रभाव आहे. सर्वांच्या अगोदर तेच उसळून येतात स्मृतीपुढं."

" तुम्हीं उशीरा आलांत भावोजी, नाहीं तर मनोरथांच्या ऐवजीं या केंसांनीं तुम्हांलाच बांधलं असतं. "

" नाहीं वहिनी, मी उशीरा येवो कीं लौकर येवो, या केंसांत मी गुरफटलों आहेच. "

" मला न कळतच ! "

" पतंग दिव्याला कळायची वाट थोडीच पाहातो ? "

" तिथं एक भला मोठा पतंग जळतोय व त्याच्या कलेवराचा जळका वास सुटलेला ठाऊक असून देखील ? "

वहिनी ! पतंगाला नाक डोळे नसतात, फक्त हृदय असतं. "

भामानें शूरसेनाचें मुखचुंबन घेतलें. तिचे हंसरे डोळे व गालावरची लाली हेंच दर्शवीत होती कीं शूरसेन तिचा जोडीदार होऊं शकला असता.

संध्याकाळीं आम्ही अजितच्या घरी ज्ञातृ-कुलांतील तरुण-तरुणींच्या सम्मेलनांत सामील झालों. तिथेंहि नृत्यसंगीत व हास्यविनोद यांचा सुकाळ होता. इथली एक गोष्ट विशेष लक्षांत राहिली. बोलतां बोलतां कोणा एकानें निर्ग्रंथ ज्ञातृ-पुत्राचा [ जैन मत प्रवर्तकाचा ] महिमा वर्णन केला. मी विचारलें– " निर्ग्रंथ ज्ञातृपुत्र म्हणजे कोण ? "

अजित—" आमच्याच ज्ञातृकुलांतून निघून श्रमण ( साधू ) झाले आहेत."

मी म्हणालों—" आमच्याच ज्ञातृकुलांतले ? –मला नाहीं ठाऊक."

अजित—" सिद्धार्थाचे अनुयायी होते. आज काल वज्जीच्या बाहेरहि चोहोंकडे त्यांच्या तप-तेजाचा महिमा गात आहे. "

मी म्हणालों—" अजित, तुम्ही त्यांना पाहिलं आहे ? "

अजित—" हो, कित्येक वेळां. आतां मागच्या वर्षीं तर चातुर्मासांत ते इथं महावनांत राहिले होते. "

मी—" फार तेजस्वी आहेत ? "

अजित—" तेजस्वी ओजस्वी यांतलं मला कांहीं ठाऊक नाहीं. पण मी हें मात्र पाहिलं आहे कीं उन्हाळा, पावसाळा, हिंवाळा या तिन्ही ऋतूंत ते नग्नच राहतात."

रोहिणी–" नग्न ? बायकांच्या समोर देखील ? "

अजित–" होय वहिनी ! ' निर्ग्रंथ ' या शब्दाचा अर्थच ' नग्न ' असा आहे. मी तर फक्त दोनच वेळां नाइलाजानं गेलों होतों. परंतु ती नग्नता पाहून मी तर लज्जेनं चूर झालों. "

रोहिणी--" खरंच आहे भावोजी! कोणीहि पुरुष झाला तरी इतका कसा बेशरम होईल?"

अजित--"अन् यालाच आमच्यांतले कित्येक मूर्ख लोक तप-तेज म्हणतात."

रोहिणी--" नग्नतेशिवाय आणखी कांहीं आहे त्यांच्यांत?"

अजित--" मला ठाऊक नाहीं. अन् माहिती करून घ्यायची इच्छा पण नाहीं. मी त्याची नग्नता पाहूनच अर्धा खलास झालोंय. बंधु सुभद्र! तूंच सांग! तुम्ही तर निगठाचे [ जैन साधूंचे ] मोठे शिष्य आहांत ना? मग सांगा ना वहिनींना."

सुभद्र--" अजित, धर्मश्रद्धा तर तुझ्या वाऱ्याला सुद्धां कधीं उभी राहिलेली नाही. बस, श्रमणांची निंदा करणंच तुला आवडत."

अजित--" भाई सुभद्र! श्रमणांची गोष्ट नको सांगूं! पण आपले ते निगण्ठ वर्धमान, का महावीर, का काय म्हणतात त्याना, त्यांच्याबद्दल वहिनीला सांग. मी अगदीं खात्रीनं सांगतो कीं वहिनी कांही कच्च्या बुद्धीची नाहीं."

सुभद्र--" म्हणजे तुझ्या मतानं निगण्ठांचे श्रावक [ शिष्य ] काय कच्च्या बुद्धीचे असतात?"

अजित--" हो, अन् लज्जाशून्यहि."

सुभद्र--" तुम्हींहि थंडी-उन्हाळ्यांत त्यांच्यासारखे नग्न राहूं शकतां का?"

अजित--" माझ्या पुष्कळशा गाई, घोडे, डुकरं नग्नच असतात."

सुभद्राचा चेहरा रागानें लाल झाला. अजितनें हंसत हंसत सुभद्राच्या खांद्यावर हात ठेवून म्हटलें--" भाई सुभद्र! तूं मला नास्तिक म्हणतोसच, त्यांत आतां तुझ्या व्याख्यानानं श्रमण महावीराविषयीं त्यांचा ज्ञातृ-पुत्र असूनहि माझ्या मनांत श्रद्धां उत्पन्न होऊं शकत नाहीं. तरीहि मी तुझ्या श्रद्धेवर प्रहार करणं योग्य नाही हें मला मान्य आहे. याकरतां मी तुझी क्षमा मागतों. तूं वहिनीची जिज्ञासा पूर्ण कर."

भामा हार्षित होऊन अजितचें बोलणें ऐकत होती हें मी पाहात होतों. आणि सुभद्र जेव्हां गांधारीला निगण्ठ पुराण सांगू लागला; तेव्हां भामा अजितचा हात दाबून त्याला कानांत म्हणाली--" शाबास माझ्या वीरा! या नागडेबांचा तूं खरपूस समाचार घेतलास." अजित आतां पर्यंत भामेला भीत होता. त्याला या तिच्या परिवर्तनानें आनंद झाला व त्यानें कृतज्ञता प्रगट केली.

सुभद्र म्हणाला--" गांधारी! नग्नता हें निगण्ठांच्या [ जैनांच्या ] तपाचं एक अंग आहे. शारीरिक तपस्या ही सर्वात मोठी तपस्या आहे. पापा पासून मुक्त होण्याचा हाच एक महान उपाय आहे. शरीर सुकवणं, त्याला कष्ट देणं, याच्या

योगानं आमचीं जुनीं पापं दूर होतात. जन्मजन्मांतराचं पाप दूर केल्याशिवाय आपण अनंत सुखाचे अधिकारी होऊं शकत नाहीं. म्हणून निगण्ठ ज्ञातृपुत्र श्रमण महावीर तीर्थंकर म्हणतात—" श्रावकहो ! [ शिष्यानों ! ] आपलीं जन्मजन्मांतरींचीं पापं नष्ट करण्याकरतां शरीराला कष्ट द्या, उष्णता-थंडी सहन करा, अनशन [ निराहार-व्रत ] पाळा."

रोहिणी--" अनशन ? "

सुभद्र--" हो, अनशन. भगवान महावीराचे कितीतरी श्रावक व श्राविका चाळीस-चाळीस, पन्नास-पन्नास दिवस अनशन पाळतात. कित्येकांनीं आमरण अनशन पाळून आपलं जीवन समाप्त केलं. व अशा तऱ्हेनं आपलीं जुनीं नवी पापं नष्ट केली. हा मार्ग दुर्गम व कष्टसाध्य आहे. पण सुखासुखी सुख मिळत नाहीं. सुख मिळवण्या करतां प्रथम दुःखाचा डोंगर चढावा लागतो. आपल्या सर्व दुःखाचं कारण पापच आहे; तें दूर करण्याकरतां कायादंडच भोगला पाहिजे. त्याच्यापासून संरक्षण म्हणून क्षुद्रातिक्षुद्र प्राण्यांची हिंसा टाळून पूर्ण अहिंसा व्रत पाळलं पाहिजे."

रोहिणी—" क्षुद्रातिक्षुद्र प्राण्यांची हिंसा म्हणजे काय ? "

सुभद्र--" भगवान महावीर सर्वज्ञ आणि सर्वदर्शी आहेत. त्यांच्या ज्ञानापुढं जगाच्या वर्तमान भूत भविष्यातील कोणत्याहि गोष्टी लपायच्या नाहीत. उठतां-बसतां जागृतींत वा झोपेंत सदा सर्वकाळ त्यांना सर्व कांहीं कळत असतं. आम्हांला ज्या गोष्टी कळत नाहीत त्या सुद्धां सर्व गोष्टी सर्वज्ञ सर्वदर्शी भगवान महावीरांना कळतात. ते आपल्या श्रावकांना नेहमीं सांगत असतात की सर्व तऱ्हेच्या प्राण्यांच्या हिंसेपासून तुम्हीं दूर रहा. आणि शिवाय असंहि सांगतात कीं स्थूल, सूक्ष्म मुंगीपासून हत्तीपर्यंत इतकंच नव्हे तर जल, आग, पृथ्वी, हवा या सर्व ठिकाणीं क्षुद्रातिक्षुद्र प्राणी आहेत. इतकंच नव्हे तर पाणी हा एकेंद्रिय जीव आहे, पृथ्वी स्वतः एकेंद्रिय जीव आहे. अशा प्रकारं जीवनाच्या प्रत्येक क्षणाक्षणाला किती जीव-हिंसा होत असेल रोहिणी ! "

रोहिणी—" मोजून काय पण मनन करूनहि तें कळणार नाहीं. "

सुभद्र--" म्हणून भगवान महावीर म्हणतात कीं प्रत्येक श्वासा गणिक आपण अगणित पापं करतो ! "

रोहिणी—" म्हणजे जीवनांत पापाशिवाय कांहीं नाहींच कीं काय ? "

सुभद्र—" म्हणून तर भगवान महावीर म्हणतात या पापी जीवनाचा पापक्षालनाकडे उपयोग करावा. "

रोहिणी--" म्हणून निगण्ठ ज्ञातृपुत्र असा उपदेश देतात कीं सर्व तऱ्हेची जीव-हिंसा सोडून द्यावी. "

सुभद्र--" होय. काया, वाचा, मनानं कुठल्याहि जीवाला मारणं तर दूरच राहो; पण थोडेसे कष्टहि देऊं नयेत."

रोहिणी--" खुनी मारेकरी शत्रूलाहि?"

सुभद्र--" त्याचं पाप त्याला शिक्षा देईल. धार्मिक निगण्ठ श्रावक यांनीं शिक्षा देऊन पाप वाढवण्याची जरूर नाहीं."

रोहिणी--" जर एखादा आततायी मनुष्य दुःखी अनाथ स्त्री किंवा मूल यांना मारायला वा बेअब्रू करायला तयार झाला तर त्यावेळीं आपल्या श्रावक पुरुषाला निगण्ठ ज्ञातृपुत्र काय करायची आज्ञा देतात?"

सुभद्र--" मनावर संयम, वचनावर संयम, शरीरावर संयम."

रोहिणी--" म्हणजेच अकर्मण्यता, आततायीच्या हातीं आपली अब्रू, लज्जा, आपलं पौरुष सर्व कांहीं अर्पण. अन् आपल्याला हें पटतं कां?"

सुभद्र-- " होय, पटतं तर खरंच. पण निगण्ठी धर्माचं पालन पुरेतपणीं करणं हें सर्वांनाच साधण्याजोगं नाहीं."

भामा-- " होय, तेंहि खरंच. जो स्वतःला मनुष्य म्हणवतो त्याला तरी हें अगदींच अशक्य आहे."

भामेचे शब्द ऐकतांच सुभद्रानें आपल्या वाणीवर संयम केला.

अशा तऱ्हेने इष्ट-मित्रांच्या, जाति-बांधवांच्या प्रीति-मीलनांत व हास्यविनोदांत दिवस जात होते. शेवटीं अभिषेकाचा दिवस आला. वैशालीच्या अभिषेक-पुष्करिणींत स्नान-अभिषेक ही मोठ्या सन्मानाची गोष्ट आहे. गण-संस्थेने ज्याला सभासद निवडलें, त्यालाच या पुष्करिणींत स्नान करण्याचा अधिकार मिळतो. बाहेरचे लोक मात्र याच अभिषेकाचा उलटा अर्थ करतात; ज्याला अभिषेक झाला तो राजा झाला, व अशा प्रकारचे वैशालींत ९९९ राजे आहेत असें म्हणतात. अभिषेक-पुष्करिणी आमच्या लिच्छवि पूर्वजांची अति प्राचीन पुष्करिणी आहे. अगदी प्रथम वैशाली नगरी जेव्हां वसविण्यांत आली, तेव्हां जंगलाच्या जागेंत ही पुष्करिणी तयार करण्यांत आली. पण जुनी वस्ती विशाल बनून ती वैशालीच्या रूपांत परिणत झाली, तरी ही पुष्करिणी मात्र जशीच्या तशीच राहिली. जेव्हां लिच्छवि परिवार फार लहान होता, तेव्हां वयस्क झालेला प्रत्येक लिच्छवि हा गण-संस्थेचा सभासद होत असे. आणि त्याची निवड करण्यासाठीं व त्याला आपल्या पूर्वजांची एकमात्र अक्षुण्ण अशी निशाणी दाखवण्यासाठीं, पूर्वजांच्या स्पर्शानें पुनीत झालेल्या या मंगल पुष्करिणींत अभिषेक केला जाई. लिच्छवींचीं मूळचीं नऊ कुळें वाढतां वाढतां इतकीं वाढलीं कीं प्रत्येक परिवारांतील एक एक सदस्य घेऊनहि सदस्यांची संख्या फारच वाढली. तेव्हां ९९९ ही संख्या निश्चित करण्यांत आली. आणि आतां लिच्छवींमध्यें

सुद्धां एकाच वेळीं फक्त ९९९ माणसें या पुष्करिणीचा अभिषेक पावलेलीं असतात. लिच्छवींच्या या पुष्करिणीवर सतत नंग्या तरवारींचा पाहारा ठेवलेला असतो ही गोष्ट सर्वत्र महशूरच आहे. तिच्यावर तांब्याची जाळी घातलेली आहे. त्यामुळें पक्षी देखील तिच्यांतलें एक चोंचभरहि पाणी पिऊं शकत नाहींत. अर्थात् या सर्व दंतकथाच आहेत. चोरून लपून तिच्यांत नुसतें स्नान केल्यानें कुणीहि गण-संस्थेचा सभासद मानला जाणार नाहीं एवढें मात्र खरें. तसेंच अभिषेक-पुष्करिणीचा व तिच्या द्वारा लिच्छवि पूर्वजांचा गौरव राखला जावा म्हणून त्यांत सर्रास स्नानास बंदी आहे. आणि गण-सदस्याला सुद्धां आयुष्यांत फक्त एकदांच तींत स्नान करायला मिळतें. पुष्करिणी लहान असूनहि अगदीं स्वच्छ व फार सुंदर आहे. तिच्या चारी बाजूंनीं घाट बांधलेले आहेत. पाण्यांत नाना रंगाचीं कमळें आहेत. पावसाळ्यांत तिचें पाणी बदलण्यांत येतें. संध्याकाळीं पुष्करिणींतील माशांची क्रीडा व कमलवनाचें सौंदर्य पहाण्यासाठीं पुष्कळसे स्त्री-पुरुष तिच्या कांठीं जमतात. अभिषेकाच्या वेळीं तिच्या सभोंवतीं पानांफुलांची तोरणें बांधून तिला सुंदर शृंगारतात व घाटहि स्वच्छ केले जातात.

अभिषेकाच्या दिवशीं सगळी वैशाली नगरी शृंगारण्यांत आली होती. तो दिवस गणनक्षत्र [ महोत्सव ] म्हणून जाहीर केला होता. आंगरखा घालून उपरणें पांघरून मी सर्वांच्या पुढें चालूं लागलों. माझ्या पुढें वाद्यें होतीं. माझ्या मागून गण-सदस्य, व त्यांच्या मागून शहरांतील स्त्री-पुरुष मिरवणुकीनें चालले होते. पुष्करिणीच्या खास घाटापासून मोठ्या अंतरावर सर्व लोकांना थांबविण्यांत आलें. याच्यापुढें फक्त गण-सदस्यांनाच जाण्याची परवानगी होती. पुष्करिणीच्या चोहों बाजूंनीं खड्गधारी सैनिकांच्या रांगा होत्या, मी अगदीं पाण्याजवळच्या पायरीशीं जाऊन पोंचलों. तेव्हां गण-पति माझ्या समोर येऊन उभे राहिले. त्यांनीं माझ्या कडून लिच्छवि प्रतिज्ञा म्हणवली. तींत मुख्यतः दोन गोष्टी होत्या—

" मी लिच्छवि गणासाठीं जगेन व लिच्छवि गणासाठीं मरेन. "

" गण-सन्निपात [ पार्लमेंटची बैठक ] जो निर्णय देईल तो मी कोणत्याहि परिस्थितींत मान्य करीन. "

" मीं प्राचीन कालापासून चालत आलेल्या सात लिच्छवि मर्यादांचें पालन करीन. "

यानंतर वाद्यें वाजूं लागलीं. आणि मी पुष्करिणींत उतरलों. तें पाणी वज्जी, गांधार किंवा इतर जनपदांतल्या पुष्करिणींतून असतें तसलेंच होतें. याच्यापेक्षां सुंदर घाट असलेल्या पुष्करिणी इतर राजधानींतून आहेत. याहूनहि सुंदर कमलवनें पुष्कळ आहेत. परंतु त्या पुष्करिणीच्या पाण्याचा माझ्या अंगाला स्पर्श झाला त्या

वेळीं मात्र तें मामुली पाणी वाटलें नाहीं व ती पुष्करिणीहि मामुली अशी वाटली नाहीं. अगदीं पहिल्या प्रथमच्या लिच्छवीपासून सर्व लिच्छवि पूर्वज माझ्या भोंवतीं उभे राहून मला स्पर्श करीत आहेत असें मला वाटलें. व त्या स्पर्शानें माझ्या अंगांत नवीन शक्ति व स्फूर्ति आली आहे असें वाटलें. शेंकडों वर्षांचा अंधःकार भेदून त्यांचे उद्गार माझ्या कानांत घुमत होते- " आम्हीहि हीच लिच्छवि प्रतिज्ञा केली होती व ती आम्हीं पूर्णपणें पाळली याचा आम्हांला अभिमान आहे. आम्हीं लिच्छवि खड्गाची धार कधीं बोंथट होऊं दिली नाहीं. व लिच्छवि ध्वजा कधी खालीं पडूं दिली नाहीं. पुत्रा ! आपण लिच्छवि पुत्र आहोंत हें सिद्ध करायला तूं तयार आहेस का ?" मीहि मनांतल्या मनांत उत्तर दिलें—" हो हो, माझ्या अंगातलें लिच्छवि रक्त हीच याची पुरेशी हमी आहे. पूज्य पूर्वजांनो ! माझ्या कल्पनेनें आज लिच्छवि-ध्वजेवर फार मोठें संकट आलें आहे. पण मी लिच्छवि-कर्तव्य जरूर पार पाडीन. फक्त मला आपला आशीर्वाद व प्रोत्साहन मात्र हवें."

या पुष्करिणींत आयुष्यांत फक्त एकदांच स्नान करतां येतें, व लौकर बाहेर निघण्याचा नियमहि नाहीं; मग माघांतलें थंडगार पाणी असल्यावर मी त्या अभि-षेकाचा आनंद घ्यायचा सोडणार थोडाच ! पुष्करिणीच्या कांठावर यावेळीं वाद्यें वाजत होतीं. कित्येक ठिकाणीं पुष्कळसे लोक नृत्य करीत होते. भामा व रोहिणी उभ्या राहून माझ्याकडे पाहात होत्या. त्यांच्या चेहऱ्यांवर प्रसन्नता दिसत होती.

मी पुष्करिणींतून बाहेर येऊन नवें उत्तरीय व नवें अंतरवासक घातलें. पुढें केंस दिसतील असा साफा बांधला. धनुष्य, तूणीर, खड्ग, जागच्या जागीं लावलें. तऱ्हे-तऱ्हेचे हार माझ्या गळयांत घातले. नंतर मी वर आलों. माझा घोडा तयार होताच. मी त्यावर स्वार झालों. इतर सभासदांपैकीं कोणी रथांतून, कोणी घोड्या-वर, असे आम्हीं संस्थागारांत पोंचलों. आज संस्थागारांत जरा विशेष तयारी दिसली. त्याच्या चारी बाजूंना तोरणें लावून शोभा आणलेली होती. सभास्थानीं सुंदर नवी बैठक घातलेली होती.

सर्व सभासद बसल्यानंतर गण-पतींनीं मी आजपासून गणाचा सदस्य झाल्याचें जाहीर केलें. नंतर माझ्या योग्यतेची प्रशंसा करून त्यांनीं मला दक्षिण-वाहिनीचा [ दक्षिणेकडील सैन्याचा ] सेना-नायक करण्याची सूचना केली. नंतर ते म्हणाले-- " सेना-नायक रोहण सैन्याच्या संघटनेकरतां वैशालींत राहतील. वयाच्या अठ्ठाविसाव्या वर्षी लिच्छवि सेना-नायक होणं, अन् त्यांत चारांपैकीं सर्वांत बलाढ्य अशा दक्षिण-वाहिनीचा सेना-नायक होणं, हें आज प्रथमच होत आहे."

मीं गण-पतींची आज्ञा घेऊन उभा राहून म्हणालों-- " भन्ते गण ! आप-णांला पुत्रवत असलेल्या माझा जो आज आपण सन्मान केलांत त्याला स्वतः मी

योग्य आहे असं वाटत नाहीं. पण मला एवढं मात्र कळतं कीं दक्षिणेच्या शत्रूला वज्जीची पवित्र भूमी अपवित्र करण्याची संधी कधींहि देतां कामा नये. ”

भाषणानंतर संस्थागारांतच गण-भोज [ गणांतील सदस्यांचें भोजन ] झाला. त्यांत फक्त शिकारीनें मिळविलेली वन्य डुकरें, मृग व गवे [ नील गाय ] यांचें निर्धूम प्रज्वलित विस्तवावर भाजलेलें मांस व मेरय ( कच्ची दारू ) होती. पहिले लिच्छवि पूर्वज अशाच तऱ्हेचें जेवण करीत असत. म्हणून आजहि गणाच्या भोजनांतली ही जुनी परंपरा कायम ठेवण्यांत आली.

अभिषेकाची प्रसन्नता तर होतीच; शिवाय सेनानायक पद मिळाल्यामुळें आमच्या घरांत आनंदाचा महापूर आला. रोहण काका आज संध्याकाळीं घरीं आले होते. त्यांना ही गोष्ट माहीत असल्यानें आश्चर्य वाटण्याचे कारण नव्हतेंच. त्यांत त्यांनीं नवीन बातमी सांगितली ती अशीः—

“ वज्जी व मगध यांच्या सीमेवर दुर्घटना पुष्कळच होऊं लागल्या आहेत. रात्रीं गंगेच्या अलीकडे आलेले कित्येक मागधी गुप्तहेर आम्हीं पकडले. मगधराज आमच्या विरोधाची मुळींच पर्वा करीत नाहीं. त्यामुळं युद्ध टळत नाहीं असं दिसतं. तीन दिवसा नंतर युद्ध परिषदेची बैठक होणार आहे; त्यासाठीं मी आलों आहे. ”

## ( १५ )

# कर्मान्त

सावत्र बाप मेल्यानंतर घरांतील व्यवहारा संबंधीं कांहीं तरी व्यवस्था करणें जरूर होतें. मी आईला सांगितलें कीं त्याची संपत्ति सोमाची आहे आणि ती तिला मिळाली पाहिजे. माझ्या वडिलार्जित घराची दुरुस्ती झाली होती व रोहिणीच्या म्हणण्याप्रमाणें त्यांत खिडक्या दारें इत्यादि बाबतीत बदल केला होता. एका आठवड्याच्या आंत मला उल्काचेल [ हाजीपूर ] ला जायचें होतें. म्हणून आपल्या घरीं एक रात्र तरी वस्ती करून जावें असें रोहिणीचें म्हणणें होतें. आम्हांला आमचे कर्मान्त [ शेतें ] देखील बघायचे होते. सगळीकडे आतां गहूं, सातु, यांचें हिरवें पिक उभें आहे असें आम्हांला कळलें. शेतांतील कामकरी फार चांगले आहेत. आमची जमीन चांगली सुपीक आहे व गाई बैलहि चांगले धष्टपुष्ट आहेत. तेथें वाघाचा त्रास

फार आहे अशी तक्रार होती. पण त्या बाबतींत इतक्या थोड्या वेळांत कांहीं करणें शक्य नव्हतें. गोठ्याच्या सभोंवतालचें लाकडी कुंपण आणखी उंच करावें व छताखालचे लाकडी वासे आणखी बळकट व दाट करावें असें मी तात्पुरती सोय म्हणून सांगितलें. आंबराई पाहून रोहिणीला फार आनंद झाला. पण आंब्याला अजून फळ धरलें नव्हतें. बोरें व पेरू यांना मात्र भरपूर भार आला होता. पण पिकायला अजून बराच अवकाश होता. रोहिणी म्हणाली--

" आपल्याला इथं द्राक्षं लावतां येणार नाहींत का ? "

" इथले लोक म्हणतात की ही जमीन द्राक्षांना चांगली नाहीं. "

" पण आपल्याला प्रयोग करून पहायला काय हरकत आहे ? "

" तर मग आपल्या कृष्णा माळ्याला विचारून पहा. "

म्हातारा कृष्णा आल्यावर मी त्याला म्हणालों —

" माळीबाबा ! आतां तूं खूपच म्हातारा झालास. "

" मालक ! मी आपल्या तीन पिढ्या पाहिल्या आहेत. मग काय अजूनहि तरणाच राहीन ? आपले आजोबा लक्ष्मणजी यांनी त्या दुष्ट मागध बनियाकडून विकत घेऊन मला नवा जन्म दिला होता. "

" होय बाबा ! तूं जास्तच सुकत चाललेला दिसतोस. आपल्याकडे डुकरं कांहीं थोडी नाहींत. या थंडींत आठवड्यांतून दोन दिवस डुकराचं मांस खाणं चांगलं. तूं खा, व आम्हांलाहि पाठव. "

" मालक ! आतां तुम्ही मोठे जवान गडी झालांत. तुम्ही लहान असतांना या कण्हाच्या [ कृष्णाच्या ] दाढीशी खेळत होतां. या गरीब कण्हावेर लहानपणीं जसं तुमचं प्रेम होतं तसंच आतांहि आहे. "

मी—" अन् आपल्या नव्या मालकिणीला पाहिलंस का ? "

कृष्णा—" ऐकलंय भन्ते ! पण पहाण्याचा सुयोग अजून आला नाहीं "

मी—" ती पहा, बोरीच्या सांवलींतून येत आहे. " कपिल बरोबर रोहिणी आल्यावर मी म्हणालों—

" रोहिणी, हा कण्ह बाबा, आमचा तीन पिढ्यांचा मालक आहे— "

" होय बाईसाहेब ! यांच्या आजोबांनीं वाण्याला पैसे भरून माझा उद्धार केला होता. अन् मालक ! तुम्ही जन्मायच्या अगोदर तुमची आई मल्लिका जशी होती तशाच या मालकीणबाई आहेत असं दिसतंय ! मालकीण, या म्हाताऱ्या कण्हावर दया लोभ असूं द्या; हा तुमचा तीन पिढ्यांचा दास आहे. "

रोहिणी--" अन् कृष्णा बाबा ! तुझी मुलं बाळं कुठं आहेत ? "

कृष्णा—" म्हातारी तर मरून गेली. दहा वर्षं झालीं; ती गेल्यापासून मनाला फार उदास वाटतं. मालकांचे पैसे ती पुरते फेडून मेली. ती तरुण असतांनाच या मालकांच्या आजोबांनीं तिला पन्नास कार्षापण देऊन विकत घेतलं होतं. ते म्हणाले —कृष्णा, ही बघ तुला बायको आणली. अन् मालकीण, ती माझ्या सारखी काळी नसून फार सुंदर होती. अंतर्बाह्य स्वच्छ होती. ती मल्लिका मालकिणीच्या सेवेंत पंचवीस वर्षं राहिली—"

रोहिणी—" अन् मुलंबाळं कुठं आहेत ? "

कृष्णा—" एक गांव वसवण्या इतकी आहेत कीं; नातवंडं पंतवंडं सुद्धां आहेत. मालकांनीं त्यांना विकलं असतं तर कित्येक घोडे विकत घ्यायला पुरेसा पैसा मिळाला असता. "

रोहिणी—" पण बाबा, त्यामुळं तुला किती दुःख झालं असतं ? "

कृष्णा—"आम्हां गुलामांचं दुःख तें किती वेळाचं असणार. त्या राक्षस वाण्याची तर गोष्टच विचारूं नका. पाठीवर अजून हे पांच डाग शाबूत आहेत. " काळ्या उघड्या पाठीवरील स्पष्ट दिसणाऱ्या खुणा दाखवून कृष्णा म्हणाला—" लोखंड लाल तापवून डाग दिले होते. "

रोहिणी कळवळून म्हणाली—" बाबा, भारीच निर्दय होता म्हणायचा तो वाणी. किती का मोठा अपराध असेना, एका माणसानं दुसऱ्या माणसाशीं अशी वर्तणूक करायची ! छीः ! "

कृष्णा—" बाईसाहेब, तिथं गुलामांवर कोण दया करणार ? वत्स [ खालची अंतर्वेदी ] देशच्या कौशाबीमध्यें माझा जन्म झाला, आईच्या बरोबर काशीमध्यें विकला गेलों. वयांत आल्यावर मगधाच्या या वाण्यानं मला विकत घेतलं, हाण-मार तर सगळीकडे सहन करावी लागतेच, पण हा वाणी शुद्ध राक्षस होता. "

रोहिणी—" तापलेल्या लोखंडानं डागण्या इतका अपराध तरी काय झाला तुझ्याकडून बाबा ? "

कृष्णा—" सहा महिन्याची जुनी झालेली खापराची घागर होती ती ! सहा महिन्यांनीं चांगली घागरहि कमजोर होते; त्यांतून हा वाणी मोठा कंजूष होता; यानं स्वस्तांत स्वस्त घागर विकत घेतलेली होती ही. घरांत तर आणखी कोणी नव्हतं, पण तो पैसा पैसा जमवीत होता, कोणाकरतां कोण जाणे. मगध-राजा करतां का आणखी कुणा करतां कुणास ठाऊक. एक दिवस मी पाणी आण-ण्यास गेलों होतों. घागरीचं तोंड फांसांत तसंच राहिलं व खालचा भाग विहिरींत बुडाला. बस्, एवढाच अपराध."

रोहिणी--" अन् याकरतां तुझ्या पाठीवर लोखंडाचे डाग दिले ! "

कृष्णा-- " होय बाईसाहेब, मी तडफडत होतों, पण या सैतानानं मला बांधून ठेवलं होतं. डाग देऊनच तो थांबला नाहीं तर वरती आणखी शिव्यांची लाखोलीहि मोजली. त्याच वेळीं मालक दादा या बनियाजवळून काहीं वस्तु विकत घ्यायला आले होते. त्यांनीं वाण्याला विचारलं-- ' या दासाला विकतां का ? ' वाणी म्हणाला-- ' हो, घेऊन जा. ' दादा म्हणाले-- ' किती पैसे घ्याल ? ' वाणी म्हणाला-- ' तीन विसाला मी त्याला घेतलं आहे. ' मालकिण, तो खोटं बोलत होता. त्यानं मला दोन विसाला घेतलं होतं. मी बोलणार होतों पण मी भ्यालों. वाटलं हा पुन्हां लोखंडाचे डाग द्यायचा ! होय बाईसाहेब ! राजांच्या राज्यांत दासांचा गुलामांचा जीव घेतला तरीहि कोणी विचारीत नाहीं. लिच्छवि गणाची गोष्टच वेगळी आहे. इथं तर आम्हांला आम्ही गुलाम असल्याची आठवण सुद्धा होत नाहीं. इथं लोखंडानं डाग द्यायची गोष्ट कधीं कोणी ऐकलेली पण नाही. ज्या दासानं एकदां वज्जी भूमींत पाय ठेवला, तो पुन्हां बाहेर विकला जात नाही. बाईसाहेब, इथं मुळीं दास नाहीतच. जर दास पहायचे असतील तर मगधमध्ये, काशीमध्ये पहा. तिथं कोणीहि दास म्हातारपणापर्यंत थोडाच जगतो ? "

रोहिणी-- " काय करतील बिचारे ! "

कृष्णा--" बाईसाहेब, तुमच्याकडचे दास कसे असतात ? "

रोहिणी-- " माळी बाबा ! आमच्या तिकडे दासच नसतात ! "

कृष्णा-- " दास नसतातच ! गुलामच नाहींत ! ! असतील तर ! अन् इथल्यापेक्षांहि चांगलं वागवत असतील त्यांना. "

रोहिणी-- " नाही बाबा, आमच्याकडे माणसांची खरेदी-विक्री होत नाहीं. कोणीहि दास आमच्या गंधार भूमींत पाय ठेवतांच अदास होतो. "

कृष्णा-- होय. बाईसाहेब, खरंच असेल तें. मला वाटलंच होतं कीं हें असलं अद्वितीय रूप मानुष-लोकांत कुठून सांपडायला. तर मग धाकटे मालक तेथपर्यंत गेले होते तर. मींहि विचार करीत होतों कीं इतकीं वर्षं झालीं धाकटे मालक परत कां येत नाहींत. "

रोहिणी--" माळी बाबा, कुठं गेले असतील ते ? "

कृष्णा--" जिथं दास अदास होतात त्या तुमच्याच देशांत. त्याच देशाला शोभेसं रूप आहे हें ! मला प्रथमच शंका आली होती. "

रोहिणी--" कसली शंका आली होती ? "

कृष्णा—" तेच, जिथं दास अदास होतात. आज मोठे मालक नाहींत म्हणून. नाहींतर ही अशी सून–" कृष्णाच्या डोळ्यांला पाणी आलें–" पण तुम्ही धाकट्या मालकांना सोडून आपल्या देशी तर नाहीं ना जाणार ? "

रोहिणी—" माळी बाबा, काय बोलतोस हें. माझे हेच पति आहेत. हीच वज्रीभूमि माझा देश आहे, मी हें सर्व सोडून कुठं जाणार ? "

कृष्णा—" बाईसाहेब, मी तुमच्या देशच्या गोष्टी ऐकल्या आहेत ! म्हणून मला फार भीति वाटते. पण आतां तुम्हीच सांगतां कीं मी यांना सोडून जाणार नाहीं, त्यावर माझा विश्वास आहे. पण खरंच नाहीं ना जाणार सोडून ? "

रोहिणी—" कृष्णाबाबा, पतीला सोडून कुठें जाणार ? "

कृष्णा—" बाईसाहेब, तें कांहीं विचारूं नका. तुमच्या तोंडून मला एवढंच पाहिजे कीं तुम्ही नेहमीं आमच्या धाकट्या मालकांच्या जवळ रहाल. "

रोहिणी—" हो, नेहमीं त्यांच्याच जवळ राहीन. "

आनंदित होऊन कृष्णा म्हणाला—" मला भीति वाटत होती ! "

रोहिणी—" भीति ? ती कसली बाबा ? "

कृष्णा—" जिथं दास अदास होतात त्या देशांतल्या तुम्हांसारख्या स्त्रियांची."

रोहिणी—" पण भीति कशा बद्दल ? "

कृष्णा—" त्यांचं प्रेम कायम नसतं म्हणून. "

रोहिणी—" छीः ! कृष्णाबाबा तुम्ही काय बोलतां हें ? माझ्या बोलण्यावर तुमचा विश्वास नाहीं का ? "

कृष्णा—" बाईसाहेब, आतां खात्री पटली. म्हाताऱ्या कृष्णावर रागावूं नका. त्याला किती दिवस जगायचं आहे ? मी माझ्या मालकांसाठीं तुमच्या जवळून वचन घेतलं बाईसाहेब ! "

रोहिणी—" कृष्णा, म्हणजे मी आपल्या पतिला सोडून निघून जाईन असं वाटलं का काय तुला ? "

कृष्णा–" नेम काय सांगावा ? त्या देशच्या तर अशाच गोष्टी ऐकल्या आहेत."

रोहिणीला म्हाताऱ्या कृष्णाची शंका नीट कळली नव्हती तिनें आणखी एकदां ती समजून घेण्याकरतां म्हटलें—"कृष्णा मी कुठून आल्यें अशी तुझी कल्पना आहे ? "

कृष्णा—" बाईसाहेब, मला सगळं ठाऊक आहे. जिथं दास अदास होतात असे देश काय पुष्कळ आहेत ? "

रोहिणी—" तर मग तो कोणचा देश ? "

कृष्णा—"बाईसाहेब, मला असा फसवतां का ! म्हातारा कृष्णा सगळं जाणतोय."

रोहिणी—" सांग तर खरं. "

कृष्णा—" तुम्ही पुष्कळ लपवायचा प्रयत्न कराल पण तुमचं रूप पाहतांच मला कळून चुकलं. पण आतां तुम्ही धाकट्या मालकांच्या सहवासांत कायम राहायचं वचन दिलं आहे. आतां कांही हरकत नाहीं."

रोहिणी—" पण सांग तर खरं तूं मला कोण समजतोस तें?"

कृष्णा—" आपली मालकिण, दुसरं काय? अन् तीहि फार चांगली, म्हाताऱ्या कण्हाला बाबा म्हणणारी."

रोहिणी—" अरे बाबा, मीं हें नाही विचारलं. तूं माझं माहेर कुठं आहे असं समजतोस?"

कृष्णा—" सांगायला कांहीं हरकत नाहीं. तुम्हीच तर सांगितलं आहे कीं, जिथं दास अदास होतात तेंच तुमचं माहेर म्हणून. अन् तो देश देवलोक सोडून दुसरा कुठला असणार?"

रोहिणी—" बाबा, तर मग तूं मला देवलोकाहून आलेली असं समजतोस?"

कृष्णा—" मला काय ठाऊक? तुम्हीच तर सागितलंत."

रोहिणी—" म्हणजे मी देवलोकची अप्सरा आहे तर?"

कृष्णा—" हां, बरोबर बोललांत बाईसाहेब!"

रोहिणी—" बरं जाऊं दे, पण आतां मी पळून जायची भीति तर वाटत नाहीं ना तुला?"

कृष्णा—" नाही; देवकन्या खोटं बोलत नाहीत. राहायचं नसतं तर वचन दिलं नसतं."

रोहिणी—" तूं आपल्या मुलांबाळांची हकिगत तर नाहींच सांगितलीस?"

कृष्णा—" एक विसा मुलं नातवंडं, अन् त्यांहून जास्तच मुली-नाती-सुना आहेत. बाईसाहेब, एक गांव वसेल गांव. अन् ते सर्वजण मालकांची शेतीवाडी करतात. मोठ्या मालकांनीं त्यांच्या वेळीं जेवढे तरूण होते तेवढ्यांना अदास केलं होतं. मलाहि अदास करणार होते. पण मीच म्हटलं–' मालक, या जन्मीं मला अदास नका करूं.' पुष्कळ हातापायां पडलों तेव्हां एकदां ते कबूल झाले."

रोहिणी—" मग आतां तुझ्या मुलां बाळात दास-दासी किती आहेत?"

कृष्णा—" दहा पांच पुरुष अन् पांच स्त्रिया. एका नातीला इथं पाहिलीच असाल. मोठ्या मालकिणीच्या सेवेंत असते ती. अन् ही राधा-बागेंत पाहिली असाल तिला, अठरा वर्षांची छोकरी आहे ती. ती माझ्या सारखी काळी नाहीं. तिची आजीहि काळी नव्हती. राधा फार हुषार आहे. नव्या मालकिणीच्या येण्याची बातमी ऐकली त्याच दिवशीं मी राधेला म्हणालों ' तूं त्यांची दासी हो बरं का!'"

रोहिणी—" काय माझी दासी?"

कृष्णा—"होय, बाईसाहेब! राधा मोठी हुषार पोर आहे मोठ्या मालकीणबाई जेव्हां इथं येतात तेव्हां राधाच त्यांची सेवा करते. मोठ्या मालकीण बाईनीं पण तिला सांगितलंय कीं 'राधा, तुला सूनबाईची दासी व्हावं लागेल.'"

रोहिणी—"दासी?"

कृष्णा—"बाईसाहेब, ती दासी तर आहेच! माझं सगळं कुटुंबच दास आहे. मोठ्या मालकांनी 'वेशी'ला दास्यांतून मुक्त केलं आहे. पण आम्ही तर स्वतःला मालकांच्या घरचे दासच म्हणवतों."

रोहिणी—"पण मोठ्या मालकांनीं तर तुम्हांला खरेदी-विक्रीच्या अपमानांतून मुक्त केलं आहे ना बाबा?"

कृष्णा—"होय, त्यांनीं मुक्त केलं आहे, व जगहि तसंच मानतं; पण बाई-साहेब! मी आपल्या मुलांना समजावीत असतों, व तेहि स्वतःला मालकांचे दास म्हणवून घेतात."

रोहिणी—"बाबा मग तुला असं वाटतं का कीं जरूर पडल्यास आम्ही तुझ्या मुलांना विकून टाकूं?"

कृष्णा—"बाईसाहेब! तुम्ही नाहीं विकणार अन् देव करो व अशी वेळ न येवो. पण आलीच तर माझा प्रत्येक मुलगा, नातू मालकांकरतां स्वतःला विकून घेईलच."

रोहिणी—"नाहीं बाबा, मी कोणालाही दास्यमुक्त केल्या शिवाय आपल्या जवळ ठेवून घेणार नाही. प्रिय सिंह! बरोबर आहे ना माझं?"

मी आतां पर्यंत गपचिप बसून हा सगळा संवाद ऐकत होतों व कृष्णाबाबा आपल्या अप्सरा मालकिणीला आपल्या अघळ-पघळ बोलण्यानें कसा घोटाळ्यांत पाडीत आहे हेहि पहात होतों. नंतर मी म्हणालों—

"प्रिये! अगदीं बरोबर. ज्यांना आमच्या जवळ काम करायचं असेल त्यांना कामगाराच्या नात्यानं पगार व भत्ता घेऊनच काम करावं लागेल."

कृष्णा—"मालक! काम तर करूं द्याल ना?"

मी—"कृष्णा, काम तर करूं देऊं! पण आम्हीं त्यांना विकणार नाहीं, व आपल्या कुलालाहि तो अधिकार ठेवणार नाहीं."

म्हाताऱ्यानें निःश्वास सोडून म्हटलें—"देवकन्या मालकीण! तुम्ही आपल्या देशासारखं इथंहि करूं चाहतां ना? आमच्या मालकांचे दास दासांसारखं काम करत नाहींत. ते इमानदार कामगारांसारखं काम करतात."

रोहिणी—"गुलाम व कामगार यांच्या कामांत फार फरक आहे का बाबा?"

कृष्णा—"बाईसाहेब, फार मोठा फरक आहे. कामगाराला चांगल्या कामाकरतां चांगला पगार व वाईट कामाकरतां कमी पगार मिळतो. चांगल्या प्रकारं काम न

करणाऱ्यास कोणी कामावर ठेवीत नाहीं. पण दास म्हणजे दारचा बैल ! त्याला हाण-मार होते, शिव्या गाळी होतात. पण दासानं जर नीट काम करायचं मनावरच घेतलं नाही तर नुसती मारहाण करून त्याच्या कडून काम घेतांच येत नाहीं. तो जर सारखा काम बिघडवतच राहिला तर मारणार किती वेळां ? जर ठार मारलं तर आपल्या मालमत्तेचं नुकसान होणार ! बाईसाहेब, काळजीनं बारकाईनं करावयाचं काम गुलामा कडून करवून घेत नाहींत. तो तर काम बिघडवून ठेवील. त्याला काय त्यांत लाभ मिळायचा आहे, तर तो उत्तम काम करील ? पण बाईसाहेब, ही गोष्ट तुमच्या दासांची नव्हे हं ! "

रोहिणी—" बाबा, आमच्याजवळ तर दासच नाहींत. आज आम्ही सर्वांना अदास करून जाऊं. म्हातार बाबा, तुम्हांलादेखील अदास करूं आम्ही. "

कृष्णा —" माझं राहूं द्या बाईसाहेब, मोठ्या मालकांनींहि मला वगळलं होतं. " डोळ्यांत आंसवें आणून सद्गदित स्वरानें तो म्हणाला—" मला अदास करूं नका. मला या घराचा दास म्हणूनच मरून जाऊं द्या. "

मी—" कृष्णा ! अदास होणं याचा अर्थ असा नाहीं कीं तुझ्या हातून घरांतलं काम आह्मी काढून घेऊं ! ज्या देशची तुझी मालकीण आहे तिथं दासच नाहीं हें तर तुला ठाऊक आहे ना ! "

कृष्णा—" होय मालक ! अन् बाईसाहेब कायमच्या तुमच्या होऊन राहतील हेंहि मला ठाऊक आहे, "

मी—" बाबा ! तिनं जर तुझी गोष्ट मान्य केली आहे तर मग तुलाहि तिचं म्हणणं कबूल करायलाच पाहिजे, नाहीं का ? तुझ्या मालकिणीला दासांच्या संगतींत राहायचा सराव नाहीं, म्हणून ती सागेल तसेंच कर. तूं पहिल्या सारखंच काम कर, तुला ती त्या बाबतीत कांहीं विचारणारच आहे आता. तूं जिवत असेपर्यंत आमच्या जवळच राह्यायचं बरं का बाबा ! पण तुझ्या मालकिणीला त्रास होईल असं कांहीं करू नको. आज दुपारीं तुझ्या कुटुंबांतलीं लहान मोठीं माणसं डोक्यावरून स्वच्छ स्नान करून या; तूंहि पण न्हाऊनमाखून ये हं. आतां तिच्याशीं कामाबद्दल बोल. "

कृष्णा—" मालक ! तर मग आम्ही मालकांच्या घरी प्रथम होतों तसंच राह्यायचं ना ? "

मी व रोहिणी—" होय होय ! तसेच विश्वासू नोकर म्हणून; दास म्हणून नव्हे."

" ठीक आहे. " असें म्हणून कृष्णानें मान खालीं केली..

रोहिणी म्हणाली—" प्रिया ! आपल्या कर्मान्ताच्या सर्वार्थकाला सांगा कीं आपल्या कर्मान्तावरील सर्व दासांनीं स्वच्छ न्हाऊनमाखून दोन प्रहरीं आमच्याकडे यावं." मी सर्वार्थकाला बोलावून गांधारी मालकिणीचा हुकूम सांगितला.

रोहिणी कृष्णाला म्हणाली—" बाबा ! तुमची बाग तर फारच छान दिसते आहे. "

कृष्णा—" होय बाईसाहेब ! वाण्याकडे यायच्या अगोदर बनारसला काशी राजाच्या बागेत काम करायला माझा मालक मला पाठवीत असे. "

रोहिणी—" दुसऱ्यांची कामं करायसाठीं ? "

कृष्णा—" दासाच्या कामाची मजुरी मालकालाच मिळत असते. "

रोहिणी—" तर मग तुला बागेच्या कामाची पहिल्यापासून माहिती होती ? "

कृष्णा—" आणखी कांहीं वर्षं राहिलों असतों तर खूप शिकलों असतों. इथं मी आपल्या बागेंत आंबे, जाभळं, पेरू, बोरं, आंवळे वगैरे वाराणसीच्या पद्धतीवरच लावलीं आहेत. बाईसाहेब, आपण बोरं पाहिलींत ना, ही बनारसी बोरं आहेत. एक बोर तोंडांत मावत नाहीं. फारच गोड. सफरचंदहि याच्या पुढं फिका पडेल. आणि पेरू तर बरोबर काशी सारखे खूप मोठे मोठे गोड व कमी बियाचे. आंब्याबद्दल कांही सांगायची जरूरच नाहीं. पिकले म्हणजे कळेल. "

रोहिणी—" तर मग बाबा, तूं आपल्या बागेंत फारच चांगलीं फळं लावलीं आहेस ? "

कृष्णा—" होय बाईसाहेब, मोठ्या मालकांना फळांचा फार नाद होता. ते मला नावेंतून बनारसला घेऊन गेले होते. तुम्हांला खोटं कशाला सागूं ? मी खूप खटपट केली व राजमाळ्याला लांच-लुचपतहि दिली. तेव्हां कुठं त्यानं मला चांगलीं निवडक रोपं दिलीं. दुसऱ्यांच्या बगिच्यांतून आपल्या बगिच्यांतल्यासारखीं फळं आलेलीं राजाला आवडत नाहींत. पण बाईसाहेब, आपल्या मोठ्या माळकांचं तसं नव्हतं. ते मला म्हणत कीं ' कृष्णा ! आपल्या बागेतलीं रोपं कोणी मागितलीं तर त्याला नाहीं म्हणूं नको बरं का.' "

रोहिणी—" बाबा, मग तूं त्याप्रमाणं दिलींस ना ? "

कृष्णा—" हो बाईसाहेब, दिलीं तर ! पण त्यांना तीं संभाळायचं ठाऊक नव्हतं. बाईसाहेब, झाडं सुद्धां सेवा मागतात सेवा ! अन् ती एखाद्या जातिवंत माळ्याकडूनच शिकावी लागते. "

रोहिणी—" तर मग तूं माळीविद्या आणखी कुणाकुणाला शिकवली नाहींस का ? "

कृष्णा—" हो, मी पुष्कळ शिकवायला तयार् होतों ! पण पांच सहा लोकांपेक्षां जास्त कोणी हुषार निघालेच नाहींत. त्यांतले तीन तर माझेच मुलगे-नातू आहेत. बाईसाहेब ! मी मेल्यानंतर तेच बगीचा संभाळतील. "

रोहिणी—" इथं नजरेला पडत नाहींत अशा फळांबद्दल मी तुला विचारणार होत्यें बाबा. "

कृष्णा—" अशीं कोणतीं फळं, बाईसाहेब ? "

रोहिणी—" द्राक्षं, अंजीर, अक्रोड, आडू, सफरचंद, संत्रीं. "

कृष्णा—" बाईसाहेब, यांपैकीं कित्येकांचीं नांवं देखील ऐकलेलीं नाहींत मी. अन् शिवाय प्रत्येक झाडाला विशिष्ट जमीन व विशिष्ट हवामानाची जरूरी असते. पण बीं असलं तर झाड कां नाहीं येणार ? कदाचित् फार तर हवं तितकं चांगलं नाहीं होणार. बाईसाहेब, मला वाटतं आपण लावून बघायला हवं. रोपं मिळालीं असतीं तर लावलीं असतीं. "

रोहिणी—" बाबा, रोपं तर इथवर येऊं शकत नाहींत. पण माझ्या जवळ बीं मात्र आहे. "

कृष्णा—" बाईसाहेब, द्या मला ! मी लावून पाहीन. पहिल्या प्रथम मी डाळिंबं व नासपती लावलीं तेव्हां लोक म्हणत हा कृष्णा वेडा आहे, तीं कांहीं लागणार नाहींत. पण बाईसाहेब, तीं त्या पूर्वेकडच्या बागेंत आहेत. पहा. त्यांना खूप फळं येतात. कांहीं लोक सांगतात तीं इतकीं गोड नाहींत. पण तीं गोड लागतात हें मी तर पाहतों आहे. "

रोहिणी—" जरा कमी गोड लागलीं तरी हरकत नाहीं. पण नवीन तऱ्हेचं फळ तर आपल्या देशांत उत्पन्न होऊं लागेल ! "

कृष्णा—" बाईसाहेब, बीं द्या तर खरं. चुना, मीठ, माती, यांचा कमी जास्त बदल करून पाहीन कशांत रोप चांगलं वाढतं ते. मोठे मालक गेल्यापासून कृष्णा अनाथ झालाय बाईसाहेब. "

रोहिणी—" अनाथ झालाय ? तो कसा ? "

कृष्णा—" अनाथ झाला म्हणजे त्याचा अर्थ असा कीं नवीं नवीं फळं, रोपं, फुलं, तयार करायचं काम माझ्याकडून घ्यायला कुणी राहिलं नाहीं. नव्या कामांत, नव्या प्रयोगांत कृष्णा अगदीं तल्लीन होऊन जातो. बाईसाहेब ! मग बीं कधीं पाठवाल ? "

रोहिणी—" परवां पाठवीन. पण आजकाल थंडी संपायचे दिवस आहेत, या [illegible]सांत लागेल का ? "

कृष्णा—" मी थोडं थोडं पेरून पाहीन. पण उन्हाळ्यानंतरच जास्त चांगलं रुजेल. "

रोहिणी—" अन् बाबा, द्राक्षांचे वेल असतात हं. "

कृष्णा—" वाढल्या नंतर मांडवाची व्यवस्था करूं. "

त्यांच्या गोष्टी संपत नाहींत असें पाहून मी म्हणालों—" रोहिणी, अजून आपलं दोन प्रहरचं जेवण व्हायचं आहे विसरलीस वाटतं. डुकराचं मांस गरमागरमच चांगलं लागतं, होय ना बाबा ? "

कृष्णा—" होय मालक, थंड झाल्यावर त्याची अर्धी चव नाहींशीं होते. त्यांतल्या त्यांत पाळवि पोराचं मांस तर कढतच चांगलं असतं. "

मी—" तर मग कृष्णा, आम्ही जेवायला जातों. तुझ्या घरचीं माणस न्हाऊन माखून येत आहेत, तूं हि न्हाऊन माखून ये. "

कृष्णा—" मालक, आम्हांला सोडून तर देणार नाहीं ना ? "

मी--" बाबा मग काय, तूं आपल्या देवकन्या सूनबाईला नाराज करणार ? "

कृष्णा—" नाहीं मालक ! मला त्यांचं म्हणणं मान्य आहे. मी आतां इतक्यांत स्नान करून येतों. "

आम्ही दोघं कर्मान्त-घरांत गेलों. जेवण तयार होतें. न्हाऊन काळेभोर ओले केंस पाठीवर सोडलेली अशी एक गव्हाळया रंगाची तरुणी आसनें वगैरे नीट मांडीत होती. रोहिणी तिला म्हणाली—

" मुली, तुझं नांव काय ? "

" राधा, बाईसाहेब. " असें म्हणून तिनें चटकन आपले केंस बांधले.

" राधा तुझं नांव का; तुला मांस तयार करतां येतं ? "

" मोठी मालकिण इथं आल्या म्हणजे मीच त्यांचा स्वयंपाक करीत असत्यें. आजचं शूकर मार्दव तयार करण्यांत माझा देखील हातभार आहेच. "

" बरं तर राधा, चटकन वाढ पाहूं. आम्ही दोघं फार भुकेलीं आहों. "

" बाईसाहेब, सर्व तयारच आहे. "

जेवण झाल्यावर आम्ही वैशालीहून आणलेल्या आपल्या कपड्यांचीं गांठोडी सोडलीं. एकंदर दास-दासींची व त्यांच्या मुलाबाळांची संख्या सर्वार्थकाकडून विचारून घेतल्यावर प्रत्येकाच्या नांवें दोन दोन कपडे काढले.

थोड्या वेळानें कृष्णा आपल्या परिवारासह येऊन पोंचला. त्या सर्वांना रोहिणीनें जवळ बोलावून म्हटलें— " आज तुम्हां सर्वांना अदास केलं आहे. यापुढं तुम्ही दास वा दासी राहिलां नाहींत. पाहिजे तर आमचेकडे काम करा किंवा दुसरी कडे करा. आमचेकडे काम केल्यास कामाप्रमाणं भत्ता [ भात ] वेतन मिळेल. आतां इकडे या. तुम्हांला अंगांत घालायला व वर घ्यायला असे दोन दोन कपडे देत्यें. आणि आज कर्मान्ताचे सर्व कामगार व मालक एका पंक्तीला जेवतील. खूप मोठा सांड व डुक्कर मारून मांस व सूप तयार करा. "

प्रथम कृष्णाला दोन कपडे दिले. त्याच्या डोळ्यांतून आंसवें टपटपत होतीं. नंतर इतर सर्वांना कपडे दिले. राधा लाजत-लाजत सर्वांच्या मागून आली. रोहिणींनें तिला कपडे देऊन म्हटलें—

" राधा, तूं आमच्या घरीं काम करशील का ? "

" बाईसाहेब, काम करायला मिळालं तर जरूर करीन. "

" तर मग तूं आजपासून आमच्याकडे काम कर. आमच्या बरोबर वैशालीला चल. "

राधा आनंदित होऊन म्हणाली-- " बाईसाहेब, माझी तयारी आहे ! "

## ( १६ )

# युद्ध--परिषद

तो दिवस शेतांतच काढून आम्ही युद्ध-परिषदे करतां वैशालीला परत आलों. शेतावरील सर्व माणसें देवकन्या मालकिणीला पाहून खूष झालीं होतीं. त्यांतल्या-त्यांत म्हातारा कृष्णा तर जास्तच. जर कोणी म्हटलें कीं मालकीण अप्सरा नाहीं, मानवी आहे, तर तो भांडायलाच उठे. तो म्हणे-" मी त्यांच्या तोंडून ऐकलं आहे कीं जिथं दास अदास होतात त्या देशच्या आहेत त्या. "

यावेळीं आम्ही आमच्या वडिलार्जित घरीं राहिलों. रोहण काकांनीं मगध राजाच्या लष्करी तयारी संबंधीं आणखीहि पुष्कळशा गोष्टी सांगितल्या व ते असेंहि म्हणाले कीं " बिंबिसार आपणहून लढायला तयारच झाला नसता; पण त्याचा पुत्र अजातशत्रु त्याला सारखा पढवीत आहे. अन् त्याच्या पायींच त्याला लढावं लागणार आहे. " काकांनीं असेंहि सांगितलें कीं " बिंबिसारचा महामंत्री ब्राह्मण वर्षकार फारच धूर्त आहे. आपल्या कडील खडान् खडा माहिती काढण्यासाठीं त्यानं सगळीकडे गुप्त हेर पेरून ठेवले आहेत. मगध राजाजवळ फारसं चांगलं सैन्य नाहीं व सेनापतीहि नाहीं; पण त्याला वर्षकार सारखा कूटनीतिज्ञ मिळाला आहे. अन् हाच आम्हांला सर्वांत मोठा धोका आहे. "

सेनापतींच्या अधिकरणांत [ कार्यालयांत ] युद्ध-परिषद झाली. तिला सेनापति सुमन, चार लिच्छवि सेनानायक, मी व आणखी तीन इतर सेनानायक हजर होतों. त्यांतील एकजण लष्करी गुप्त हेर विभागाचा अध्यक्ष होता. सेनापति सुमन यांनीं

परिषदेला आरंभ करतांना म्हटलें– " लिच्छवि सेना-नायकहो ! वज्जी भूमीच्या विरुद्ध मगध राजाची युद्धाची तयारी चालली आहे. तिची महिन्यापूर्वीची हकीकत आपल्याला मागच्या सभेंत सांगितलीच आहे. आतां हेर-विभागाकडून मगधाच्या लष्करी तंयारीची जी माहिती मिळाली आहे ती सभेपुढं ठेवण्यास मी आतां सेनानायक पुष्य यांना विनंती करतों. "

सेनानायक पुष्य हे दुहेरी हाडाचे उंचेपुरे पंचावन वर्षांचे सैनिक होते. त्यांच्या तोंडावर मांस मुळींच नसून डोक्याला टक्कल पडलेलें होतें. त्यांच्या तोंडाकडे पाहतांच त्यांच्या गंभीर स्वभावाची ओळख होई. जणूं स्वतःशींच बोलत आहों अशा धिम्या आवाजांत त्यांनीं बोलणें सुरूं केलें.

" बिंबिसार गेल्या पांच वर्षांपासून साऱ्या मगध व अंग देशाच्या वसुलाचा बराच मोठा भाग युद्धकोषांत जमा करीत आहे. गंगा, शोण व बागमती यांच्या किनाऱ्यांवरील जुने दुर्ग व त्या शिवाय नवे सोळा दुर्ग त्यानं तयार केले आहेत. त्या दुर्गांतून शाल वृक्षांच्या मोठमोठ्या तिहेरी खांबाचे बळकट तट उभारले आहेत. प्रत्येक दुर्गावर तीन ते सात हजार पर्यंत कसलेले योद्धे आहेत. त्यांत पायदळ, घोडदळ, रथी, हत्ती वगैरे सर्व प्रकार आहेत. बाहेरून धान्य न मिळाल्यास एक वर्ष पुरेल इतकं भरपूर धान्य या दुर्गांतून सांठवून ठेवलेलं आहे. या शिवाय आमचं पाहून राजा बिंबिसारनं आणखी एक दुसरीच सेना तयार केली आहे; ती म्हणजे नौ-सेना. तिन्हीं नद्यांच्या किनाऱ्यावरील दुर्गांलगत या नौ–सेनेचीं मजबूत दलं आहेत. प्रत्येक नावेंत आठ ते सोळा पर्यंत नाविक व वीस ते पन्नास पर्यंत धनु-शल्य-खड्गधारी सैनिक आहेत. त्यात पुन्हां हेंहि सांगून ठेवलं पाहिजे कीं बिंबिसारची या युद्धांतील जयाची सारी भिस्त या नौ-सेनेवरच आहे. भत्ता-पगार वगैरे करतां त्याच्याजवळ भरपूर संपत्ति आहे हेंहि खरंच. आमच्यापेक्षां त्याच्याजवळ सर्व तऱ्हेच्या हत्यारांचा सांठा जास्त आहे. आमच्याकडील युद्ध-तयारीची बातमीहि त्याला पुरेशी मिळते. या बाबतींत मगध देशाचे श्रमण ब्राम्हण त्याला पूर्ण मदत करीत आहेत. अंग देशांतल्या बंडखोरांना त्यानं पुरतेपणीं दडपून टाकलंय व तेथील प्रजा हें जाणून आहे कीं बिंबिसारच्या विरुद्ध खड्ग उचलणं म्हणजे मगधाविरुद्ध जाणं होयं. इकडे त्यानं कुटदंता सारख्या मोठमोठ्या ब्राम्हण महाशालांना मोठमोठ्या जहागिरी वा मान सन्मान देऊन आपल्या पक्षाला मिळवून घेतलं आहे. तर तिकडे भद्दिया [ अंग ] येथील मेंडक सेठ्ठी प्रमाणं अंग देशांतले व्यापारीहि त्याचं यशोगान गातात. अन् शिवाय बिंबिसारच्या तिखट तलवारीनं अंग व मगध या देशांना चोर लुटारूंच्या भयापासून मुक्त केलं आहे. या सर्व गोष्टींचा प्रभाव प्रजेवर पडणारच. त्याबरोबरच आपण स्वतः श्रमण गौतम [ बुद्ध ] यांचे अनुयायी

आहेंत असं बिंबिसारनं प्रसिद्ध केलं आहे. श्रमण गौतम यांची कीर्ति साऱ्या पूर्वेभर पसरली आहे इतकंच नव्हे तर बाहेरहि गेलेली आहे हें आपण सर्व जाणतांच. समजदार शिक्षित जनतेवर गौतमाचा जितका प्रभाव आहे तितका कोणाहि धर्माचार्याचा नाहीं. शाक्य, कोलिय, मल्ल, लिच्छवि इत्यादि सर्व गणवाले क्षत्रिय गौतमाचा फार सन्मान करतात. प्रसेनजित् व बिंबिसारच काय, पण वत्स, अवन्ती [ माळवा ] कुरु, शूरसेन [ मथुरा ] इत्यादि देशांचे राजेहि गौतमाचा महात्मा म्हणून गौरव करतात. गौतम हे आमच्या गणाचे एक मोठे प्रशंसक आहेत हेंहि आपल्याला ठाऊक आहेच. त्रायास्त्रिंश [ इंद्रलोक ] च्या देवांची उपमा ते लिच्छवींना देतात. आम्हीं अजून त्यांचा कधीं विशेष रूपानें सत्कार केला नाहीं; त्यांच्या करतां एखादा बगीचा दिलेला नाहीं, किंवा एखादा विहार अगर प्रासादहि बांधून दिलेला नाहीं. पण राजा बिंबिसार स्वतःला गौतमाचा शिष्य म्हणवून घेऊन आपण धर्मराज असल्याची कीर्ति चहुंकडे पसरवीत आहे. त्यानं राजगृहांतील आपलं राजोद्यान–वेणुवन–गौतमाला अर्पण करून आपल्या धर्मकीर्तीत भर घातली आहे. गौतम गृध्रकूट पर्वतावर रहात असतांना पर्वताच्या पायथ्यापासून पायीं चालत जाऊन बिंबिसार गौतमाचं दर्शन घेतो. ही गोष्ट मामुली धर्मश्रद्धा अशी वाटते. पण याच गोष्टीमुळं बिंबिसारला प्रजारंजनाच्या कामीं मोठं यश मिळालं आहे. यावरून आपल्याला दिसून येईल कीं बिंबिसारच्या राज्यांत अंतर्गत शांतता व संतोष नांदत आहे. यावरून मगधराज आज जितका बलवान व युद्धतयारीनिशीं सज्ज आहे तितका पूर्वी कधींच नव्हता, हें आपल्याला मान्य करावं लागेल.

" त्यांच्यांत कांहीं गोष्टींची कमतरता पण आहेच. परंतु ती मगध देशांत शिरकाव करून पाहिल्यानं कळण्याजोगी नाहीं. लिच्छवि-गणाशीं तुलना केल्यानंच ती समजून येईल. ती कमतरता आपले सेनापति व दक्षिण सेनानायक रोहण हे आपल्याला सांगतील. या बाबतींत मी सध्यां आपल्याला इतकंच सांगतों कीं इकडे लिच्छवींचा प्रत्येक सुपुत्र हे आपलंच युद्ध आहे असं समजून लढतोय तर तिकडे अंग मगध या देशांतले सैनिक ही लढाई बिंबिसार राजाची लढाई आहे असं मानताहेत ! "

सेनापति सुमन आपल्या पांढऱ्या दाढीवर हात फिरवीत म्हणाले—" आयुष्मान् महाशय ! मी आपल्याला गणाची युद्ध तयारी कशी काय आहे तें सांगतों. या बाबतींल्या कांहीं गोष्टी मी पहिल्या बैठकींत सांगितल्या आहेत. त्यांतील कित्येकांची पुनरावृत्ति होईल. कारण आयुष्मान् सिंह यांना त्या गोष्टी माहित नाहींत. मगधाचे प्रत्येक जंजिऱ्याचे विरुद्ध आम्ही दोन-दोन लाकडी किल्ले उभारले आहेत. विशेषतः महीच्या किनाऱ्यावर आह्मी किल्ल्यांची रांगच तयार केली आहे. महीच्या पलीकडच्या किनाऱ्याची जमीन मल्ल यांची आहे. आमच्या पासून त्यांना भय नाहीं हें ते जाणून

आहेत; व आम्हांलाहि महीपलीकडून भीति नाहीं. पण आम्ही हे किल्ले मगधाचे करतां तयार केले आहेत. आपल्याला ठाऊकच आहे कीं महीच्या प्रवाहाला फार ओढ आहे. त्यांतून खालून वर जातांना नावेचा वेग फारच मंद राहतो. त्यामुळें या किल्ल्यांवर शत्रूचं आक्रमण होण्याचा संभव नाहीं. म्हणून या दुर्गांतून आम्ही आपलं सैन्य, शस्त्रास्त्रं यांचा सांठा केला आहे. मल्ल व त्यांच्यावर अधिराज्य चालविणारं कोसल राज्य यामुळं मल्ल भूमीचा आमच्या विरुद्ध उपयोग करणं मगध राजाला शक्य नाहीं. ही एक आमच्या सुदैवाची गोष्ट आहे; त्याच बरोबर महीच्या प्रवाहाच्या मार्गानें आमच्या युद्धसैनिक-नौका तीरासारख्या मगध सैन्यावर तुटून पडतील हेंहि तितकंच खरं आहे. आमच्या जवळ रण-तरी दोन हजार आहेत. त्यांवरून एकाच वेळीं पन्नास हजार सैन्य लढूं शकतं. गेल्या दोन वर्षांत नौकांची संख्या आम्ही पांचपट वाढवली आहे. वज्जी भूमीवर आक्रमण करण्याकरतां मगध राजाला मोठमोठ्या नद्या पार कराव्या लागतील. यावरूनच नावांची आपल्याला किती जरूर आहे हें आपल्याला कळून येईल. आणखी एक गोष्ट आमच्या विशेष सोईची आहे व ती मगध राजाला उपलब्धच नाहीं. आमच्याकडे धीवरांचीं घराणीं पुष्कळच जास्त आहेत. कारण असह्य दासता व अपमानाचं भय यांमुळं प्रत्येक वर्षी शेंकडों धीवर कुटुंबं मगध सोडून वज्जीभूमीचा आश्रय घेतात. आमच्या इथं फारच थोडे धीवर दास आहेत. आमचे धीवर पुष्कळच सुखी व वज्जीभूमीवर प्रेम करणारे आहेत. धीवरांच्या सगळ्या पुढाऱ्यांनीं गणापुढं स्वखुषीनं प्रतिज्ञा केली आहे; त्यामुळं आम्हांला नाविकांचा तुटवडा पडणार नाहीं. यावेळीं आम्हीं आपल्या नावा पहिल्यापेक्षां जास्त बळकट केल्या आहेत. व त्यांचे जोड लोखंडाच्या खिळ्यांनीं सांधले आहेत बसायच्या जागा पण अशा केल्या आहेत कीं नाविक व सैनिक बाहेरून मुळींच दिसणार नाहींत. घोडे व रथ नदीपार करण्यासाठीं वेगळ्या नावा व घाट तयार केले आहेत.

"आमचे पायदळ सैन्य निदान दक्षिण पूर्व सीमेवर तरी संख्येच्या बाबतींत मगधांशीं तुलना करतां फारच थोडं मागं आहे; पण त्या बरोबरच संख्येची उणीव आपल्या योग्यतेनं आमच्या सैन्यानं भरून काढली आहे. अश्व, रथ व गजसेना या बाबतींत बिंबिसार आमच्याहून वरचढ असेल; कारण अंग-मगध प्रजेचं सगळं लुटून घेतलेलं धन त्याच्या जवळ आहे. पण त्या बरोबरच विस्तृत सीमेच्या रक्षणा करतां त्याला जास्त सैन्याची जरूरी आहे. पश्चिमेला प्रद्योत याला मगधाचा उत्कर्ष पसंत नाहीं. तशीच स्थिती वत्सराजाचीहि आहे. प्रसेनजित् सारखा नालायक राजा जर कोसलच्या गादीवर नसता तर बिंबिसारचे सारे मनसुबे धुळीला मिळाले असते. बिंबिसारला या सीमांच्या रक्षणा करतां बरंच सैन्य ठेवणं जरूर आहे. अन् शिवाय अंग देशांतील वातावरण तितकंसं शांत झालेलं

नसल्यानं बिंबिसारला तिथलं सैन्य अजिबात काढतां येत नाहीं. याच्या उलट आम्हांला उत्तर व पश्चिम सरहद्दींवर सेनेची आवश्यकता नाहीं.

आमच्या जवळ जी फौज तयार आहे तिच्या शिवाय आपली अ-लिच्छवि प्रजा या युद्धाकडे आपलेपणानं पहात आहे. कारण मगधादि राजांची शासन पद्धति व वज्जीगणाची शासन पद्धति यांतील फरक ती पूर्णपणें जाणून आहे. शासन-कार्यांत लिच्छवींच्या इतका जरी त्यांचा हात नसला तरी लिच्छवि गण हा राजे लोकांसारखा त्यांच्यावर मन मानेल तसा जुलूम करूं शकत नाहीं. इथं त्यांच्या सुंदर स्त्रियांवर अंतःपुरांत कोंबण्याची जबरदस्ती कोणी करणार नाहीं. त्यांचे चांगले घोडे, चांगले रथ जबरदस्तीनं घेऊन जाणारा इथं कोणीहि नाहीं. तुह्मी त्या दिवशी पाहिलं नाहींत का ? मणिभद्र सेठ मेला, त्याला मूलबाळ कांहीं नव्हतं. वज्जी धर्मा [ कायद्या ] नुसार त्याची सगळी संपत्ति गण कोषांत दाखल करायचा प्रश्न निघाला. त्यावेळीं कित्येक गणसदस्यांनीं मणिभद्रांच्या एका दूरच्या नातेवाइकाचा हक्क आग्रहपूर्वक सांगितला. गणाची संपत्ति दुसऱ्याला देण्याची कल्पना जरी चुकीची असली तरी आमच्या गणांतील कोणीहि व्यक्ति आपल्या स्वार्थाकरतां कोणावर अन्याय करूं शकत नाहीं, हेंहि त्यावरून स्पष्ट दिसलं. असो. वज्जींचे ब्राह्मण-ज्येष्ठ [ पुढारी ] व गृहपति-ज्येष्ठ यांच्याकडून त्यांना वज्जीभूमीच्या स्वातंत्र्याकरतां लढण्याची संधी मिळावी अशी मागणी आली आहे. आपण त्यांना गुप्तपणें सशस्त्र व सुशिक्षित केलं आहे व करीत आहोंतच.

" मगधांतून पळून आलेल्या कामगारांची करुण कहाणी आपले कामगार त्यांच्या तोंडून ऐकतच असतात. याच्या उलट वज्जीभूमींतील कामगार हजारपट चांगले आहेत व त्यांच्या पैकीं जे शस्त्र धारण करूं शकतात त्यांना तुम्हीं आपल्या फौजेंतले सैनिकच समजून चाला.

" आतां आपले दास ! आपला शेजारी मगधराज जो आपल्यावर इतका उखडला आहे, त्याचं एक कारण हेंहि आहे कीं वज्जी धर्मानुसार मालकाला दासावर हवा तसा अत्याचार करतां येत नाहीं. वस्तुतः लिच्छवींची स्थिति अशी आहे कीं, दासांना गुलामगिरींतून मुक्त करून ते आपलीं कामं कामगारांकडून मजुरी देऊन करून घेतील. पण अ-लिच्छवि प्रजेचाहि आपल्याला विचार केला पाहिजे. आमच्या दासांची संख्या फारच थोडी आहे. पण जे थोडे दास शिल्लक आहेत तेहि आमच्या करतां खड्ग उचलायला तयार आहेत.

" यावरून आपल्याला काय दिसून आलं ? आपल्या जवळ तयार सैन्य व वेळ पडल्यास तयार होणारं सैन्य मिळून एकंदर फौज इतकी आहे कीं आमचं संख्याबळ मगधांच्या संख्याबळाशीं तुलना करतां मुळींच कमी नाहीं. तसेंच आतां वेळ

आली आहे म्हणून सांगतों कीं शस्त्र घेऊन देशरक्षणाच्या कार्यांत पुरुषांच्या बरोबरीनं भाग घेण्याचा अधिकार मिळावा अशी चळवळ तरुण लिच्छवि स्त्रियांत फार जोरांत सुरूं झाली आहे. एके काळीं लिच्छवि स्त्रिया हातीं शस्त्र घेऊन पति-पुत्रांच्या बरोबरीनं युद्धांत भाग घेत असत. ह्याचा आपल्या आजच्या पिढीला विसर पडलाय. नगर रक्षणाच्या कार्यासाठी आपण लिच्छवि स्त्रियांनाहि तयार केलं पाहिजे."

सेनापतींच्या भाषणानंतर इतर सेनानायकांनीं आपापल्या सीमेवरील लष्करी परिस्थिति सांगितली. सर्वांचीं भाषणें झाल्यावर सेनापतींनीं मला आपलें मत देण्यास सांगितलें. मी म्हणालों—

"सेनापति व आदरणीय सेनानायक हो! आपलं भाषण नीट लक्ष देऊन ऐकलं आहे. सर्व बाजूंनीं विचार केल्यावर मला वज्जीभूमीची अंतर्बाह्य स्थिति मगधापेक्षां जास्त चांगली वाटली. मला इथं त्या बाबतींत कांहीं सांगायचं नाहीं. पण मला लिच्छवि स्त्रियांकडून आणखी एक कामगिरी करून घेण्याविषयी एक सूचना करावीशी वाटते. ती म्हणजे जखमी लोकांना रणक्षेत्रांतून उचलून नेणं व त्यांची शुश्रूषा करणं; हें काम स्त्रियांनीं करावं, पुरुषांना त्या करतां गुंतवूं नये. एकंदर जी संभवनीय युद्धक्षेत्रं आहेत, त्यांत निर्णायक युद्धक्षेत्र दक्षिणेकडचंच आहे. व त्या ठिकाणींहि महीकांठच्या दुर्गांतून सुरक्षित ठेवलेल्या नावा आमच्या पक्षाला विजय मिळवून द्यायच्या बाबतींत चांगलीच मदत करतील. मगध राजाजवळ बाकीच्या सर्व गोष्टींची बरोबरी आहे. पण मही नदींत आम्हीं राखून ठेवलेल्या पांचशें नावांच्या तोडीस त्याच्याजवळ कांहींच नाहीं, असं मला वाटतं. मी सिंधू नदीवरच्याहि युद्धनौका पाहिल्या आहेत. त्यांतील कांहीं सुधारणा आपल्या नावांतून करण्यासारख्या आहेत. नावांच्या पुढच्या बाजूला बाहेरच्या अंगाला हवे त्यावेळीं काढतां घालतां येतील असे लोखंडी 'अंगुरी * खिळे' बसवले पाहिजेत. त्याचप्रमाणें मी आपल्यापुढं आणखी एक सूचना मांडतों. तक्षशिलेहून आलेल्या नागरिकांशीं माझं काल बोलणं झालं. मगधराज आपल्यावर आक्रमण करण्याच्या विचारांत आहे, हेंहि त्यांना कळलं आहे. म्हणून काल त्यांनीं मला सांगितलं कीं वज्जीभूमीसाठीं लढण्याची संधी आपल्यालाहि मिळावी. माझे मित्र कपिल हे गांधार तरुणांपैकीं एक फारच चांगले सेनानायक आहेत हा माझा अनुभव आहे. ते पार्शव युद्धांत माझे उपनायक होते. सिंधूच्या पलीकडे जाऊन पुष्कलावती पर्यंत पाठलाग करून पार्शव सैन्याची दाणादाण उडवण्याचं काम त्यांनींच केलं. ते व त्यांचे नऊ सोबती नौका-युद्धांत फारच

---

* टीपः—किल्ल्यांच्या दिल्ली दरवाज्यांना हत्तींनीं टक्कर देऊं नये म्हणून हे 'अंगुरी खिळे' मारलेले असतात.

चतुर व अनुभवी सेनानी आहेत. मही-दुर्गस्थ युद्धनौकांचं संचालन करण्यांत आपल्याला यांचा चांगला उपयोग होईल असं मला वाटतं. तेव्हां माझ्या मदतीस त्यांना घेण्याचा अधिकार मला मिळावा अशी माझी आपल्यापुढं विनंती आहे."

"मही नदींतील आमच्या नावांचं महत्त्व आणखी एका गोष्टीवरून समजून येतं : मही नदी गंगेला दीर्घवारा ( दिघवारा ) जवळ मिळते. पण शोण नदी तिच्यापेक्षां पुष्कळच खालच्या अंगाला पाटलिग्रामा ( पाटणा ) समोर गंगेला मिळते. याचा अर्थ असा कीं आमच्या नावांपासून मगधांना भयंकर धोका असला तरी ते आमच्या नावांचं कांहींहि बिघडवूं शकत नाहींत."

"आणखीहि एक गोष्ट मी आपणांस सांगूं इच्छितों : आपण मगध राजाकडून आक्रमणाची वाट पाहात राहूं नये. संधी मिळतांक्षणीं आपणच प्रथम त्यांच्यावर चढाई करावी व त्या दृष्टीनंच आपली सर्व युद्धतयारी असावी. मला वाटतं कीं प्रथम चढाईचा मोर्चा हांकारण्याकरतां आपण शत्रूसमोरच्या किनाऱ्यावरची सेना उपयोगांत आणावी. नावांतून अगोदर हत्ती आणि मग पायदळ, घोडे व रथ अशा अनुक्रमानं आपण चढाई करावी. मही नदींत राखून ठेवलेली 'सेना ही शत्रूची फौज थकल्यावर मगच ताज्या दमानिशीं उपयोगांत आणावी."

अशा तऱ्हेनें आम्हीं अनेक वेगवेगळ्या सैनिक-योजनांवर चर्चा केली. युद्ध परिषदेनें दक्षिणेच्या युद्धक्षेत्रासंबंधांतील माझ्या योजनेचा स्वीकार केला. त्याचप्रमाणें गांधारांच्या सेवेचा स्वीकार करून कपिल यांस माझा उपनायक ठरविलें. स्त्रियांना हत्यारबंद करण्याच्या योजनेस मान्यता मिळाली व त्याची जबाबदारी माझ्या शिफारशीवरून रोहिणी व भामा यांचेवर सोपवली.

परिषदेहून परत घरीं येण्यास बरीच रात्र झाली. भामा, रोहिणी, क्षेमा इत्यादि पुष्कळच लिच्छवि-तरुणी मोठ्या गंभीरपणानें आपसांत बोलत आहेत असें मला दिसलें. मी त्यांना बोलण्यांत मग्न झालेल्या पाहून म्हटलें--

"भामा वहिनी, मला आंत येण्याची परवानगी आहे ?"

भामा--"हो तर ! तुम्ही हें काय विचारतां ? तुमचं सुंदर मुखमंडल पाहाण्याकरतांच आज सकाळपासून डोळे तहानेजून राहिले आहेत."

मी--"मोठी मेहेरबानी झाली. आपली जनपदकल्याणी क्षेमाहि इथं आहे वाटतं. भगिनी क्षेमा ! स्वागत असो !"

क्षेमा--"बंधू सिंह, धन्यवाद !"

भामा--"अन् भावोजी ! मला धन्यवादाच्या नांवानं फुटकी कवडीहि नाहीं ! यालाच तोंडपुजेपणा म्हणतात."

मी--" पण वहिनी, तुझं मुखकमल कमी आकर्षक आहे असं तर मी समजत नाहीं ना! "

भामा--" भावोजी, आकर्षण होतं! पण तें कधीं? तुम्ही त्याच्या करतां जिवाचं रान करीत होतां व घोडा होऊन मला पाठुंगळी घेऊन नाचत होतां तेव्हां! पण त्याचं आतां काय? "

मी--" घोडा होऊन पाठुंगळी घ्यायला मी आतांहि तयार आहे वहिनी. पण तुला त्याकरतां लहान सात वर्षांची व्हावं लागेल. "

भामा--" भाऊजी, आतां काय माझं वजन फार वाढलं? "

मी--" गुणांमध्यें तर नक्कीच. "

भामा--" मग तुमच्याही गुणांत त्याच हिशोबानं वाढ झाली आहे. भाऊजी, उगीच थाप मारूं नका. असें म्हणा ना कीं क्षेमाचा तारुण्याचा बहर आहे, प्रेमाच्या बाजारांत तिच्या अठरा वर्ष वयाचा प्रभाव जास्त आहे! "

मी--" जणूं तुझा प्रभाव संपलाच. "

भामा--" मला म्हातारीला कोण विचारतं? पण प्रिय सिंह, तुमच्याकडून इतका निर्दयपणा होईल अशी मला मात्र कल्पनाहि नव्हती. रोहिणी, तूंच निवाडा कर ग! "

रोहिणी--" भामाताई! मला तुझी फिर्यादच कळली नाहीं तर मी न्याय कसा देऊं? "

भामा--" रोहिणी, तूंहि तिकडचीच झालीस! स्त्रीनं स्त्रीचाच पक्ष घ्यायला हवा. आपण स्त्रियांनीं जर आपसांत एकजूट केली नाहीं तर या पुरुषांच्या पुढं आपलं कांहींच चालणार नाही. "

मी—" वहिनी! तुम्हां स्त्रियांसाठीं एक आनंदाची बातमी आणली आहे. "

भामा—" काय ती? सांगा तर खरी! "

मी—" कांहीं बक्षिस मिळेल तेव्हां सांगेन. "

भामा—" कोणा कडून? "

मी—" तुम्हां सगळ्या जणीं कडून. "

भामा—" सांगायच्या आधीं कीं मग? "

मी—" प्रथम भाव तर पक्का ठरवा. जर माल पसंत पडला तर पैसे द्या. "

भामा—" सगळयांच्या वतीनं सांगूं की सगळ्यांना वेगवेगळं इनाम द्यावं लागेल? "

मी—" वहिनी, तूं सांगितलंस म्हणजे पुरे. "

भामा—" ठीक आहे तर कबूल. आतां माल दाखवा पाहूं. "

मी—" यु-द्ध-प-रि-ष … …"

भामा—" अशा तऱ्हेनं सांगाल तर आम्हां ऐकणारांना चार जन्म घ्यावे लागतील. "

मी—" वहिनी, तूं उगीचच मधें बोलून वेळ लावते आहेस. जाऊं दे. पुन्हां सांगतों ऐका–यु-द्ध-प-रि-ष-दे-नं स-श-स्त्र-हो ण्या-स-मा-न्य-ता-दि-ली-आ-हे. लि-च्छ-वि—पुढं काय असावं तें सांगा पाहूं ? "

भामा—" हें हो काय भाऊजी ! उगीच कोडं कशाला घालतां ? "

मी—" इतकंहि ओळखत नाहीं तर तूं भामा वहिनी कसली ? "

क्षेमा—"बंधू सिंह, मी सांगू ? "

मी—" हं सांग क्षेमा. "

क्षेमा—" पण मी रोहिणी ताईच्या कानांत सांगेन. "

मी—" मग माझ्या कानांत कां सांगत नाहींस ? या कानांनीं असं कोणतं पाप केलं आहे, क्षेमा ? "

क्षेमा—" मागून तुम्ही माझी गोष्ट नाकारून टाकाल. "

मी—" म्हणजे तुझा सिंहावर चांगलाच विश्वास आहे म्हणायचा. "

भामा—" क्षेमा, तूं काय त्यांचं बोलणं ऐकते आहेस ? तुला ठाऊक नाहीं, ते सिंह आहेत सिंह ! मागं एकदां पैज हरल्यामुळं सिंहानीं भामेला नदी पलीकडे नेण्यासाठीं पाठुंगळी घेतली. पण पात्राच्या मधोमध असतांनाच भामेला पाण्यांत टाकलं. व गटांगळ्या खात कच खाऊन रडूं लागले कीं, ' हाय ! मला विंचू चावला.' माझे सारे कपडे भिजून चिंब झाले क्षेमा."

मी– " अन् सिंहाचे कपडे नव्हते वाटतं भिजले ? "

भामा— " त्यांनीं तर ते जाणून बुजून भिजवले होते. "

मी— " अन् जाणून बुजूनच त्यानं स्वतःचे गाल देखील भिजवले ना ! "

भामा—" खोटा ! उगीच बहाणा होता तो. पाण्यांत कुठं विंचू असतात कां क्षेमा ? "

क्षेमा—"पाण्यांत विंचू चावल्याची गोष्ट नक्कीच खोटी असली पाहिजे भामाताई !"

भामा—" तेच हे सिंह बरं ! तुला अजून त्यांची लुच्चेगिरी माहित नाहीं. "

मी—" तासभर गटांगळ्या खात मी रडत होतों तें खोटंच वाटतं. माझे डोळे रडून रडून सुजले होते तेंहि खोटं ? भामानं आपलं उत्तरीय वस्त्र पिळून त्यानं सिंहाचं तोंड पुसलं तेंहि खोटं, आणि स्वतः रडत रडत माझ्या अश्रुभरल्या मुखाचीं एकसारखीं चुंबनं घेतलीं तेंहि खोटं ? पाण्यांत शिरून आपल्या लहानग्या हातांनीं मला ओढून बाहेर काडण्याचा जो तूं प्रयत्न केलास तो देखील खोटाच का ? "

भामा—" तुम्ही नाटक करण्यांत कुशल होता."

मी—" भामा, असं कसं म्हणतेस. माझ्या पायाच्या आंगठ्यांतून रक्त वाहात होतं तें कांहीं नाटक नव्हतं."

भामाचे डोळे भरून आले होते. तिनें माझें मस्तक आपल्या बाहुपाशांत घेऊन त्यावर गाल दाबून धरून म्हटलें–" नको ! सिंह, त्याची आठवण करूं नको. त्या रक्ताच्या आठवणीनं मला पुन्हां रडू येईल. तूं व मी दोघंहि विंचू चावला असंच समजत होतों. पण मल्लिका आत्यानं सांगितलं की विंचू नसून तो सिंही मासा होता."

मी—" मग माझं रडणं खोटं नव्हतं तर ?"

भामा—" सिंह, मुळींच खोटं नव्हतं."

मी—" पण खरं सांगू भामा ! मी मनांत आणलं असतं, तर तूं मला नदी-पार करी पर्यंत मला माझं रडणं थांबवतां आलं असतं."

भामा—"जाऊं दे तें, आतां पुन्हां गप्पांत गुंगवूं नका. युद्धपरिषदेची बातमी आधीं सांगा."

मी—" बरं तर क्षेमा. तुला काय वाटतं तें माझ्या कानांत सांग पाहूं."

क्षेमानें माझ्या कानांत हळूंच सांगितलें–" लिच्छवि स्त्रियांना शस्त्रधारण करायला परिषदेनं मान्यता दिली आहे."

मी हळूंच आपला कान क्षेमाच्या लाल ओंठांना चिकटवून म्हणालों—" क्षेमा, तेंच पुन्हां एकदां सांग पाहूं."

भामा एकदम म्हणाली—" हं, सिंह, राहूं द्या बरं का आपली चलाखी. तिचं चुंबन घ्यायचं होतं नाहीं का ! भोळी बिचारी क्षेमा."

भामाचे शब्द ऐकले न ऐकलेसे करून क्षेमानें पुन्हां आपल्या शब्दांची पुनरावृत्ति केली. नंतर मी म्हणालों–" भामा वहिनी, क्षेमानं अगदीं बरोबर ओळखलं. बाळ क्षेमा, या सर्वांना ऐकूं जाईल असं पुन्हां तेंच मोठ्यानं बोल पाहूं !"

क्षेमानें मोठ्या आवाजांत त्याची पुन्हां उजळणी केली. तें ऐकून भामा व रोहिणी तर अत्यानंदानें नुसत्या नाचूं लागल्या. अन् माझ्या इनामाची आठवण, कोणीच करीना. मी म्हणालों—

" सांगा वहिनी, माल तर ठीक आहे ना ! आतां बक्षिस मिळालं पाहिजे."

भामा—" पण भाऊजी, यांत तुम्ही नुसते संदेशवाहक नसून ठरावाच्या स्वीकृतींतहि तुमचा हात आहेच."

मी—" म्हणून माझा बक्षिसाचा हक्क गेला कीं काय ? वाहवा !"

भामा—" बक्षिसच नाहीं तर त्याहून कांहीं जास्त."

मी--" आणखी कांहीं असेल तें आणखी एखादे वेळीं पाहूं. मला अगोदर पहिलं इनाम वसूल करूं दे. तें म्हणजे रोहिणीच्या ओठांचीं व तुम्हां सर्वांच्या गालांचीं दोन दोन चुंबनं. कबूल आहे?"

भामा--" हात्तिच्या! ही काय मोठी दुर्लभ वस्तु थोडीच आहे."

मी--" मला ती दुर्लभच वाटली. बरं कुठून सुरूं करूं?"

भामा--" तुम्हांला हवं तेथून करा."

मी--" वहिनी, तर मग तुमच्या पासूनच." सगळया जणींचीं चुंबनं घ्यायचें काम संपल्यावर भामा म्हणाली--

" भाऊजी, इतक्या सुलभतेनं हें काम झालं कसं तें तर सांगाल?"

मी--" मी ठराव माडला, व तो सर्वानुमते पास झाला."

भामा--" मग तुम्हांला मोठं भाषण करावं लागलं असेल."

मी--" खास याच एका गोष्टी करतां नाहीं. आणखी बऱ्याच गोष्टी होत्या, त्यांत ही पण घालून टाकली. आणखी एक सांगायचं आहे. रोहिणी व तूं--तुम्हा दोघींना लिच्छवि स्त्रियांना तयार करायच्या आहेत. त्याचे हात फारच नाजूक झाले आहेत." मी क्षेमाकडे नजर टाकून म्हटलें.

क्षेमानें आनंदित होऊन चटकन माझ्यापुढें हात धरून म्हटलें--" बंधू सिंह, हे पहा माझे हात, नाजूक नाहींत बरं का."

तिच्या हातांना आठ आठ फोड आले असून फुटले होते. त्यांच्या कडा अजूनही पांढुरक्या दिसत होत्या. ते पाहून माझ्या अंगावर कांटा उभा राहिला. नंतर आनंदित होऊन मी तिचे दोन्ही हात धरले. ते स्वतःचे डोळयांवर धरून त्यांची चुंबनं घेतलीं. माझे डोळे पाणावले होते. नंतर तिचे हात सोडून मी म्हणालों--

" बाळ क्षेमा! तुझे हे हात पाहून मला किती तरी अभिमान वाटला. लिच्छवि कन्येनं जें करायला पाहिजे तेंच तूं केलंस. तुझ्या सारख्या मुली मिळाल्यावर आपली वैशाली खात्रीनं अजिंक्य राहील."

भामा व रोहिणी यांनीं अजून क्षेमाचे हात पाहिले नव्हते. ते पाहतांच भामानें क्षेमाला घट्ट मिठी मारली व तिनें तिचीं चुंबनें सुरूं केलीं. रोहिणी तिचे दोन्ही हात धरून एकदां आपल्या गालांना तर एकदां ओठांना लावीत होती. जरा वेळानें भामा म्हणाली:—

" बाळ क्षेमा! आतांपर्यंत तूं सामान्य जनपदकल्याणी होतीस. पण आतां तूं खरीखुरी लिच्छवि जनपदकल्याणी झालीस. तूं आपले हात असे तयार कसे केलेस सांग पाहूं!"

" भामाताई, त्या दिवशींचा तुझा उपदेश ऐकून मला आपल्या हातांचा तिट-कारा आला. ते खरोखरच अंबापालीच्या हातांसारखे वाटूं लागले मला. मी त्याच दिवसापासून आईचं न ऐकतां दासीच्या बरोबर तांदूळ सडायला सुरवात केली. प्रत्येक हाताला चार चार फोड येई पर्यंत मी मुळींच थांबल्यें नाहीं. जेव्हां दासीला थकवा येऊन तिनंच आपल्याला आतां काम झेंपत नाहीं असं सांगावं तेव्हां मी काम थांबवावं असा क्रम चालूं ठेवला मी."

" आणि बाळ! तुझे फोड दुखले नाहींत का? असें म्हणून भामानें क्षेमाचें चुंबन घेतलें.

क्षेमा-- " हो दुखले तर! पण मी मनांत म्हणाल्ये, फोडांचं दुःख होऊं लागलं तर तलवार काय उचलणार कपाळ!"

रोहिणी-- " पण क्षेमा तूं कधी आम्हांला दाखवलं नाहींस?"

क्षेमा-- " सिंहांनीं बोलणं काढलं नसतं तर आज देखील मी दाख-वले नसते."

भामा--" म्हणजे हें तूं सर्वांपासून लपवून ठेवलंस तर."

क्षेमा--" फक्त एका माणसाला सोडून."

रोहिणी क्षेमाच्या तोंडावर हात ठेवून म्हणाली-- " सांगूं नकोस हं. भामा-ताई, सांग पाहूं कोण मनुष्य तें?"

भामा--" अहाहा! तुला वाटलं मला कळणार नाहीं होय?"

रोहिणी--" माहित आहे तर सांग ना."

भामा-- राहूं दे तें रोहिणी. मला कर्णपिशाच्च येऊन सांगतं बरं का!"

रोहिणी--" मग सांगायला एवढा वेळ का लावतेस?"

भामा--" तें मनुष्य तूंच आहेस रोहिणी. स्पष्ट सांगूं? क्षेमानं तुलाच शपथ घालून आपलं रहस्य सांगितलं आहे. तिनं तुलाच आपले हात दाख-वले होते."

रोहिणी--" हात्तिच्या! हेंच का कर्णपिशाच्चाचं सांगणं! भामाताई, तर मग तूं सपशेल फसलीस ग बाई."

भामा-- " तुम्ही दोघींनीं मिळून माझा अपमान करायचा ठरवला आहे वाटतं. बरं सांग पाहूं कोण तें!"

रोहिणी-- " क-पि-ल; माझे तक्षशिलेचे बंधू."

क्षेमाच्या गालांवर गुलाबी छटा पसरली होती. पण ती शांत राहिली. तिनं मान खालीं घालायच्या आधींच भामानें तें पाहिलें होतें. नंतर ती रोहिणीला म्हणाली--

" रोहिणी, तुला ग कसं कळलं ? "

रोहिणी--" हें कळायला अंतर्ज्ञान कशाला हवं ! तू पाहिलं नाहींस का ? त्या पहिल्या रात्रीं कपिलच्या बरोबर नृत्य केल्यानंतर क्षेमा कपिल शिवाय कोणाबरोबरहि नाचली नाहीं. "

भामा--" रोहिणी, माझ्या इतकं लक्षांत नाहीं आलं. "

दुसरें कांहीं बोलणें सुरू व्हायच्या अगोदरच क्षेमा म्हणाली--" भामाताई,-हात दाखवले इतकंच नव्हे तर ढाल-तलवार चालवायला देखील मी शिकत आहे. "

भामा--" त्याच गुरूजवळ ना ? "

क्षेमा लाजली. भामानें तिला जवळ घेऊन म्हटलें—" नाहीं बरं ! सिंहाकडून मी ऐकलं आहे कीं कपिल तलवार चालवण्यांत अतिशय कुशल आहेत. अन् तूं कपिल कडून त्याच्या 'देव लोक' च्या सफरीचं वर्णन ऐकलं आहेस कीं नाहीं ? "

क्षेमा--" देव लोक ! "

भामा--" होय. सिंहांनी मला एक दिवस सांगितलं होतं कीं कपिल देवलोकला गेला होता व देवांच्या शत्रू बरोबर लढला. देव म्हटलं म्हणून तूं कांहीं ते मेरू पर्वताच्या शिखरावर राहणारे त्रायस्त्रिंश देव किंवा त्याचा राजा शक्र देवेंद्र समजूं नकोस. "

क्षेमा--" मग हा देवलोक कुठला भामाताई ? "

भामा--" इथला, पृथ्वीवरचाच. उत्तर-कुरूचा देवलोक. "

क्षेमा--" मी नाहीं ऐकलं. "

भामा--" तर मग तूं कपिलच्या बरोबर उगीचच नाचलीस. "

मी भामाच्या तावडींतून तिला सोडवण्याकरतां म्हणालों—" क्षेमा, दुसऱ्यांनीं विचारल्या शिवाय कपिल आपणहून फारच थोडं बोलतो. त्यानं जगातले जितके देश पाहिले आहेत तितके फारच थोड्या लोकांनी पाहिले असतील. अन् भामा वहिनी, आणखी एक गोष्ट सांगायची विसरलों—कपिल व त्याचे सवंगडी यांनी मगधा विरुद्ध वैशालीतर्फे लढण्यासाठीं आपली सेवा सादर केली आहे. "

रोहिणी माझ्या जवळ येऊन मला चिकटून माझे हात आपल्या हातीं घेऊन म्हणाली—" आर्यपुत्र, त्यांनीं आपली सेवा सादर केली ! "

मी तिच्या सौम्य डोळ्यांचें चुंबन घेऊन म्हटलें-- " अन् युद्धपरिषदेनं तिचा स्वीकारहि केला. "

रोहिणी-- " स्वीकार केला ! "

मी— " अन् कपिल माझे उपनायक म्हणून नियुक्तहि झाले. "

रोहिणीनें आपल्या करपाशांत मला बद्ध केलें आणि आपले ओंठ माझ्या तोंडाजवळ आणून ती म्हणाली--" मग गंगेच्या किनाऱ्यावर देखील सिंधू कांठचंच दृश्य होणार तर. "

रोहिणीला जवळ घेऊन मी म्हणालों— " रोहिणी, पण मला कळवल्याशिवाय मात्र नाहीं हं. तूं व भामा वहिनी मिळून लिच्छवि स्त्रियांना खड्गधारिणी देवी-उत्तर कुरूंतील देवींसारख्या तयार करा. मी तुमच्या योग्य काम शोधून काढीन. "

भामानें रोहिणीच्या हातून माझे हात सोडवून घेऊन ते आपल्या हातांत घेऊन म्हटलें--" भावोजी, आज फार आनंदाची बातमी सांगितलीत. "

मनोरथ येत असलेले मला अगोदर दिसले ह्मणून मी भामाचें बोलणें मध्येंच थांबवून म्हटले--" आणखी एक आनंदाची बातमी ध्या. हे पहा बंधू मनोरथ आले ! "

तोंपर्यंत मनोरथ सर्वांच्या समोर येऊन पोंचले. सर्वांनीं एका आवाजांत म्हटलें-" लिच्छवि-पुत्र मनोरथांचें स्वागत असो. "

भामानें झेंप घेऊन मनोरथांना मिठी मारली--" प्रिय मनोरू ! तूं इतका वेळ कुठं थांबला होतास ? "

मनोरथ--" इतका वेळ कुठं थांबलों होतों ? गेलों होतों कपिल व त्यांचे सवंगडी यांना ब्राह्मणांची यज्ञवाट दाखवायला. "

भामा--" फार महत्वाची गोष्ट दाखवायला गेला होतास ह्मणायचा ! "

मनोरथ--" प्रिये, त्याच्या देशात असे ब्राह्मणहि नसतात अन् त्यांच्या यज्ञवाटाहि नसतात. "

भामा--" ठीक. युद्ध-परिषदेनं लिच्छवि स्त्रियांना शस्त्रधारी बनण्याची आज्ञा दिली आहे हे तुला ठाऊक आहे ना ? "

मनोरथ--" आज्ञा दिली ! मोठी आनंदाची गोष्ट. "

भामा--" आणि त्यांच्या संघटनेची सर्व जबाबदारी तुझ्या स्वयंपाकिणीवर सोंपवली आहे. "

मनोरथनें तिचे चुंबन घेऊन म्हटलें—" तुझ्यावर ! "

भामा—" मनोरथाच्या दृष्टीनं तर मला फक्त भातच करतां येतो. " तोंड वांकडें करून—"आपल्या घरांत कोण कोणाची कदर बाळगतो. मनोरथच्या मतानं तर मी केरपोतेरं करणारी भामा आहे ना ? आज सिंह भाऊजी आले नसते, तर भामा चुलखंडांतच मेली असती. "

मनोरथ--" बहावा रे बीर ! ! "

भामा--" होय, मी काय खोटं बोलत्यें आहे ? "

मनोरथ--" छे छे ! भामादेवीला कोणी थट्टेत तरी खोटं बोलतांना पाहिलं आहे का ! "

भामा--" ठीक आहे. माझ्या सर्वच गोष्टी आपण थट्टेच्या समजतां तर. मनोरथ, जखमेवर मीठ घालूं नका. "

मनोरथ--" मला कांठाला लागूं तर देशील, भामा ! का मध्येंच लटकत ठेवणार आहेस ! "

भामा--" ज्याला मधेंच लटकत राहावंसं वाटतं, त्याला कोण कांठाला लागूं देणार ! "

मनोरथ--" नाहीं भामा, तुझा मनोरथ मधेच लटकणारा नव्हे; तो केव्हाच कांठाला लागून राहिला आहे. "

उत्सुकतेनें त्याचे दोन्ही हात धरून भामा म्हणाली--" प्रिया, खरच का ? आज सुंदर सुंदर बातम्या येताहेत. "

मनोरथ--" आज इथं वैशालीतली सुंदर सुंदर मुखमंडलं एकत्र झालीं आहेत, तर बातम्या सुंदर कां येऊं नयेत ? बरं सांगतों--मला वैशालीच्या दक्षिण द्वारचा उप-नगर-रक्षक म्हणून नेमणूक मिळाली आहे. "

भामानें तोंड वाईट करून म्हटलें--" रक्षक ह्मणजे युद्धक्षेत्रापासून चार योजनं दूर रहायचं व अंगावर रक्ताचा एखादा शिडकाव देखील उडायचा नाही, असाच याचा अर्थ ना ? "

मनोरथ-- " म्हणजे मी कारण नसतां धोक्यांत पडावं अशी तुझी इच्छा आहे वाटतं ! अशी स्त्री तर बाबा पाहिली नव्हती कोणी ! "

मी-- " वहिनी तुला काय वाटतं, लिच्छवींनीं दोन्ही हातांत खड्ग घेऊन लढण्याशिवाय दुसरं कांहीं काम करूं नये, होय ? अशानं काही लढाईत जय नाहीं मिळत वहिनी ! युद्ध करायची जितकी जरूरी आहे, तितकीच जरूरी आहे घायाळ झालेल्याना मलमपट्टी बांधण्याची, स्वयंपाक करण्याची; व धान्य पिकवण्याची पण तितकीच जरूरी आहे; आणि शत्रूच्या पतंगाच्या पंखाची देखील बाधा वैशालीला होऊं द्यायची नाहीं हेंहि तितकंच आवश्यक आहे. "

भामा-- " ठीक आहे. पण आपण वाचस्पतिहि आहांत हें ठाऊक नव्हतं हं मला. "

मी-- " बरं. मी वाचस्पति झालेलों तुला बघवत नव्हतं तर तूं मनोरथावर आक्षेप कां घेतलास ? "

भामा– " आपल्या पतीला कांहीं बोलणं म्हणजे आजपर्यंत लिच्छवींमध्यें अपराध समजला जात नव्हता. आतां तुम्हीं झालांत सेनापति, आणि तुमचे बंधू मनोरथ झालेत नगर-रक्षक. तेव्हां आतां लिच्छवि स्त्रियांच्या तोंडाला कुलपं घाला म्हणजे झालं. "

मनोरथनें भामेच्या पुढें येऊन हात जोडून एका पायावर उभा राहून म्हटलें–– " देवी, वाचस्पतीची पदवी तूं कोणालाच घेऊं देणार नाहींस, ब्रम्हदेवाला देखील नाहीं. तिथं बिचारा सिंह कुठल्या झाडाचा पाला ! बरं तर नगर-रक्षक राहूं दे, तूं जें काम सांगशील तें मी करायला तयार आहे. स्वतःलाच काम निवडायचं असतं तर तूं पसंत करशील तेंच काम मनोरथनं घेतलं असतं. "

भामा जरा शांत होऊन म्हणाली––

" सेवक मनोरथ, मी तुझ्यावर प्रसन्न आहे. वरं ब्रूहि. "

मनोरथ––" हा सेवक तुझ्या कृपेचा नेहमीं अधिकारी राहावा एवढंच मागणं आहे देवि ! "

भामा–– " एवमस्तु, आणखी कांही ? "

मनोरथ–– " आपल्या लिच्छवि स्त्रियानीं जरा शांतपणा धरावा. "

भामा––" हो, पण एकाच अटीवर. तुम्हीहि आम्हा तरुण लिच्छवि स्त्रियांना शस्त्रशिक्षणांत सिंह भाऊजी प्रमाणंच उत्तेजन व मदत द्यावी–आणखी कुणा प्रमाणं ? कपिल मित्रा प्रमाणं. "

मनोरथ––" हा सेवक चरण सेवेकरतां नेहमीं हजर आहे. पण कपिलनं कोणत्या रीतीनं देवीची कृपा मिळवली ? "

भामा––" क्षेमाला कपिल ढाल–तलवार चालवायला शिकवतो. "

क्षेमाच्या मुखावर लाली चढलेली पाहून चटकन् विषय बदलून भामा म्हणाली-" अन् मनोरू, तूं क्षेमाचे हात पाहिलेस का ? बाळ क्षेमा, दाखव पाहूं !"

मनोरथनें तिचे फोड-फुटे हात पाहून म्हटले––" एकंदरीत अंबापालीचं जहाज भामा रसातळाला पोंचवून मोकळी होणार म्हणायची. "

भामा––" मनोरू, हें तुला पसंत आहे ना ? "

मनोरथ––" प्रिये ! असलंच पाहिजे, यांत काय संशय ? "

---

## ( १७ )

# वैशालीचे व्यापारी व कारागीर

आज दोन प्रहरचा वेळ रिकामा होता. म्हणून मी विचार केला कीं तो कपिलच्या बिऱ्हाडींच घालवावा. मी रोहिणीला सांगितलें, रोहिणीनें भामेला, व भामेनें क्षेमाला सांगितलें. अन् अशा प्रकारें तीन अप्सराना घेऊन वैशाली नगरीच्या रस्त्यांतून सिंहाला रथ हांकावा लागला. लोक म्हणाले असतील सिंह मोठा रत्न-पारखी आहे. कुणा ओळखीच्या तरुणाची दृष्टि माझ्याकडे वळली की त्याने बोला-यच्या अगोदर गालांतल्या गालांत हंसावें, हा प्रकार तर मला दिसतच होता. आणि अजित तर तोंडभर हंसून म्हणालाच—

" सिंह भैया! आमच्या भाग्य परीक्षेकरता कांहीं शिल्लक ठेवशील की नाही ? "

त्यावर भामा काही तरी उत्तर देणार होती, पण मी चाबूक फटकारला व घोडा पुढें सटकला. नंतर मी पंचतंत्रातील हंस व कासव ही गोष्ट सांगितली. दोघां हंसांनीं दोन्ही कडून धरलेली काठी तोडांत धरून कासव आकाशमार्गे चाललें होते, अशी ती गोष्ट होती. त्यावर भामा म्हणाली--"भाऊजी, तुम्ही स्वतःला तीन हंसामधील कासव समजून लोकांच्या निंदेला उत्तर द्यायचं नाही असा बेत केलाय होय ? "

मी चाबूक जागेवर ठेवून म्हटलें--" हा शेटजींचा वाडा आलाच की. आता बाकीच्या गोष्टी कपिलकरता शिल्लक राहूं देत. "

भामा--"कशाला आलात असं विचारलं तर काय उत्तर द्याल भाऊजी ? "

मी--"माझ्याकरतां हा प्रश्न नाहीच मुळी. मी इथं नेहमींच येत असतो. "

भामा—' भाऊजी, तुम्ही मोठे स्वार्थी आहात. त्या विंचू चावल्याच्या गोष्टी प्रमाणंच भामेला मधल्यामध्ये टाकायचा विचार आहे वाटतं. "

मी--"भामा स्वतःचंच काय, पण बरोबरच्याचं सुद्धा संरक्षण करायला समर्थ आहे अशी माझी पक्की खात्री आहे. "

भामा-- " तसं तर करावंच लागेल. "

रथ उभा करून घोडा सईसाच्या ताब्यांत दिला व माडीवर जाण्यासाठीं जिना असलेल्या खोलींत गेलों तोंच भामेनें हात धरून म्हटलें-- " एक युक्ति सुचली आहे. " नंतर क्षेमाला आपल्या डाव्या हातानें विळखा घालून ती म्हणाली--

"असं सांगेन कीं ढाल-तलवारींचे हात—विशेषतः वैशालीच्या सुंदरींना—शिकवण्यांत आजकाल कपिलांनीं मोठी प्रसिद्धी मिळवली आहे; हें ऐकून तुमच्या शिष्या होण्याकरतां आम्ही आलों आहोंत."

क्षेमानें गाल फुगवून म्हटले-- " हें ग काय भामाताई, अशानं मी परत जाईन हं."

भामानें आणखी जोरानें हात धरून म्हटलें-- " काय ग झालं? मी कांहीं तुझं नांव घेतलं नव्हतं."

क्षेमा-- " हं, म्हणे नांव नाही घेतलं! कोणाला नाहीं कळणार हें?"

भामा-- " पण कपिलकडून ढाल-तलवार शिकणं काय वाईट आहे? विद्या तर कुणाहि गुरूकडून शिकतां येते ना?"

क्षेमा-- " जर तुला असलंच बोलायचं असेल तर मी येत नाही."

भामा-- " म्हणजे याचा अर्थ असा की एक हंस कमी झाला; म्हणजे राहिले दोन हंस व एक कासव. हिशेब काहीं वाईट नाही. भाऊजी, तुमच्या कथेंत तर दोनच हंस होते ना?"

रोहिणीने क्षेमाला आपल्याकडे ओढीत म्हटलें-- " भामाताईला चिडवण्याची फार संवय आहे."

भामाने अपराधिनी सारखें तोंड करून म्हटलें— " बरं बाई, तूं वाईट वाटून घेऊं नको. मी तुझं नावहि घेणार नाही. मग तर झालं ना?"

मी-- " भामा वहिनी, तूं नांव हजार वेळां काढ पण ढाल-तलवार शिकवण्याची गोष्ट मात्र काढूं नको."

भामा-- " बरं बाबा; अगदीं कानाला खडा." तिघी सुंदरींना पुढें घालून मी तिसऱ्या मजल्यावरील मोठ्या दालनांत येऊन पोचलों. तिथें कपिल व त्याचें गांधार मित्रमंडळ मध्यान्ह भोजनानंतर गप्पा-गोष्टींत रमलें होतें. आम्हांला पहातांच कपिलनें सामोरा येऊन-म्हटलें—

" देवीचें स्वागत!"

" कपिल बंधू! 'अप्सरांनो!' म्हण. देवींचा भाव हल्लीं कमी झाला आहे."

कपिलने गालातल्या गालांत हंसत म्हटले—" तर मग अप्सरांना आमच्या पर्यंत आणणाऱ्या या सिंह देवदूताचेंहि स्वागत असो. देवींनो! अंहं चुकलों-अप्सरांनो! आज आपण या गरिबाच्या निवास स्थानाला आपल्या चरणधुळीन पावन करण्याचं कारण काय?"

सर्वांत आधीं भामा म्हणाली--"आमची चरणधूळ नाहीं मिळायची. सखा कपिल, आमच्या पायांतले जोडे आतांच फर्शीवर काढून ठेवलेले आहेत, मग धूळ कुठली?"

कपिल--" भामा, मी काय तुला उत्तर देणार ! "

भामा—" तर मग ही विद्या मी तुम्हाला शिकवीन. "

कपिल—" धन्यवाद ! पण भामा, ज्याच्या घरी दोन दोन जनपदकल्याणी आल्या आहेत, तो किती भाग्यवान असेल हें तूं लक्षांत कसं नाहींस घेत ? "

भामा--" नाहीं सेनानायक, एका वेळीं एका जनपदांत ( देशांत ) एकाहून अधिक जनपदकल्याणी असतच नाहीत. "

कपिल--" एक पूर्वींची समजा. "

भामा--" पूर्वींच्या जनपदकल्याणींची मोजदादच करायला नको. अशा कित्येक दांत पडक्या जनपदकल्याणी काठी टेकीत चालतात. "

कपिल--" पण एक वर्षापूर्वींची जी जनपदकल्याणी असेल तिच्या बाबतींत कांही असं म्हणतां येणार नाही. "

भामा—" पण तिचा बाजारभाव उतरलेला असतो. जनपदकल्याणी एकच राहते. एका म्यानांत दोन तलवारी नांदणार नाहींत. एका रानात दोन सिंह राहात नाहीत. म्हणून आमच्यात एकच जनपदकल्याणी आहे, अन् ती क्षेमा. बरं असो. आम्ही आपल्या वामकुक्षीत अडथळा तर नाही आणला ? "

कपिल—" मी तर म्हणेन, तुम्ही रोज येऊन आमच्या निद्रेत असा गोड अडथळा आणावा. "

भामा--" पण मग त्याची गोडी कमी होईल. बरं, सिंह भावोजी, तुमच्या गोष्टी सुरू होऊं द्यात. माझं काय, मी अशीच बडबडत राहीन. "

मी-- ' पण वहिनी, तुझी बडबड फार गोड असते. "

भामा-- ' पहा बरं भाऊजी, माझी स्तुति करून जावां-जावांत भांडण लावाल हं ! "

रोहिणी-- " भामाताई, आपल्यांत कोणीहि भांडण लावूं शकणार नाहीं. "

भामा— ' रोहिणी, या पुरुषांचा काही नेम नाहीं. आपणच भांडण लावतील अन् नंतर म्हणतील, ' जावां-जावांचं कधी पटलं आहे ? सास्वा-सुना तर नेहमींच भांडतात. "

रोहिणी— " पण पुरुषांच्या बोलण्यावरून भांडणाऱ्या जावा-जावा वेगळ्याच असतात. "

भामा-- " होय रोहिणी, किती बरोबर बोललीस. बाहेर जर आपल्याला लढाऊपणाचं पाणी दाखवायचं आहे, तर घरांत ही तोंडा तोंडी कशाला हवी ? सेनानायक कपिल, आम्ही देखील युद्धाची तयारी करीत आहोंत. "

कपिल ( भिऊन ) -- " भामाताई, काय म्हणालांत तुम्ही ? तीन्ही लोक भस्म होऊन जातील. शांतताच तुम्हांला शोभते. "

भामा-- " म्हणजे तुमच्या म्हणण्याचं तात्पर्य हेंच कीं आमच्या हातांत शस्त्र शोभणार नाहीं. "

कपिल-- " असं कोण म्हणतं ? त्या दिवशीं महासिंधूच्या कांठावर रोहिणीला बघितलं असतंस तर, भामा ! "

भामा-- " महासिंधूच्या काठावर नाहीं पाहिली पण आतां महागंगेच्या कांठावर तर दिसेल. "

कपिल-- " अस्सं, म्हणजे तुम्ही या युद्धाच्या तयारीबद्दल म्हणतां होय ? मला वाटलं मी अन् सिंह यांच्यावरच कांहीं गदा आली आहे. "

भामा-- " तुमच्यावर कशाला गदा येईल ? ती जाईल मगध-राज बिंबिसारच्या डोक्यावर. "

कपिल--" या युद्धाची तयारी मोठ्या आनंदाची गोष्ट आहे. गणानं आम्हां तक्षशिलावाल्यांची सेवा या युद्धांत स्वीकारली आहे, हे तुम्हांला कळलंच असेल; आम्हांला कालच कळलं. "

मी--" अन् कपिल भाई ! लिच्छवि स्त्रियांची सेवाहि गणानं स्वीकारली आहे व मोठ्या आनंदाची गोष्ट म्हणजे स्त्रियांची सेनानायक भामा वहिनीच निवडली गेली आहे. "

कपिल--" भामाताई, तुझं अभिनंदन करतों ! "

मी--" आणि तुझी बहिण रोहिणी उपनायक. "

कपिल--" बाळ रोहिणी ! इकडे तर ये. " असे म्हणून रोहिणीचा आरक्त लज्जित चेहरा वर करून त्याने तिच्या कपाळाचें चुंबन घेतले व म्हटलें--" अगदी मनापासून अभिनंदन करतों तुझं ! "

मी--" अन् वहिनी, मला वाटतं लिच्छवि स्त्रीसेनेची पहिली शिपाईण क्षेमा असं म्हणायला कांहीं हरकत नाहीं. "

भामा--" म्हणजे भावोजी ! दोन सेना-नायिकांमध्यें एकच शिपाईण, ही आमची थट्टा नाहीं वाटतं ? "

मी--" नाही वहिनी, कपिलला हें ठाऊक आहे कीं कालच ठराव पास झाला आहे. अन् म्हणून पहिली भरती कुठल्या तरी एखाद्याच शिपायानं होईल. "

कपिल--" सेनानायक भामा, तुमची पहिली शिपाईणच केव्हां तरी तुमच्या सेनेचं नांव उज्वल करील. "

मी--" नांव उज्वल करील का नाहीं हें तुझ्या पेक्षां भामेला जास्त चांगलं नाहीं का समजणार, कपिलभाई ?"

कपिल--" कदाचितच."

मी--" कदाचित् कसं ?"

कपिल--" भामानं कधीं क्षेमाचे तलवारीचे हात पाहिले असतील तर."

मी--" मग तूं तरी पाहिले आहेस का ?"

कपिल--" ती आत्तांच माझ्या जवळ शिकूं लागली आहे. परंतु सिंह, तिचे तलवारीचे हात पाहून ती फारच होतकरू दिसते."

मी--" तर मग तिला लौकरच सेनानायकाचं पद द्यावं लागेल. पण तें सगळं तुझ्या शिक्षण देण्यावर अवलंबून आहे."

कपिल--" तिचे चर्मखड्गाचे [ ढाल तलवारीचे ] डाव शिकून व्हायला आणखी पंधरा दिवस लागतील. घोड्यावर बसण्यांत तर ती तरबेज आहेच. पण अजून धनुष्य-बाण व भाला इत्यादिकांचे डाव तिला शिकायचे आहेत."

क्षेमा--" धनुष्य--बाण मला चांगला चालवतां येतो."

कपिल--" तुमच्या म्हणण्याचा अर्थ आहे लक्ष्यवेध. पण तीराची शक्ती व लांबी वाढवणं आवश्यक आहे. असो. जो लक्ष्यवेध जाणतो त्याला पुढचं शिकणं सोपं आहे. क्षेमाच्या सर्व शिक्षणाला आणखी दीड महिना लागेल, सिंह !"

मी--" पण मला नाही वाटत तुला क्षेमाला शस्त्र-विद्या शिकवायला दीड महिन्याची सवड मिळेलसं."

कपिल--"होय, काल तुझ्याशी जे बोलणं झालं त्यावरून असं वाटतं खरं. सिंह, तूं उल्काचेल [ हाजीपूर ]ला कधीं जाणार आहेस ?'

मी--"याच आठवड्यात."

आम्हांला शेटजींचा वाडा बघायचा आहे असें मधेंच भामेनें सांगितले व त्या तिघीहि शंतनु गाधार पुत्राला घेऊन गेल्या.

कपिलनें बोलणें तसेंच पुढें चालू करीत म्हटले--"मग मला वाटतं तेव्हांच मलाहि तिकडे जावं लागेल."

मी--"हो तर. आपल्याला तिथं एक आठवडाभर राहून गंगेच्या किनाऱ्याची युद्धाच्या दृष्टीनं पहाणी करावी लागेल. व मही नदीच्या कांठावरील गुप्त दुर्गांचं निरीक्षण करावं लागेल. आपल्या युद्धनौकांमध्यें बळकटी वाढवण्याकरतां आणखीहि कांहीं सुधारणा कराव्या लागतील असं वाटतं. प्रथम आपण अकराजण जाऊन पाहूं या, नंतर त्यावर विचार करूं. आपण ठरवलेल्या सुधारणा अमलांत आणतांना आप-

त्याला कुशल लोहारांची सम्मति व मदत घ्यावी लागेल. कपिल ! वैशालीच्या पश्चिमेकडील सरोवर नावांची चांचणी घेण्यासाठीं मुक्रर केलं तर बरं होईल नाहीं ? "

कपिलनें जरा विचार करून म्हटलें—' हें करणं आवश्यक आहे असंच वाटतं. महीचा एकच किनारा लिच्छवींच्या हातीं आहे, असं तूंच सांगितलं होतंस. म्हणजे समोरच्या किनाऱ्यावरून आपले नावांच्या बाबतींतले प्रयोग शत्रूला दिसूं शकतील ना ! "

मी—"अन् इथं आपण त्यापेक्षां गुप्त अशा स्थळीं राहूं शकूं. "

कपिल—" सिंह ! मला वाटतं आपण असं करावं कीं नावांची पहाणी करून आपण त्यांच्या सुधारणांवर विचार करूं, अन् त्या बरोबरच नाविकांचं व सैनिकांचं शिक्षण व परीक्षण करूं. नावा एकत्र केल्यानंतर आपण आपल्या सोबत्यांना महीच्या किनाऱ्यावर स्थायी स्वरूपांत ठेवून देऊं. नंतर आपल्याला कुशल लोहारांच्या मदतीनं नावांच्या सुधारणांचे प्रयोग करतां येतील. नंतर जो प्रयोग यशस्वी होईल त्याचा उपयोग जास्तींत जास्त नावांवर करतां येण्यासाठीं आपल्याला हुषार लोहारांची पुरेशी संख्या महीच्या किनाऱ्यावर नेऊन लौकर काम पूर्ण केलं पाहिजे. "

मी—"आपल्याला सर्वच काम लौकर पूर्ण करण्याकडे लक्ष ठेवलं पाहिजे. आतां थंडीचा दीड महिना राहिला आहे. युद्ध थंडींतच होणं चांगलं असतं. बिंबिसार उशीर करीतच चालला आहे, आतांपर्यंत केलेली तयारी पुरेशी झालेली त्याला वाटत नाहीं. अन् मला वाटतं आपल्यालाहि आपली तयारी पूर्ण करायला अजून कमींत कमी एक महिना तर लागेलच."

कपिल—"म्हणजे जर आपल्याला युद्ध करायचं असेल तर एक महिन्यानंतरच करायला मिळेल, असंच ना ? पण उन्हाळ्याचे दिवस जखमी लोकांना फारच धोक्याचे असतात."

मी—" पण राजा बिंबिसार–किंवा या युद्धाचा मुख्य प्रेरक जो अजातशत्रू त्याला या घायाळ लोकांशीं करायचंय काय ? एकाच्या जागीं दहा मेले तरी त्याला त्याचं काय होय ? आक्रमणाची संधी बिंबिसारला देतां उपयोगी नाहीं, एवढं मात्र खरं. नक्की युद्धाला सुरवात कधीं करायची याचा विचार सर्व परिस्थिति पाहिल्यावर करूं. "

कपिल—" या युद्धाची मूळ प्रेरणा कुमार अजातशत्रूची आहे, असं कां तुझं मत आहे ? "

मी—" हो, यांत शंका नाहीं. म्हाताऱ्या बिंबिसारला लिच्छवींच्या खड्गाची पूर्ण ओळख आहे. त्याचं चाललं असतं तर तो लिच्छवींच्या वाटेस गेला नसता. "

कपिल—" या कुरापतींचं कारण काय ? "

मी--" विजय, प्रभुता ! दुसरं काय ? "

कपिल--" दुसऱ्या जातीला परतंत्र करणं. "

मी--" मित्र कपिल ! या राजांची सर्वांत मोठी लालसा असते चक्रवर्ती-सर्व पृथ्वीचा एक राजा-सार्वभौम होण्याची."

कपिल--" पार्शव शासानुशास [ शाहंशाह ] कुरु व दारय यांच्या प्रमाणंच. "

मी--" त्यांपेक्षां बडे व चक्रवर्ती होण्यासाठीं शेंकडो जाती-देश-परतंत्र करावेच लागतात. "

कपिल--" आणि आम्हां गणतंत्रवाल्यांचा उद्देश याच्या नेमका उलटा आहे. आम्हीं स्वतःहि परतंत्र होणार नाहीं व दुसऱ्यालाहि करणार नाहीं . "

मी--" इच्छा होऊनहि आपण दुसऱ्यांना परतंत्र करूं शकत नाहीं. कारण आपली राज्यसत्ता आपल्या रक्तानं मर्यादित केली आहे. जिथं लिच्छवि प्रजा नाहीं तिथं आपण आपलं राज्य स्थापन करणं ही गोष्ट केवळ स्वप्नांतच शक्य आहे. "

कपिल--" म्हणजे आपण गणतंत्री कधीं विशाल भूमीचे स्वामी होणार नाहीं असंच ना ? "

मी--" जर तसं झालं तर आपण गणतंत्रता गमावून बसूं व हुकुमत गणाच्या हातून सेनापतीच्या हातीं जाईल. सेनापतींच्या हातीं स्वजातीय व विजातीय सैनिक राहतील. "

कपिल- " विजातीय ? "

मी--" विशाल भूमीवर राहणाऱ्या जातींना शस्त्राच्या बळावरच परतंत्र ठेवणं शक्य असतं. आणि याच्यासाठीं एका गणाची जाति पुरेशी होऊं शकत नाहीं. "

कपिल -- " मग तोच सेनापति राजा बनेल. "

मी—" राजांची प्रथा अशाच तऱ्हेनं सुरू झाली आहे. "

कपिल--" यांतून गणांना कांहीं आशेला जागा ? "

मी—" गणतंत्रवाल्यांच्या हृदयांत धुमसणारी स्वातंत्र्याची आग व अनेक समृद्ध जनपदांवर एकतंत्री हुकुमत गाजवण्याच्या बाबतींत राजेलोकांची असमर्थता, हीच काय ती आशेला जागा. "

कपिल--" अंग-मगध व काशी-कोशल हीं दोन्हीं राज्यं जर अजातशत्रूच्या हातीं गेलीं तर ?"

मी--" बाप रे ! या कल्पनेनंच माझ्या हृदयाचा थरकांप होतोय. "

कपिल--" राजतंत्र [ राजेशाही ] आपल्या सीमेचा विस्तार केल्या शिवाय जिवंत राहूं शकणार नाहीं हें यावरून सिद्ध झालंच म्हणायचं."

मी--" मोठा मासा लहान माशाला गिळतो व स्वतः वाढतो."

कपिल---" अन् गणतंत्र आपली सीमाच तेवढी अफूट राखूं शकतं."

मी--" अथवा अपत्यं वाढल्यावर दुसऱ्याच्या हद्दीपर्यंत फैलावतं."

कपिल--" पण आपल्या अपत्यांच्याच द्वारां ना ?"

मी--" हो, कारण गणतंत्राची सीमा रक्ताच्या नात्यानंच ठरवलेली असते."

कपिल--" मग गणांचं भवितव्य काय ?"

मी--" भवितव्य ही भावी काळांतली गोष्ट आहे मित्रा. यावेळीं आपल्याला फक्त एवढंच ठाऊक आहे की गणांचं जीवन जास्त सुंदर, जास्त स्वच्छंद, जास्त मानवोचित आहे, अन् राजतंत्राचं जीवन निव्वळ दासतेचं जीवन आहे. आह्मी व आमचे देशबांधव जिवंत जीव असेपर्यंत कधींहि हें जीवन सोडून तें जीवन पत्करणार नाहीं."

त्याचवेळीं शंतनू समवेत तिघी अप्सरा तिथें आल्या.

रोहिणी ह्मणाली--" मी राजमहाल पाहिले नाहींत; पण या शेटजीच्या वाड्यासारखा वाडा मी तर कांहीं पाहिला नाही."

मी-- " अन् हे शेटजी लिच्छवि नव्हते."

कपिल-- " पण कोणाहि लिच्छवि कुटुंबापेक्षां जास्त श्रीमंत होते."

मी-- " त्याच बरोबर हें देखील सांगितलं पाहिजे की हा शेटजी दासी व महाधनी लिच्छवि परिवार विकत घेऊं शकला असता."

कपिल--" पण त्याच्याजवळ इतकी संपत्ति आली कोठून ?"

मी--" व्यापार करून. पूर्वेकडील महान् सार्थवाहांमध्यें त्याची गणना होत होती. त्याचा पूर्वज कोशल राजाच्या क्रोधापासून बचाव करून घेण्याकरितां वैशालीच्या आश्रयाला आला."

कपिल-- " मग हें घर रिकामं कसं ?"

मी-- " कारण त्याचा निर्वंश झाला. संततिहीनाची संपत्ति लिच्छवि गणाकडे जाते !"

कपिल-- " पण मित्रा, तूं म्हणालास कीं वज्जीभूमीचं शासनसूत्र फक्त लिच्छवींच्याच हातांत आहे. तर मग या शेटजी सारख्या अ-लिच्छवींना कधीं कुणी खोटेपणानं फसवलं तर या बाबतींत त्यांचं रक्षण करायची व्यवस्था काय आहे ?"

मी-- " गृहपतींनीं ( बनियांनीं ) आपल्या सुसंघटित अशा श्रेणी म्हणजेच वणिक्सभा स्थापन केलेल्या आहेत. कोणताहि अन्याय झाला तर श्रेणीला गणापर्यंत जाऊन दाद मागतां येते. आणि गण हा नेहमीं व्यक्तीपेक्षां गणाच्या स्वार्थाकडे जास्त लक्ष देतो. तर श्रेणीच्या म्हणण्याकडे तो लक्ष देणार नाहीं असं होणंच

शक्य नाहीं. राजतंत्रांतहि अशा श्रेणी आहेत. पण तिथं राजानं जें मनांत ठरवलं असेल तेंच तो बहुतेक करून सोडतो म्हणून तिथं या श्रेणींचा दाब राजावर पडूं शकत नाहीं. पण श्रेणींचा प्रभाव आपल्या सभासदांवर मात्र राजतंत्रांत देखील राहतोच राहतो. आमच्या कडील श्रेणी म्हणजे गणांत सामील असलेला एक लहानसा गण आहे. ती केवळ श्रेष्ठी व सार्थवाह यांच्या आपसांतील वैयक्तिक किंवा व्यापारी तंट्यांतच लक्ष घालते इतकंच नव्हे तर बाहेरच्या जनपदांत वज्जी-भूमीच्या व्यापाराचा सन्मान कायम राहील असा प्रयत्न करते. त्या बरोबरच सार्थवाहांशीं तुलना करतां श्रेणीपासून आमच्या गणाचा एक मोठा फायदा आहे. सार्थवाह हे वैयक्तिक नात्यानं आंतर्जातीय-अनेक राज्यांतील निवासी-असतात, कारण त्यांच्या वखारी वज्जीभूमीच्या बाहेर लांब लांब पर्यंत पसरलेल्या आहेत. आणि म्हणून त्यांच्या पैकीं कोणीहि वैयक्तिक स्वार्थासाठी वज्जीभूमीच्या विरुद्ध जाऊं शकतो, तशी श्रेणी ही संस्था आंतर्जातीय नसते. ती या बाबतीत शुद्ध वज्जीभूमीचीच असते. आणि म्हणून लिच्छवि गणाप्रमाणंच तिलाहि वज्जीदेशाशी विश्वासघात केलेला सहन होणार नाही. ”

कपिल-- “ पण अशा काहीं स्वार्थी व्यक्तींनीं श्रेणी काबीज केली तर ? ”

मी--“ तसं होणार नाहीं. कारण बहुतेक व्यापाऱ्यांचे सर्व कारभार वज्जी-भूमीच्या आंतच आहेत. आणि श्रेणी ह्या श्रीमान् व्यापाऱ्यांच्या आधीन होत नाहींत. श्रेणी स्वतः खूप संपत्तिवान असते. पिढ्यानुपिढ्याचं धन तिच्या जवळ जमा होत राहतं. ”

कपिल--“ श्रेणीचं धन ? ”

मी--“ होय, श्रेणीकरतां सर्व व्यापारी आपल्या उत्पन्नाचा कांहीं ठराविक भाग नियमानं बाजूला काढून ठेवतात. श्रेणीला स्वतःचा खर्च असतो. उरलेलं धन ती व्याजबट्ट्यात गुंतवते. श्रेणीचं धन पुत्रपौत्रांना तर वाटलं जात नाहींच. त्यामुळं पिढ्यानुपिढ्या संपत्ति वाढतंच जाते. ”

कपिल--“ आमच्याकडे अशा श्रेणी नाहीत. त्यामुळं हे सर्व आम्हाला जरा विचित्रच वाटतं. ”

मी--“ विचित्र तर खरंच. या घरवाल्या शेटजींनीं आपल्या हयातींत हे घर जर श्रेणीला दिलं असतं तर ही गणाची संपत्ति ठरली नसती व आज त्याचं भाडं श्रेणीला मिळालं असतं. आमच्या इथं बहुपुत्रक-चैत्य इत्यादि कित्येक देवस्थानांचं धन श्रेणीजवळ जमा आहे. त्याच्या व्याजांतून दर वर्षी नियमित उत्सवांचा खर्च केला जातो. ”

कपिल--“ सर्व वज्जीभूमींत अशा पुष्कळच श्रेणी असतील ? ”

मी—" वणिज-श्रेष्ठी सार्थवाह यांची एक श्रेणी, शिल्पकारांपैकीं एकेका शिल्पाची अलग-अलग श्रेणी—उदाहरणार्थ दंतकारांची ( हस्तीदंताचं कोरीव काम करणारे ) श्रेणी, लोहारांची श्रेणी इत्यादि."

कपिल—" अन् हे गणांत सामील असलेले गण आहेत असं तूं सांगितलस."

मी—" अन् तसंच हें राज्यांत सामिल असलेलं राज्यहि आहे. कारण या श्रेणी मगध, कोसल, वत्स वगैरे राज्यांतूनहि आहेत. हो, पण आमच्या इथल्या श्रेणीसारख्या त्या राज्यांतल्या श्रेणी सुसंघटित नाहीत. आमच्या इकडील श्रेणींची रचना बरीचशी गणासारखीच असते."

सगळा वेळ आम्ही दोघेंच घेत होतों, म्हणून आमच्या अप्सरा जरा रागावल्या आहेत असे माझ्या लक्षांत आलें, म्हणून मी भामेला म्हटलें—" वहिनी, तुम्हीं मौनव्रत का धरलं आहे ?"

भामा—"भाऊजी, नाइलाजानं मौनव्रत घ्यावं लागतं. मी विचार करत होत्यें कीं हें श्रेणीपुराण संपणार तरी कधी, का आम्हाला रिकाम्या हातीच परत जावं लागणार."

मी—" रिकाम्या हाती ?"

भामा—" मग तुम्हाला काय वाटलं, कीं तीन्ही अप्सराची या वाणिय गावां- [ वैशालींतील एक गल्ली ] तून वरात काढण्यासाठी त्याना तुम्हीं घेऊन आलांत ? आम्ही तर एका मतलबासाठींच आलों आहोंत."

मी—" मतलब ?"

भामा—" होय, लिच्छवि स्त्रियांच्या शिक्षणासंबंधीं बंधु कपिल यांची सम्मती विचारायची होती आम्हाला."

मी—" लष्करी शिक्षण होय ?"

भामा—" सैन्याशीं ज्याचा संबंध राहील त्या सगळ्याच लिच्छवियानींच्या शिक्षणाबद्दल विचारायचं आहे."

मी—" कपिल, तुझ्यावर लिच्छवी स्त्रिया अगदी खुष आहेत."

भामा—" भाऊजी, ही हेवा वाटण्यासारखी गोष्ट आहे."

मी—" आतां हेवा कां म्हणून !"

भामा—" तुमच्यावरहि खुष व्हायला लिच्छवियानी तयार आहेत. आमची बाजू तुम्ही इतकी उत्तम मांडली आहे त्यामुळं आम्ही खुष होणं अगदीं साहजिक आहे. हं, मग बंधु कपिल, सांगा पाहूं आह्मी काय काय शिकायला हवं; अन् आमच्या फौजेंत किती वया पर्यंतच्या स्त्रियांना घेतां येईल."

कपिल—" भामा ! मला वाटतं लिच्छवि स्त्रियांच्या सेनेचे दोन भाग करावे. एक शस्त्रधारी सेना अन् दुसरी अन्न व औषधं पुरवणारी सेना. म्हणजेच शत्रूला जखमी करणारी एक व जखमा भरून काढणारी एक. जखमी लोकाना रणक्षेत्रातून बाजूला नेणं इत्यादि कामं आतांपर्यंत पुरुष सैनिकानाच करावीं लागत असत. त्यामुळं लढण्यांत खंड पडतो. म्हणून मला वाटतं जखमीना बाजूला उचलून नेऊन औषधोपचार करण्याची व्यवस्था निराळी करायला पाहिजे."

भामा—" मग त्या करतां आपल्याला वेगळे शल्य-चिकित्सक, चिकित्सा-शिबिर व औषधांचा फार मोठा साठा इतक्या गोष्टी कराव्या लागतील."

कपिल—" त्याबरोबरच स्वयंपाक करणं व वाढणं या दोन्ही गोष्टी बायकांना आपल्या हातीं घेतां येतील."

भामा—" याला काय सैनिक-सेवा म्हणतां येईल ?"

कपिल—" ज्यावेळी शल्य, बाण, खड्ग, यांचा वर्षाव होत असतो तेव्हां रणक्षेत्रांत येण्याचा अधिकार आम्ही स्त्रियाना देतो त्याचवेळी त्याची गणना सेनेचा एक भाग म्हणून झालेलीच असते."

भामा— " बरं तर, मान्य आहे मला."

कपिल— " या स्त्रियानाहि थोडंसं शस्त्र-शिक्षण द्यावं लागेल, पण त्या बरोबरच चिकित्सा-शास्त्राचंहि शिक्षण द्यावं लागेल. या विभागांत कोणत्याहि वयाची स्त्री घेतां येईल. दुसरा विभाग ही शुद्ध सेना म्हणूनच राहील. त्यांना सर्व साधारण लिच्छवि सैनिकाप्रमाणं सर्वच गोष्टी शिकायला हव्यात."

भामा— " म्हणजे त्यात स्त्री-पुरुष भेद राहाणार नाही."

कपिल— " हो, या स्त्रियांनी मागील पिढीच्या स्त्रियाना आपलीं शस्त्रं पुरुषापेक्षा कमी तीक्ष्ण नाहीत हें सिद्ध करून दाखवलं पाहिजे."

भामा— बंधू कपिल, यातील पहिल्या विभागांत लिच्छवि नसलेल्या स्त्रियांना येतां येणार नाही का ? मला वाटतं पुष्कळशा ब्राम्हणी व गृहपतानी या कामाकरतां तयार आहेत. लिच्छवि स्त्रियाचे कुलदेव सिंह, तुम्हीहि आपलं मत सांगा."

मी— " मला वाटतं सेनापति व गणपति यांचाही याला विरोध होईल असं वाटत नाहीं. या गोष्टीला मंजुरी देणं वा न देणं हा त्यांचा अधिकार आहे."

कपिल— " माझंहि असंच मत आहे."

भामा— " अन् तुम्ही लिच्छवि स्त्रियांचे युद्ध-गुरु ! तुम्ही वैशालींत असेपर्यंत आम्हांला शस्त्र-विद्येच्या अभ्यासांत मदत कराल अशी आशा करायला हरकत नाहीं ना ?"

कपिल— " हो, एकदम कबूल. "

भामा-- " तर मग भाऊजी ! अलिच्छवि स्त्रियांच्या बाबतींत सेनापति व गणपति यांची संमति मिळवण्याचं काम तुम्ही करा. बस्स, नंतर एक महिन्यानं पहा बरं, लिच्छवि स्त्रिया भामेच्या पावलावर पाऊल ठेवून चालतात, का त्या काळतोंड्या अंबापालीच्या ! भाऊजी ! तिचा खरोखरच संताप येतो. तिनं कित्येक लिच्छवि तरुण व लिच्छवि परिवार यांची धुळधाण उडवली आहे, इतकंच नव्हे तर त्या कालकर्णीनं लिच्छवी स्त्रियांना स्वतःचं स्वत्व सोडून द्यायला तयार करायचं काम चालवलं होतं. "

मी—" भामा, तूं व रोहिणी माझ्याबरोबर संध्याकाळीं या बुढे लोकांकडे चला ना ! म्हातार्‍या माणसाना संध्याकाळचे वेळी पेला पुढं ठेवून गप्पा मारण्याचा मोठा षोक असतो. "

भामा—" बरोबर बोललात भाऊजी. त्या नंतर आम्ही आमच्या तरुणीच्या परिषदेला जाऊं. "

मी—" परिषदेला ? "

भामा—" सोमानं आपल्या पित्याचं घर आम्हाला या कामा करतां दिलं आहे. आज आमच्या दलातील तरुणी तिथं जमणार आहेत. "

मी—" ठीक, इथपर्यंत मजल आली तर ! मला वाटलं होतं की भामा वहिनी-च्या अजून सर्व तोंडच्याच गप्पा आहेत. "

भामा—' भाऊजी, पहालच तुमच्या वहिनीच्यांत किती पाणी आहे ते ! बरं आणखी एक गोष्ट राहिली, स्त्रीसेनेनं स्त्रीवेशातच राहायचं की कसं ? "

मी—" फक्त सैनिकवेशात. "

भामा--" म्हणजे स्त्रीवेशात नाही. मग ?"

मी--" त्यात फरक काय आहे येवढा ? पुरुषांचेहि केंस लांब असतातच. तुमची जुनी पगडी जरा नीट केली ह्मणजे पुरुषा प्रमाणं होईल. पण वक्ष ? "

भामा--" लाजण्याचं कारण नाही. आम्ही घट्ट आवळून त्याचीहि काळजी दूर करूं. "

मी—" ज्यांना घट्ट बांधूनहि ते नीट जमणार नाहीं त्यांना चिकित्सा-विभा-गांत पाठवून दे भामा ! "

भामा— " अगदीं बरोबर. शत्रूला आपला प्रतिस्पर्धी स्त्री आहे का पुरुष याचा पत्ता लागतां कामा नये. "

कपिल— " आपलं दोघांचं एक मत आहे. "

मी— " आणि माझंहि मत तसंच आहे. "

भामा-- " मग आमच्या वेशाचाहि प्रश्न सुटला. "

गोष्टी संपल्या व आम्ही पुन्हां रथावर आरूढ होऊन आपल्या घरीं आलों. संध्याकाळीं सेनापति व गण-पति यांच्या समोर दोन्ही अप्सरांच्या लाल लाल ओठांतून शब्द निघायचाच अवकाश कीं सर्व गोष्टीना ताबडतोब मंजुरी मिळाली.

## ( १८ )

# वन-भोज

उल्काचेलला ( हाजीपूर ) जाण्यासाठीं निघायच्या अगोदर दोन दिवसच आधीं लिच्छवीच्या वनभोज महोत्सवाचा दिवस आला हा महोत्सव वर्षातून फक्त एकदांच हिंवाळयांत होतो. याला भोजन म्हणायचे खरें, पण त्या दिवशी लिच्छवि स्त्री-पुरुष खाण्याच्या जिनसांपैकी फक्त मीठ व मेरय [ कची दारू ] एवढंच घरून घेऊन जातात. नाहींतर त्याना शेकडों वर्षापूर्वीच्या आपल्या पूर्वजाप्रमाणें आपली सर्व भोजनसामुग्री आपल्या हत्याराच्या बळावर जंगलांत शिकार करूनच मिळवून घ्यावी लागते. युद्धाचें महासंकट असल्यामुळें यावेळी वनभोजनांत पुष्कळशा सैनिकाना भाग घेण्यास मान्यता देण्याची सोय नव्हती. ज्यांना अनुमती मिळाली होती ते आपल्या नजीक असणाऱ्या महावनांत गेले. महावनाला कुठे कमतरता नव्हतीच हिमालयापासून पूर्वसमुद्रापर्यंत [ बंगालचा उपसागर ] जगलच्या जंगल तर आहे. वस्ती जरी वाढत असली तरी जंगलाच्या मानानें ती नसल्या सारखीच होती.

वैशालीचे लिच्छवि सूर्योदयाबरोबरच शहर सोडून पूर्वेकडे चालूं लागले. एक योजन चालल्यानंतर आम्हांला जंगल लागले. सर्व लोक लहान मोठ्या टोळया करून पांगले. आमच्या टोळीत मनोरथ, अजित, कपिल, शंतनु इत्यादि तक्षशिलेचे सवंगडी व आणखी पुष्कळच लिच्छवि तरुण, रोहिणी, भामा, क्षेमा, त्याचप्रमाणे इतरहि पुष्कळ तरुणी होत्या. त्यात ज्ञातृ तरुणींची संख्या पुष्कळ होती.

रानांत गवय ( नीलगाय ), हरणे, डुकरें, गेंडे, रेडे, साळू, गोधा ( गोहरा-सरड्याप्रमाणें ) यांच्यासारखे पुष्कळसे शिकारीचे प्राणी आहेत. परंतु जेथे सारी लिच्छवि दुनियाच या प्राण्यांचा कसून पाठलाग करायला निघाली तेथें

सर्वांना शिकार मिळणें कठीणच. आम्ही आमच्या जवळील शबरांना ( जंगली जात ) थोडेसें मेरय दिलें व बाणांचीं कांहीं फळेंहि दिलीं. अशा तऱ्हेनें जरा आपलेपणा दाखवतांच अजितला एका शबर तरुणानें शिकारीचें स्थान दाखवायचे कबूल केलें. त्याच्या सांगण्यावरून सर्वांत सुलभ शिकार गेंड्याची असल्याचें कळलें. पण सुलभ म्हणजे नुसती दाखवण्यापुरतीच. कारण गेंडयाच्या चामड्यावर बाणहि चालूं शकत नाहीं, ना भाला. तशीच तलवारहि निरुपयोगीच: आणि त्याच्या नाकावरील शिंगापासून वांचणें मनुष्याला तर फारच कठीण. त्याला मारायचे म्हणजे एक तर त्याला खड्ड्यांत पाडायचें, अथवा कुणी चतुर धनुर्धारी असेल तर त्याच्या दोन्ही डोळ्यांत एकाच वेळी बाण घुसवायचे. शबरानें गेंड्याच्या स्थानापर्यंत पोंचवण्याचें कबूल केले. गेंड्यासारख्या जोखमीच्या शिकारीकरतां आमच्या टोळीतील कित्येक तरुण-तरुणी तयार झाल्या. पण त्यांतल्या जास्तींत जास्त चारच मंडळींना नेतां येत होतें. शेवटी असे ठरले की मी, अजित, मनोरथ व रोहिणी इतक्यांनी गेंड्याच्या शिकारीला जायचें. कपिलच्या तुकडीत भामा व क्षेमा होत्या. ती मंडळी डुकराच्या शिकारीला गेलीं. कुणी रेड्यांच्या शिकारीला गेले. कुणी मोरांच्या. कुणी हरणाच्या अगर गव्यांच्या.

आम्हीं घाई केली होती तरीहि आम्ही शिकारीला निघे तोवर दिवसाचा अर्धा भाग संपला होता. आमच्या पायांत मऊ जोडे होते त्यामुळें चालताना त्यांचा मुळीच आवाज होत नव्हता. सुमारें अर्धा योजन [ अडीच मैल ] तर आम्हीं खूपच वेगानें चाललों. नंतर शबरानें एका डबक्याजवळ जाऊन हत्तीच्या पावलांच्या खुणांसारख्या गेंड्याच्या पावलाच्या खुणा दाखवल्या. कांठावरील चिखलांतून तो परत येतानाच्या खुणा, त्याच्या शिंगानीं उकरलेली माती, तेथें दिसत होती. शबरानें जरा कान देऊन चारी दिशांची चाहूल घेतली. नंतर नाकपुड्या उडवून हवेतील वास घेतला. नंतर जरा विचार करून तो म्हणाला--

" गेंडा इथून फारसा लांब नाहीं. म्हणजेच आपण भयंकर धोक्याच्या जागीं आहोंत. तो पांखरांचा आवाज ऐकलांत ? बस्स, तिथंच जवळपास गेंडा आहे. या पांखराला गेंडावालं पांखरूं म्हणतात. सुदैव आपलं कीं हवा तिकडून आपल्याकडे येत आहे. ऐकलंस मुंडा ( माणसा ) ! गेंड्याची नजर जितकी अधू तितकंच त्याचं नाक अतिशय तीक्ष्ण असतं. यावेळीं वारा जर उलटा असता तर आपल्यांपैकीं एक देखील जिवानिशीं इथून निसटला नसता. पण वारा बदलण्याची आतां तरी भीति नाहीं. आतां आपण तिकडे जाऊं या; मी दाखवीन त्या ठिकाणीं दोघे जण झाडावर चढा. आपलीं धनुष्यं तयार ठेवा. नंतर दोघांना मी गेंडयाच्या जवळ घेऊन जाईन. खबरदार ! पावलांचा आवाज होऊं देऊं नका.

गेंडयाचे कान देखील अति तिखट असतात. मी जसजसा एका झाडाआडून दुसऱ्या झाडाआड सरकत सरकत जाईन तसतसे तुम्ही माझ्या मागून या. गेंडा मान वर करून नाकानं श्वास घेऊन डोळे उघडून बघूं लागेल त्यावेळीं–बरोबर त्याच क्षणीं—आपणां तिघांनी त्याच्या डोळयांत एकाच वेळीं तीर मारायचा आहे, हें लक्षांत ठेवलं पाहिजे. बस्स, आतां बोलण्याचा वा पावलाचा किंचित् देखील आवाज होतां कामा नये. "

आम्ही शबराच्या मागून चालूं लागलों. त्याचा तुकतुकीत काळा रंग, त्याचें मेदहीन पण धष्टपुष्ट शरीर, तो उघडा नागडा असूनहि ऐटीत निर्भयतेने पुढें चाललेला पाहून माझ्या मनांत तऱ्हेतऱ्हेचे विचार येत होते. पण या वेळची परिस्थिति अशी होती की एकच विचार जास्त वेळ मनात टिकूं शकत नव्हता. आम्हीं जसजसे पुढे जाऊं लागलों तसतसा पाखराचा आवाज जवळ येऊं लागला. नंतर कांही अंतरावर एका कोरडया खाडयात गवत वाढलेल्या ओलसर मातीत त्याच रंगाचा एक हलणारा पदार्थ दिसला. शबरानें खूण करताच मनोरथ व रोहिणी एका झाडावर चढली. आतां आम्ही तिघे पुढे निघालो. ती शेंपूट हलवणारी काळी आकृति जसजशी जवळ येत होती तसतशी माझ्या मनाची धाव जास्तच होत होती. पण मला भय न वाटतां अधिकच उत्साह चढला होता. आता गेंडा आमच्यापासून तीस हातावर राहिला होता. शबराने आमच्या हातात दोन दोन नवे बाण देऊन दोन वृक्षाकडे खूण केली व तो स्वतः एका वृक्षावर चढला. मी व अजित आपापल्या झाडावर चढलो. शबराने आपल्या धनुष्यावर तीर चढवला, आम्हीहि चढवले.

गेंडा मधून मधून शिगाने माती उकरून तोडाने मुळे शोधून खाई, मधूनच कान उभारून एखाद्या दिशेकडे लक्ष देऊन पाही, वास घेई व फिरून जमीन उकरूं लागे. याच वेळी भिल्लानें एक फादी तोडून खालच्या पाचोळयावर जोरानें फेंकली. वाळक्या पाचोळयाचा आवाज ऐकून गेंडयानें मान वर केली व आपले बारीक डोळे विस्फारून तो आमच्या बाजूला पहाण्याचा प्रयत्न करूं लागला. त्याच वेळीं शबरानें धनुष्य कानापर्यंत ताणलेले मी पाहिलें. आम्हीहि नवे बाण चढवून आमची धनुष्ये ताणली व भिल्लाच्या शिटीच्या आवाजाबरोबर गेंडयाच्या डोळयांवर नेम धरून तीर सोडले. मी उजवा डोळा व अजितने डावा वेधायचा ठरवला होता. दोन तीर गेंडयाच्या दोन्ही डोळयात घुसले आहेत व तिसरा शिगाला लागून खाली पडला आहे असें आम्हांला दिसलें. तिसरा बहुधा माझा असावा. बाणांच्या वेदनेनें व्याकुळ होऊन गेंडयानें बहुधा बाण काढायसाठीं आपलें तोंड जमिनीवर आपटले असावें पण यामुळे बाण उलट आणखी आंतच

घुसले. गेंडा आतां आंधळा झाला असून वेदनांमुळें त्याचीं इतर इंद्रियेंहि काम करण्यास असमर्थ झालीं आहेत हें कळण्यास आम्हांला फारसा वेळ लागला नाहीं. आम्ही तिघेहि खालीं उतरलों. खाली ठेवलेले भाले सरसावून शिटी वाजवली. गेंडयाच्या डाव्या बरगडयां खालील काळजावर नेम धरून आपला तीक्ष्ण भाला मी प्रथम मारला. भाला लागला बरोबर, पण मला तो काढतां येईना. गेंडा ओरडून किंचाळून जमिनीवर पडला. नंतर माझ्या बरोबरच्या दोघांनीं आपले भालेहि त्याच्यावर चालविले. तेवढ्यांत मनोरथ व रोहिणीहि आली. तोंपर्यंत गेंडा इकडे अखेरचे क्षण मोजत होता. मी रोहिणीला म्हटलें--" प्रिये, याचा शेवट तुझ्याच भाल्यानें होऊं दे. "

रोहिणीनें खूप जोराने गेंडयाच्या पोटांत आपला भाला मारला. तो काढतांना गेंडयाची आतडी बाहेर आली. अजूनहि त्याच्या अंगांत धुगधुगी होती. रोहिणी त्याच्या जवळ जाणार इतक्यात शबराने तिचा हात धरून तिला मागे ओढले व तो म्हणाला-- " याचं एक शिंग एका मोठया रेडयाला ठार करण्यास पुरेसं आहे. "

आणखी कांही जखमा झाल्यावर गेंडा एका अंगावर कलंडला. त्याचे पाय ढिले पडले. शबराने एक ढेंकूळ मारले; पण तो निश्चल होता.

इतका मोठा मुडदा घेऊन जाणे दोऱ्या-वांसे असते तरीहि आम्हांला अशक्यच होते. आमच्या जवळ एक तलवार व एक सुरा होता. शबराजवळ लाकूड तोडण्याची कोयती होती. आम्ही गेंडयाचें पोट फाडून त्याचे काळीज बाहेर काढलें. शबरानें त्यातला एक तुकडा त्याच वेळीं तोंडात टाकला. आम्हीहि त्याचेंच अनुकरण केलें असते पण त्याला दोऱ्या, वासे, माणसें, आणण्याला आमच्या छावणीवर पाठवून देण्याचा विचार आम्ही करीत होतों. शेवटीं असें ठरलें कीं मी व शबर यांनी तेथें राहावें व बाकीच्यांनीं गेंडयाचें काळीज घेऊन चालत नव्हे, धावत जावें. ते लोक गेल्यावर मी गेंडयाकडे निरखून पाहूं लागलों. त्याचे शिंग एक हातापेक्षां जास्त लांब होतें. त्याच्या पुठ्ठयांवर व बगलांवर जाड चामड्याचे थर होते. नुसते बसण्यापेक्षां कांहींतरी उद्योग करावा असा विचार करून मी त्याचीं आंतडीं कापून बाहेर काढलीं. ती पाण्यांत स्वच्छ धुतलीं. पाहिलें तों त्यात नुकतींच खाल्लेलीं कंदमुळे जशीचीं तशीं होती.

दोन घटकांनीं कांहीं लिच्छवि व कांही शबर तरुणांना घेऊन मनोरथ आला. गेंडा उचलून नेणें आमच्या आवाक्या बाहेरचें होतें. नदी व नाव असती तर तींत घालून त्याला नेणें शक्य झाले असतें. चामडें अलग करावें तर त्यांत इथेंच रात्र व्हायची. तेव्हां काय करावे असा आम्ही विचार करत असतां

आमच्या समोरच पांच शबरांनीं डोक्या सकट चामडें अलग केलें. मांसाचे मोठाले तुकडे करण्यांत आम्हीहि मदत केली. एक तृतीयाश दिवस राहिला होता तेव्हां आम्ही तें मांस चामडें डोक्यावर घेऊन निघालों. यशस्वी शिकाऱ्याचा आनंद काय वर्णावा ! आणि त्यांत पुन्हां सर्वात अवघड अशी यशस्वी शिकार !

आमच्या इतर टोळ्यांपैकीं फक्त दोघांनाच यश मिळालें होतें. एकीला एक लहानसा रेडा मिळाला होता. व कपिल, भामा, क्षेमा यांच्या टोळीला तीन डुकरें मिळालीं होतीं. त्यांतील एका मोठ्या दांताच्या डुकरापासून क्षेमा कशी तरी बचावली.

आतां सूर्यास्ताची वेळ होती. पहाटे वैशालीहून निघताना जे कांहीं खाल्लें असेल तेवढेंच खाणें झालेले. म्हणून यावेळीं सर्वांना कडकडून भूक लागली तर आश्चर्य नाहीं. कपिलची टोळी दिवस पुष्कळ असतांनाच परत आली होती. व या मंडळींनीं आगटी करून मांस भाजायचें काम चालविले होतें. जळके मांस व ठिबकणारें चर्बीमिश्रित पाणी यांमुळें चोहोंकडे असा मधुर वास सुटला होता कीं माणसांच्याच काय पण देवतांच्या तोंडालाहि पाणी सुटलें असतें. आमच्या सबंध टोळींत सुमारें तीनशें स्त्री-पुरुष असतील. आणि आमच्या जवळ मास इतकें होते कीं तें सर्वांना तीन दिवसातहि खपलें नसतें. म्हणून गेंडा व रेडा यांचें बरेंचसें मांस जवळपासच्या शबरांना वांटून टाकलें.

कुठें मांस नुसतेंच विस्तवावर भाजीत होते तर कुठें लोखंडी सळईला अडकवून भाजीत होते. भामानें बऱ्याचशा सळया एकत्र बाधून भाजत टाकल्या होत्या. मी म्हटलें—“ वहिनी, या आंतड्यांत घालायला कांहीं सापडलं नाहीं तर हीं गळून पडतील. ”

भामा— “ भावोजी ! या इकडे. मी आपल्या हातांनीं किती तरी आंतड्यांचा बचाव केला आहे. या, इथं बसा. हं ! पहा या सळईवर निव्वळ मागील पुठ्याचा मांसखंड आहे अन् तो जवळ जवळ भाजून तयारच आहे. ”

मला तिकडे सरकतांना पाहून अजितहि ओरडून म्हणाला—“ अन् वहिनी, माझी कांहीं आठवण ? ”

भामा— “ या, तुम्हीहि या. ”

रोहिणी— “ अन् मी ग ? ”

भामा— “ मुलांनीं विचारायचं नसतं बरं बाळ ! ”

मनोरथ— “ खरोखरच न विचारणाऱ्यांत मी आहें. हा पहा मी येऊन बसलों सुद्धां: ” असें म्हणून तो भामाजवळ जाऊन बसला.

क्षेमानें हिरव्या पानांच्या पत्रावळी लावल्या होत्या त्या मांडल्या. भामानें चटकन एक सळई वाढून रिकामी केली. आम्ही सुरीनें लहान तुकडे करून मीठ लावून खाणें सुरू केलें. अजितने म्हटलें--" हं, वहिनी, आता सांगा क्षेमा जेमतेम कशी वांचली तें ?"

भामा--" क्षेमा सहीसलामत आहे हें तर तुम्हांला दिसतंच आहे. आतां मी मांस भाजूं कीं कथा सांगूं ? तुम्हीच सांगा."

अजित—" दोन्ही कामं होतील तर फारच चांगलं."

कपिल—" मी सांगूं अजित ? भामा जितकी चांगल्या तऱ्हेनं गोष्ट सांगेल तितकी आणखी कोणाला येणार नाही."

भामा—" पण कपिल दादा, ही सळई जर फिरवली नाही तर मांस एकीकडे जास्त भाजेल अन् दुसऱ्या बाजूला कच्चं राहील."

क्षेमा--" भामाताई, मी करूं का तुला मदत ?"

भामा—" बरं तर ये पाहूं ! कोळसे जरा कमी करते हं. तूं लांकडं जाळून कोळसे तयार करीत चल. बरं तर सिह भाऊजी, आमची शिकारीची सफर ऐकायची आहे ना ?"

मी--" होय वहिनी. तूं बोलूं लागलीस म्हणजे फुलांचा वर्षाव झाल्यासारखं वाटूं लागतं."

भामा—" बरं तर भाऊजी ! ती फुलं निवडा व पहा कसली आहेत तीं—हरसिंगाराचीं आहेत का बकुळीचीं आहेत ?"

मी—" पारिजातकाची असतील वहिनी !"

भामा—" प्राजक्त ! मी तर काही पाहिली नाहीत. पण भाऊजी ! ज्याअर्थी तुम्ही आम्हाला अप्सरा बनवलं आहात. त्याअर्थी आमच्या मुखांतून झरणाऱ्या फुलांना तुम्ही पारिजात म्हणणारच. हं आतां ऐका हं. कथा सुरूं झाली. अन् मनोरथ ! या दातवाल्या गेंड्याचा पुट्ठा कुरतडायला तुझे दात पुरेसे मजबूत आहेत. म्हणून तूं माझ्याकडे पहात रहा. म्हणजे मला कळेल कीं तूं कथा ऐकतोस का आपल्या पत्नीची आपल्याला काही पर्वा नाही असं जगाला दाखवतोस ?"

मनोरथ—" अन् भामा ! हा मांसाचा तुकडा तुझ्याच हातचा भाजलेला आहे ना ?"

भामा—" तर मग तूं एक सबंध सळईची सळई घेऊन त्या सागाच्या झाडाखालीं जाऊन बैस असा मला हुकूम सोडावा लागेल."

मनोरथ—" म्हणजे, वनात जाऊन बसूं ?"

भामा—" मग ?"

मनोरथ—" अन् अंधेर होऊं लागला आहे तो ? "

भामा—" मग ? "

मनोरथ—" अन् जंगलांत सिंह, वाघ, हत्तींचा सुळसुळाट आहे तो ? "

भामा—" मग ? "

मनोरथ—" भामा ! तुझी नियत कांहीं बरी नाही. गरीब बिचाऱ्या मनोरूची तुला जरा देखील दया माया नाही ना ! भामा ! तुझा दास मनोरू इतका वाईट नाही कांही, मग त्याला त्या मोठ्या सागाच्या झाडाखाली कां बरं पाठवतेस ? "

भामा—" आज इथं वाघ, सिंह अगर हत्ती येऊं शकणार नाहींत मनोरू ! जंगलांत मधोमध ही जी विना गवताची साफ जागा दिसते आहे ती इथं वन्य पशू रोज बसत असल्यामुळं स्वच्छ राहिली आहे; इथं एकहि गवताचं रोप उगवत नाही. पण आज ती आम्ही ताब्यांत घेतली आहे. पहा, थोडया थोडया अंतरावर लाकडाचे ढीग पडले आहेत ना ? आता थोड्याच वेळात त्याच्या होळया पेटतील. जळत्या आगीपुढं जनावर येऊं शकत नाही. "

मनोरथ—" अन् सागाचे झाडावरूनच कोणी उतरला तर ? "

भामा—"म्हणजे वीर मनोरू ! तूं माकडालाहि भितोस ? हे नव्हतं मला ठाऊक. "

मनोरथ—" माकड नाही भामा ! अंधेर होतांच माकडं ज्या फांदीवर बसलेलीं असतात तीं सूर्योदया शिवाय तेथून हालत नाहीत हे तर तुला ठाऊकच आहे. "

भामा—" मग आणखी कोण त्या झाडावर असतो बाई ? "

मनोरथ—" तो ग, लाब लांब काळे काळे केंसवाला ! "

भामा—" कोल्हा ? माणसाचा आवाज व आगीचा वास जेथपर्यंत पोंचतो तेथपर्यंत कुणी वन्य प्राणी येतच नाहींत. "

मनोरथ—" कोल्हा नाहीं. तो लाब लांब हातवाला. "

भामा—" वनमानुष ? तोहि येणार नाही. "

मनोरथ—" वनमानुष नाही ग. तो लाल लाल डोळे असणारा तो. "

भामा—" लांडगा ? छे मनोरू ! तूं उगीच घाबरतोस. "

मनोरथ—" लांडगा नाहीं. तो झाडावर नाही चढत. अग, तो माणसा सारखाच नसतो का ? "

भामा—" शबर ? इथले शबर आमचे मित्र आहेत. त्यांच्या पासून आम्हांला मुळीच भय नाहीं. अम्ही कितीतरी मांस व मेरय त्यांना आतां दिलं आहे. ते

आतां खान-पानानंतर नाचाच्या तयारीत असतील अन् तुह्मी मित्री भागूबाई उगी-च्च वेळ घालवतां आहां. ”

मनोरथ—“ भामा, मी आतां स्पष्ट सांगतों. या जंगलांतील प्रत्येक झाडावर सात-सात भुतं आहेत. याउपर सुद्धां जर म्हणत असलीस तर मी जायला तयार आहे. ”

भामाला भुतां-खेतांची जास्त भीति वाटे. त्यामुळें भुताचें नांव निघताच ती एकदम बदलली. आपल्या नेहमींच्या प्रेमळ आवाजांत ती म्हणाली—“ खरोखरच कां या जंगलांत पुष्कळ भुतं आहेत ? मनोरथ, मग खरंच तुम्ही जाऊं नका. ”

मनोरथानें मोठमोठे मांसाचे तुकडे तोंडांत घालून म्हटलें—“ भामा, तुझ्या गळ्या शपथ. शबर तरुण सांगत होता. एक दोन नांवंहि सांगितली त्यानं. पण माझी आठवण तुला ठाऊकच आहे कशी आहे ती. ”

भामानें उदासीनतेने म्हटलें—“ तुह्मी फारच विसराळू आहांत. पण इतक्या मोठ्या जंगलांत एक एका झाडावर सात-सात भुतं ! ”

मनोरथ—“ माणसाच्या जितक्या पिढ्या झाल्या अन् एक एक पिढींत जितकीं माणसं मेलीं त्यांच्यापेक्षां ही झाडांची संख्या जास्त आहे असं का तुला वाटतं ? ”

मी—“ मनोरथभाई ! तुमचं म्हणणं बरोबर आहे. त्या शबरानं सांगित-लेलं मीहि लक्षपूर्वक ऐकलं आहे. ”

भामा—“ मग आज आपण मोठ्या संकटांत आहों तर; होय ना ? ”

मनोरथ—“ असं तसं संकट नाही. तसं तर विस्तवापुढं वाघ सिंह हत्ती लांडगा कोणीच येणार नाहीं, पण तो शबर तरुण सांगत होता, या जंगलांत भुतांचा सरदार कधीं हत्तीवर बसून येतो, कधी सिंहावर, कधीं वाघावर. त्यानं आणल्यावर वाघ सिंह आगीच्या समोरूनच काय पण आगीवरूनहि चालत जातात. ”

भामा मनोरथला चिकटून म्हणाली—“ पण आपण तीनशे लोक आहोंत कीं.”

मनोरथ—“ चाळीस पन्नास झाडांवरील भुतं देखील इतक्या लोकांना पुरेशीं होतील. या रानात सगळीं मिळून एवढींच झाडं आहेत असं का तुला वाटतं ? ”

भामा—“ मनोरथ, तुह्मी थट्टा तर नाहीं करीत ? ”

मनोरथ—“ माझ्या भामेची मी असली थट्टा करीन ? मी फक्त धोक्याची सूचना दिली व स्वतःच्या प्राणाची भिक्षा मागितली. याउपरहि तूं मला त्या झाडा-खालीं जायची आज्ञा करशील ? ”

भामा—" नाहीं मनोरथ, नाहीं ! मी तुम्हांला आपल्यापासून हातभर देखील दूर पाठवणार नाहीं. आज माझा मनोरथ माझ्या जवळच निजेल."

मनोरथ--" भामा, काय बोलतेस हें. म्हणजे रोज काय मी वेगळा निजतो ? लोक काय म्हणतील ? हे लोक दिसायला मित्र दिसत असले तरी यांच्यांत कांहीं शत्रुहि निघतील."

अजित—" मनोरथ ! माझी हीच इच्छा आहे. खरं खरं सांगू ? अगदीं मनापासून मला असंच वाटतं की भामेनं तुला त्या मोठ्या झाडाखालीं पाठवावं, नंतर एक तासाचे आंत महाभुताने तुझं हाडन्हाड खाऊन टाकावं. मग राहिली भामा अन् तिचा दीर अजित."

भामा संतापून म्हणाली--" अजित ! काय बोलतां हे ? मी माझ्या मनो-रथला डोळ्याआड देखील होऊं देणार नाहीं. सिंह भाऊजी ! तुम्हीहि म्हणतां इथं पुष्कळ भुतं आहेत म्हणून ?"

मी--" होय भामा, पण आपल्या जवळ तलवारी आहेत. भुतं लोखंडाजवळ येत नाहींत."

भामा--" खरंच का पण ?"

मी--" होय, अगदी खरं. तूं म्हाताऱ्या दायांच्या तोंडून कधी ऐकलं नाहींस ?"

भामा--" हो ऐकलंय खरं, पण त्याची प्रचीति पहाण्याचा धीर नाहीं होत."

मी--" बरं वहिनी ! तूं काळजी करूं नको. आह्मी सर्व जण तूं व मनो-रथ यांना मधें घालून निजूं. रात्रभराचीच तर गोष्ट आहे."

भामा—" भाऊजी ! आणखी थोडं खा ना ! ही सळई पहा कशी चांगली भाजली आहे. कुठं करपलेली नाहीं. खाताना कशी कुरकुरीत लागेल. डुक्कर फार मोठा होता. त्याचे दात मी संभाळून ठेवले आहेत; एक वितीपेक्षां थोडे कमी लांब भरतील."

मी--" वहिनी, या शिकारीची हकीगत नाहीं सांगितलीस तूं अजून ?"

भामा--" मला त्या झाडावरल्याची आठवण होते आहे भाऊजी."

मी—" तें राहूं दे या वेळीं. क्षेमा कशी वांचली हें तरी सांग."

भामा—" ज्या ठिकाणी दोन प्रहरीं डुकरांचे कळप येतात त्या खड्ड्याजवळ शबरानं आम्हांला नेलं. त्यानं दुरूनच, एका झाडावर चढून आम्हांला हा कळप दाखवला. मीहि एका झाडावर चढल्यें."

मी—" हेंच अंतरवासक नेसून ?"

भामा—" नाहीं, आम्हीं पुरुषांप्रमाणं काचा मारला होता ना त्यावेळीं."

अजित—" अच्छा ! "

भामा—" अच्छा काय ? मी विकच्छ नेसून वर चढावं अन् कुठंतरी कपडा अडकून अधांतरी लोंबत राहावं अशीच ना तुमची इच्छा. "

मी—" जाऊं दे; शिकारीचं सांग पुढं, वहिनी ! "

भामा—" फार मोठा कळप होता. नर, माद्या, पोरं मिळून पन्नास पेक्षां जास्तच असतील. खड्डयांत पाणी होतं. खड्डयाच्या तिन्ही बाजूंनीं कांठापर्यंत जंगल होतं. फक्त एकाच बाजूला थोडीशी मोकळी जागा होती. आम्ही स्त्री-पुरुष मिळून पन्नास होतो. सर्वांच्या हातांत भाले व कोणा कोणाचे हातात धनुष्य-तीर अगर खड्गहि होतें. खड्डयाला चारी बाजूंनी वेढा द्यावा आणि मोकळ्या ठिकाणी जास्त माणसं ठेवावीत असं ठरलं, कारण तेथूनच डुकरं पळून जातील अशी धास्ती ! "

अजित—" वहिनी, तुम्ही कुठं होता ? "

भामा—" मला मागल्या बाजूला जायला सांगितलं होतं. पण मी व क्षेमानं हट्ट धरून मोकळया जागीं उभ्या राहणं पसंत केलं. "

मी—" म्हणजे जास्त संकटाच्या जागी ना ! डुकरं पाण्यांत पोहतात. नंतर परत वळून पोहत जाऊन दुसऱ्या दिशेकडून पळण्याचा प्रयत्न करतात. परंतु त्यावेळी त्याचा वेग फारच कमी असतो. व त्यावेळी बाणाचा नेम मारण्यास चांगली संधी मिळते. "

भामा—" पण मी अन् क्षेमानं जिकडे डुकरांचा कळप होता तीच मोकळी बाजू पसंत केली होती. आमचा वेढा पुरा झाला नाहीं तोच एक डुकर तोंड वर करून हुंगूं लागला. तोच या कळपाचा मुख्य होता. अन् त्याच दंताड्याचं गोड मांस आपण यावेळी खात आहों. तो सगळ्यात जास्त सावधगिरीनं चहूंकडे पाहूं लागला. त्यांनी पळण्याचा प्रयत्न करण्याचे पूर्वीच आम्ही त्यांना चारी बाजूंनी घेरलं. मी, क्षेमा व आमच्यापासून जरा दूर उभा असलेला कपिल इतक्यांचे हातीं भाले होते. मला सांगायलाच वेळ लागतो आहे पण सगळा प्रकार मात्र क्षणात होऊन सुद्धां गेला. दंताड्यानं पाहिलं आपल्या चारी बाजूला माणसं आहेत. जरा वेळ थांबून त्यानं मोकळ्या जागेकडे तीरासारखी सुरकांडी मारली. त्याच्या पाठोपाठ त्याचा सर्व कळप होता. आम्ही मोठ्यानं गोंगाट केला त्यामुळे कांहीं डुकर पुन्हां परत वळले. पण तो दंताड्या मात्र क्षेमा भाला घेऊन उभी होती तिकडेच सरळ धांवला. त्याचे दुधासारखे पांढरे स्वच्छ लांब लांब सुळे तोंडांतून बाहेर आलेले स्पष्ट दिसत होते. काय करावं ते मलाहि सुचेना व क्षेमालाहि सुचेना. आणि याचा विचार करतां करतांच मला मूर्च्छा आली. मला वाटलं कीं आमची जनपदकल्याणी क्षेमा डुकराच्या ताबडींतून कांहीं सुटूं शकत नाहीं. "

क्षेमा भामाला चिकटून म्हणाली-- " नको नको, ताई! त्या वेळचं वर्णनच करूं नको. "

भामा--" भित्री कुठली! आतां काय त्याचं ? यावेळीं तुझा तो काळ खातांना किती गोड लागतो आहे पहा ना! जरा या द्रोणांत मेरय तर घालशील. बघितलं नाहीस का ? सिंह, कपिल आदि सगळ्यांचेच घसे कोरडे पडले आहेत. बरं, मी पुढचं सांगत्यें हं सिंह भाऊजी! मला आतां कळतंय कीं त्यावेळीं मला मूर्च्छा आली नसून मी स्वप्न पहात होत्यें. सर्व गोष्टी यंत्रा सारख्या झाल्या. दंताड्या येऊन पोचण्याचे पूर्वीच कपिलच धावरून भामाजवळ येऊन पोंचले. त्यांनीं तिला दोन्हीं हातांनीं घट्ट कवळून मागं ओढलं व चटकन भाला उगारून दंताड्याच्या बगलेत जोरांत मारला. दंताड्यान इतक्या वेगांत मुसंडी मारली होती कीं त्यावेळीं नेम धरायला अवसरच नव्हता, मग भाला उपसून काढायची गोष्ट कशाला ? कपिलच्या हातांतून भाला जोरात ओढला गेला. दंताड्याच्या मुसंडीनं कपिल सहा सात हात लांब जाऊन पडला मला वाटलं संपला कारभार. पण सुदैव. त्यानं लगेच उठून क्षेमाच्या हातांतला भाला ओढून घेतला व घायाळ होऊन तोंडावर आपटून पडलेल्या दंताड्याला उठायची संधी न देतां त्यानं एका मागून एक भाल्याचे कित्येक प्रहार केले. तों पर्यंत आम्हीहि जवळ जाऊन पोंचलों. दंताड्या गुरगुरत होता पण त्याला उठायची शक्ति राहिली नव्हती. कपिल घामानं नुसता निथळत होता त्यावेळचं त्याचं रूप पुन पुन्हा पहाण्याचा मोह पडत होता. त्यांत किती निर्भयता, केवढं बळ, केवढी चपळता होती. त्याचवेळीं कोणाच्या तरी गोऱ्या गोऱ्या हातांनी कपिलच्या पाठीला विळखा घातला, छातीला छाती मिळाली व लाल लाल ओंठ कपिलच्या ओठांना मिळाले. जरा वेळ दोघे निश्चल उभीं होती. नंतर चारी अश्रुपूर्ण नेत्रांचं मीलन झालेलं दिसलं. आता कपिलचा देह पूर्ववत् भानावर आलेला दिसला. आता ती वीररसाची मूर्ति अंतर्धान पावली. तो म्हणाला— ' क्षेमा! या दयाभिषेकाबद्दल कोटि-कोटि धन्यवाद! ' बोला भाऊजी! आमची शिकार कशी काय वाटते ? "

मी उठून कपिलला जवळ घेतले. आणि पाहिले तों रोहिणी क्षेमाला जवळ घेऊन तिचीं चुंबनें घेत आहे. आम्ही पुन्हां आपापल्या पानांवर बसलों. भामानें दुसरी सळई काढून आमच्यापुढें ठेवली. मी मांसाचा एक तुकडा तोंडात टाकून म्हटलें—

" वहिनी, ही सळई सर्वांत चांगली झाली आहे. "

भामा—" अन् आमची शिकार कशी काय झाली भाऊजी ? "

मी—" आमची म्हणजे कपिलची ना ? फारच चांगली झाली. अशी शिकार जर रोजच्या रोज मिळेल व अशी द्राक्षमयाइतकी गोड सुग्रण वहिनी रोज करून घालायला मिळेल तर त्यापुढं पितरलोक, देवलोक सगळे व्यर्थ आहेत वहिनी ! "

भामा—" तुम्हीं आपल्या वहिनीला हरबऱ्याच्या झाडावर चढवीत आहांत तें काय मला कळत नाहीं ? जाऊं दे ! रोहिणी, तूं आपल्या शिकारीची हकिगत तर सांगशील ! "

तोंड वाईट करून रोहिणी म्हणाली—" भामाताई, मला कोणी शिकारीजवळ जाऊं देईल तेव्हां ना ! "

भामा—" म्हणजे, तुला तेथपर्यंत नेलंच नाहीं रोहिणी ? "

रोहिणी—" मला व मनोरथ भाऊजीना एका झाडावरच अडकवून ठेवलं. "

भामा—" मग मनोरथहि अंगाला रक्त फासूनच गेंडामार बनला ? "

रोहिणी—" आम्हां दोघाना जवळ जाऊंच दिलं नाहीं मी कांहीं बोलणार होत्यें, पण तो काळा लाल लाल डोळयांचा शबर तर मोठ्यानं श्वास देखील घेऊं देईना. "

मी—" रोहिणी, पण तूंहि जिवंत गेंड्यावर भाला मारला नाहींस का ? "

भामा—( खुष होऊन ) " खरंच रोहिणी, मला तर ती सुद्धा संधी मिळाली नाहीं. खड्डयाच्या पलीकडच्यांनीं बाणांनी डुकराची दोन पोरं तरी मारलीं. "

रोहिणी—" भामाताई, लहान मुलाची समजूत काढल्यासारखं केलं ग त्यांनीं ! मी भाला मारला तेव्हां तर गेंड्याला हालतां देखील येत नव्हतं. "

मी—" पण वहिनी, रोहिणीला येवढं सुद्धां भय वाटलं नाहीं. ती जखमी गेंड्या जवळ निःशंकपणे चालली होती. "

रोहिणी—" हो, अन् त्या काळुंद्रयानं माझा हात धरून मला मागं ओढलं. "

" प्रिये रोहिणी ! गेंडा व डुक्कर यांत फारच अंतर आहे. गेंडा शक्तीपेक्षां युक्तीनं–कपटानं–मारावा लागतो. म्हणून तुला वाईट वाटायचे कांहीच कारण नाहीं." मी रोहिणीच्या केसांवरून हात फिरवीत म्हणालों.

भामा—" भाऊजी, बरोबर बोललांत तुम्ही. माझ्या मनांत अजून तेच विचार घोळताहेत. कपिलनी विचार केला केव्हां, क्षेमाला दूर नेली केव्हां व त्या दंताड्यावर भाला मारला केव्हां. मला वाटतं कीं इतक्या थोड्या वेळांत विचार करणं देखील शक्य नव्हतं. मग हातपाय हालविणं तर लांबच. "

कपिल—" नाहीं भामा ! संवय झाल्यावर तेवढ्या वेळांत विचार करून भाला चालवणं कठीण नाही. "

भामा—" मला तर अशक्य दिसतं आहे ! "

कपिल--" संवय' नसल्यानं तसं वाटणं साहजिक आहे. ढाल-तलवार तुम्हांला चालवतां येतेच; शिकत असतांना पहिल्या पहिल्यांदा विरोधाचे स्थानीं ती इतक्या चटकन कां येत नाहीं ? कारण त्याचा विचार करायला माणसाला वेळ लागतो. किंवा तो स्वतःलाच विसरलेला असतो. व डाव्या हाताला हालण्याचा इशारा वेळेवर देऊं देत नाहीं. सराव झाल्यावर मग पाहिलांत ना डावा हात कसा चालतो तो! विचार न करतां, इशारा न मिळतां, तो योग्य जागीं ढाल पुढं करतो. मनाला आज्ञा द्यावी लागते; पण वहिनी! सरावामुळं त्याला किंचितहि वेळ लागत नाहीं."

भामा--" तुम्ही जादू केली नाही हे मलाहि कळतं आहे. पण चपलता मात्र अलौकिक होती."

कपिल--" या चपलतेकरतांच खेळ खेळतात, या करतांच शस्त्रास्त्रांचा सराव असावा लागतो. शिकारी किंवा युद्ध या सरावाच्या परीक्षाच आहेत."

भामा--" मग क्षेमाची एक परीक्षा पास झाली म्हणायची. दमलेला घाबरलेला जीव शांत कसा करावा याचा आम्ही विचारच करीत राहिलो. पण क्षेमानं एका क्षणांत विचारहि केला अन् असं औषधहि दिलं की त्याच्या प्रभावानं सगळे ताप निघून गेले."

कपिल—" मी याबद्दल क्षेमाचा फार फार कृतज्ञ आहे."

क्षेमा--" अन् मी ?"

भामा—" क्षेमा, मला ठाऊक आहे, तूं प्राणदान देणाराशी कृतघ्न कशी होशील ? तुझी मूक कृतज्ञता कपिलच्या शाब्दिक कृतज्ञतेपेक्षां जास्त आहे."

क्षेमा—" पण भामाताई, तूं हा अगदी अन्याय चालवला आहेस. ती कृतज्ञता शाब्दिक नव्हती."

भामानें क्षेमाच्या ओल्या नेत्रांचें चुंबन घेऊन म्हटलें—" हो! बरोबर आहे. तुला वांचवायसाठीं कपिलनं आपला जीव धोक्यांत घातला होता."

क्षेमा—" अन् भामाताई! मी तसं कांहीच केलं नाही."

भामा—" कृतज्ञतेचं प्रदर्शन मूकतेनं जितकं होतं तितकं शब्दांनीं होत नाहीं; बरं तें राहूं दे आता. अंधेर पडायला लागला. लोक खान-पान संपवून गाण्याच्या तयारीला लागले आहेत. आपणहि लौकर आटोपलं पाहिजे. थोड्याच वेळांत नृत्याला सुरवात होईल."

लाकडांचे बरेच ढीग पेटून राहिलेले होते. आम्हीं त्यांवर गेडा, डुक्कर व रेड्याचें मांस भाजण्यास सुरवात केली. इतरांपेक्षां आम्हीं मागेच राहिलों होतों. अजित माझा सहकारी होता. त्याची मांस भाजण्याची पद्धत वेगळीच होती. त्याचें म्हणणें असें कीं मांसाची आंतली सगळी लाली नाहींशीं होणार नाही अशाच रीतीने

तें भाजलें पाहिजे. त्यानें त्याप्रमाणें कांहीं तुकडे भाजलेहि. पण आमच्यांतील बऱ्याच जणांना कुरकुरीत मांस जास्त आवडत होतें.

मांस भाजणें झाल्यावर आतां आमच्या नियमानुसार वन-भोजन सुरूं झालं. तीनशें नर-नारींची पंगत बसली. मांसाकरतां पत्रावळी व मेरयासाठीं सागाच्या पानाचे द्रोण ठेवले होते. पंक्तींच्या मधोमध आगटी पेटलेली असल्यानें उजेड पुरेसा होता. वाढणारे स्त्री-पुरुष मधून फिरत होते. एकदां वाढल्यानंतर तेहि मागें राहिले नाहींत. त्यांना वेगळ्या पत्रावळींची जरूर नव्हती. सर्वांच्या पत्रावळी त्यांच्याच होत्या. अजितने वाढतां वाढतां भामेला म्हटलें—" वहिनी, गेंडा कसा काय झाला आहे ? " भामा सुरीनें एक तुकडा कापून म्हणाली—" फारच गोड आहे. जरा इकडे तोंड करा पाहूं. " अजितने खूप मोठा जबडा पसरला, त्यात एक तुकडा घालून नंतर त्याच्या गालावर तिनें हळूच एक चापटी मारली. मेरय मागण्यासाठीं अजित केव्हां रोहिणीजवळ येई व म्हणे--" गांधारी वहिनी ! आपला उष्टा द्रोण जरा इकडे सरकवा ना ! " असे म्हणून द्रोण तोंडाला लावी व म्हणे--" गांधारी वहिनीचे ओंठ फार मधुर आहेत. "

मेरय आपला प्रभाव दाखवूं लागले होतें, हें कांही जणांच्या तानांवरून समजून येत होतें· मी व कपिल यांच्या रहस्यांत भामाहि सामिल झाली होती. व आज मनोरथला खूप कडक मेरयाचे द्रोणावर द्रोण चढवले जात होते. मनोरथावर दारूचा अंमल चढूं लागला तेव्हां तो भामाकडे द्रोण सरकवून ह्मणूं लागला — " वा - ा - ा - ही - नी ! तू ॣ ॣ ॣ पण् - पी. "

भामा—" मी तुमची वहिनी ! "

मनोरथ--"आ - । न् - क - क् -काय ? स - ा - ा - र्वा - ची - ी - व - ा - ही - नी, तू - - मा - - झ - ी - तु - प -पण - व - ा - हि - नी. "

भामा— " बरं तर मनोरथ भाऊजी, हा घ्या किती गोड द्रोण आहे पहा. "

मनोरथ--' भा - े - े - व - जी ना ा - ही व - ा - ा - हि ा नी , म - ा - नो - र ॣ - तु ॣ झ - ा - ा . "

भामा—' बरं तर मनोरू ! वहिनीला कांहीं गाणं तर ऐकवा. "

मनोरथचे डोळे लाल झाले होते. व ते मधून मधून मिटतहि होते. पण भामाचा शब्द कानी पडतांच तो खडबडून उठे. द्रोण मिळण्यास उशीर झाला की तो लागलीच म्हणे —" गो - ो - ड - - ा द - द्रो - ो - ण - व - ा हि - नी ! गो ो ड - ड. "

आतां भामानें हलकें मेरय द्यायला सुरवात केली.

' मनोरथ ! वहिनीला गाणं नाही म्हणून दाखवणार ? "

मनोरथ—" व - ा - ा - हि - नी - ला ? ऐ - क - वू - ा ऊं सां - ा - ां - ग."
'प - ा - ा - ा - न - नि - ि - ी - ग् - घ - ट.
'प - प - प - त - वि ग - घ - ा - ा - ा - ट् प् - पै."
'प - ा - ा - इ - नी - ी - ी - ग - घ ट् - टा - ा - ा."
"बंरं - रं - ा व - ि - ह - ि - नी - ी : त - ता - ा - क्रू - ू सू - ख - ली - आ - ण - खी - द्रो - ण - दे."

मनोरथाच्या गाण्यानें लोकांची चांगलीच करमणूक झाली होती. विशेषतः म्हणजे अजितची. तो मनोरथला म्हणाला—

"बंधू मनोरथ! आतां नृत्य हवं."

मनोरथ—" ना - ा च् - च, हां - ां हं - ा ठी - ी - - ना - क - च् - च बा - बा - ा - जा - ा - क् - ो - ण - ी - न - ा हीं - वा - ज् - वि - त"

अजित—" बाजा वाजतोय पण तूं कोणाबरोबर नाचणार ते तर सांग?"

मनोरथ—" स-ॅ-व-ा-च े-ब-रो-ब-र-व-हि- ी-न्-च-ल्-न-ा."

भामा रागानें म्हणाली–" अजित तुम्ही फार वाईट आहांत–पिशाच्च नुसते!"

अजित—" न-ा-ह- ीं-हीं व-ह- ी--नी- ी-मी- ी-ही-ह-न-ा-च-े-न-अ-ा-णि-म-न-ो-र-बं-ु-ध-."

मनोरथ—' हो - ो- म् - म - नो - र - थ - ही - या -न - ा - च - चू-दो-दोघेहि."

आम्ही सर्वांनी एकदम म्हटलें—" हं! दोघे भाऊ नाचा." मनोरथ झोकांच्या खात उभा राहिला व त्यानें अजितचा हात धरला, अजितने प्रथम नशा आल्याचें सोंग केले पण आतां त्यालाहि शुद्धि राहीना. मनोरथनें " दोघे भाऊ नाचा." असा आवाज निघताच अजितला ओढलें. भामा म्हणाली–

" अजित! आता जरा नाचा, मग मी तुमची सुटका करीन."

अजित उभा राहिला.

मनोरथ दोन पावलें चालून खाली पडला. उठण्याचा प्रयत्न करूनहि त्याला उठतां येईना.

आता जेवण संपले होते. संगीताचीं सर्व वाद्यें नीट करण्यांत आलीं. शुद्धीवर नसलेल्या लोकांना सोडून बाकीच्यांनीं यूथ-नृत्याला सुरवात केली.

---

## ( १९ )

# आपल्या सरहद्दीवर

रोहिणीनें भामाबरोबर लिच्छवि स्त्रीसैन्याच्या संघटनेचे काम अंगावर घेतलें होतें. मी उल्काचेलला [ हाजीपूर ] रवाना होण्याचे आधीच एक हजार लिच्छवि तरुणी त्यांच्या सैन्यांत सामील झाल्या होत्या. त्यांना शस्त्र-शिक्षणांत मनोरथ, अजित इत्यादि तरुण मदत करीत होते. या सर्व गोष्टीमुळें रोहिणी आमच्या बरोबर उल्का-चेलला येऊं शकत नव्हती.

त्या दिवशी आम्ही पहांटेच घोड्यावर बसून वैशालीहून निघालों. माझ्या बरोबर कपिल व त्याचे सवंगडी व कांही लिच्छवि सेनानी होते. रस्त्यानें लष्करी छावण्यांची तपासणी करीत करीत आम्ही दोन प्रहरपर्यंत उल्काचेलला पोंचलों. रोहणकाका माझी वाटच पहात होते. आम्हांला पाहतांच मला आलिंगून म्हणाले—

"बेटा सिंह! आपली जागा आपल्याला शोभेल अशा आपल्याच लायक पुतण्यानं घेतलेली पाहून कोणा काकाला आनंद होणार नाहीं? सैन्याची मोर्चेबंदी वगैरे सर्व गोष्टी येथील सेनानी ह्मणजेच माझे उपनायक अमरू हे तुला दाखवतील. तेच यापुढं तुझे द्वितीय उपनायक आहेत. पण मला वाटतं मुख्य मुख्य मोर्चे मी स्वतःच तुला दाखवलेले बरे."

मी याबद्दल काकांना धन्यवाद दिले.

भोजनानंतर जमिनीवर आपल्या व शत्रूच्या दुर्गाचा नकाशा काढून प्रत्येक महत्वाची जागा काकानीं मला दाखवली. नंतर आमची किती किती सेना कुठे कुठें आहे तेहि दाखवलें. प्रहरभर दिवस राहिला असतांना दक्षिणेकडील फौजेचे कित्येक सेनानी—उपसेनानीहि येऊन पोंचले. काकांनीं त्या सर्वांचा मी व माझे उप-नायक कपिल यांच्याशीं परिचय करून दिला. यानंतर कपिल व मी एका खोलींत गेलों. एकेका ठिकाणच्या सेनानीला व उपसेनानीला खोलींत बोलावून आम्हीं त्यांचें सेनाबल इत्यादि बाबतींत विशेष बारकाईनें विचारपूस केली. मधून मधून मी ताडपत्रावर कांहीं लिहीतहि होतों. आमचें हें काम अंधेर पडला तरी संपलें नाहीं.

चांदणी रात्र होती. गंगेकांठच्या कित्येक दुर्गांची पहाणी यावेळी करावी, अशी सल्ला काकांनीं दिली. तक्षशिलेच्या इतर सेनानींना सोडून फक्त कपिलला

घेऊन मी काकांबरोबर नावेंत बसलों. आमच्या समोर गंगेच्या पलीकडच्या तीरावर पाटलिग्राम होते; तेथें मगधांच्या फौजेची एक मोठी छावणी होती. आह्मीं गंगेच्या वरच्या अंगाला गंगा-मही संगमाच्या दिशेनें दीर्घवाह [ दिघवारा ] या गांवाकडे जाऊं लागलों. पलीकडच्या तीरावर कुठें कुठें शेकोट्या दिसत होत्या, तर कुठें कुठें कपड्यानें झांकलेल्या व्यापारी नावांतील दिव्यांचा उजेड दिसत होता. आमच्याकडील दुर्गांमधून जसा कसलाहि उजेड व आवाज येत नव्हता, तशीच स्थिती मगधांच्या दुर्गांचीहि होती. दीर्घवाहापर्यंत आमचे पांच दुर्ग होते. ते सगळे लाकडी प्राकाराचे होते. आम्ही उतरलों कीं पहारेकरी " कोण आहे ? " म्हणे, काकांचा सांकेतिक शब्द ऐकतांच तो आपल्या नायकाला आवाज देई, नंतर आम्ही नावेतून उतरून त्याच्या बरोबर दुर्ग पहाण्यास जात असूं. चांदण्यामुळें रस्ता पहाणे सोपें झालें, नाहींतर अनोळखी माणासाला तेथील रस्ते इतके वेडेवाकडे व अडनाडी होते की सरळपणाने दहा हातहि जाणें कठीण होतें. युद्धनौका अशा तऱ्हेनें लपवून ठेवल्या होत्या कीं नदीपलीकडून तर नाहीच पण या काठावरूनहि त्या दिसणे कठीण होते. एक मोठा तलाव तयार केला होता. त्याचे पाणी एका वाकड्या-तिकड्या कालव्यानें गंगेला मिळवलें होतें. त्यामुळे दृष्टीच्या आड राहूनहि थोड्याच वेळात नावा गंगेच्या प्रवाहात आणतां येत असत. हें मोठ्या श्रमाचे काम होते. कारण दर पावसाळ्यानंतर नवीन खोदाई करावी लागे. पण या सर्व मेहनतीची आता फारच जरूरी होती. आह्मी प्रथम सूचना न देतां या रात्रीं दुर्गांची पहाणी करण्यास आलों होतो तरी सर्व ठिकाणचे पहारेकरी सावधगिरीने पहारा करीत होते. दारू किंवा दुसऱ्या कांही कारणानी अव्यवस्था मुळीच नव्हती.

आम्ही दीर्घवाह येथील दुर्गाची पहाणी केली त्यावेळीं एक प्रहर रात्र राहिली होती. हा सर्वात मोठा दुर्ग होता. काकांनीं प्रत्येक दुर्गातील जागे असलेल्या सैनिकाशीं माझी ओळख करून दिली. सर्वांना त्यांनी सागितलें कीं आजपासून लिच्छविपुत्र आयुष्मान् सिंह हे तुमचे सेनानायक आहेत. कोणाची थट्टामस्करी, कोणाला शाबासकी, कोणाच्या आसनावर क्षणभर बसून तर कोणाच्या ताटांतील एखादा घांस खाऊन मी त्याना शब्दांनींच नव्हे तर प्रत्यक्ष कृतीनेंहि हें दाखवण्याचा प्रयत्न केला कीं त्यांचा नवा तरुण सेनानायक हा नुसता सेनापति नसून मित्रहि आहे.

आम्ही उल्काचेलला ( हाजीपूर ) आलो तेव्हा रात्र फारच थोडी राहिली होती. कपिलनें काकांची तारीफ करीत म्हटलें—

" सेनानायक ! आह्मी तर तरुण आहोंत व या श्रमांची आम्हाला संवय आहे. पण आपण या उतारवयांत देखील इतकी मेहनत करतां ही मोठी आश्चर्याची गोष्ट आहे. "

" नाहीं उपनायक ! उत्तम प्रकृती व मेहनतीची संवय असली म्हणजे मनुष्य म्हातारपणापर्यंत आपलं शरीर कार्यक्षम ठेवूं शकतो. "

आम्ही घरीं पोचलों तोंच काकी वाट पहात असलेली दिसली. ती लगेच म्हणाली—

" बाळ सिंह ! चल, कांहीं तरी खाऊन घे. "

मी— " म्हणजे काकी, सारी रात्र काय तूं वाटच पहात राहिलीस ? "

काकी— " नाहीं बाळ, मी कालींच्या मुलाला तुम्ही येतांच मला उठव असं सांगून घाटावर झोंपायला सांगितलं होतं. त्यानं उठवल्यावर उठल्ये ! "

मी— " पण वाटेंत आम्ही खूप खाल्लं आहे काकी. एका ठिकाणीं भाजलेले मासे होते. "

काकी— " त्यात काय मोठंसं ? गंगाकांठीं राहाणारांना माशांना काय तोटा ? बरं तर थोडं थोडं दूधच ध्या. कढत राहावं म्हणून चुलीवरच ठेवलं आहे "

काकी इतक्या रात्री उठून आली याबद्दल तिची कदर करायलाच हवी. म्हणून एक एक कटोरा गरम दूध प्यायचें आम्ही कबूल केले. नाही तरी लिच्छवींना दूध तर पाण्या इतके मुबलक मिळतेच.

दुसऱ्या दिवशी रोहणकाका व त्यांच्या हेराचे नायक यांच्याबरोबर शत्रूच्या हालचालींसंबंधी माहीती मिळवण्यात सर्व दिवस घालवला. युद्ध केव्हा सुरूं करावे हें मगध राजानें अजून नक्की ठरवलेले नाहीं हें त्यावरून कळले. त्या रात्री आम्ही गंगेच्या खालच्या अंगाकडील दुर्गाची पहाणी करण्यास निघालो.. गंगा व बल्गुमुदा [ बागमती ] यांचा संगम येथून पुष्कळच लांब आहे म्हणजे हा एका रात्रीत संपणारा प्रवास नव्हेच. रात्री आम्ही नावेतून प्रवास करून दिवसा एखाद्या दुर्गात मुक्काम करीत असूं व रात्री पाहिलेल्या गोष्टीची नोद ठेवीत असूं. तिसऱ्या दिवशीं आम्ही बल्गुमुदा नदीच्या संगमावर पोंचलों.

सर्व पाहून आल्यावर मी व कपिल आम्हां दोघांना लिच्छवि सैनिक व त्यांचे सेनानी यांची सावधगिरी व शिस्त पाहून संतोष झाला. त्यांना तक्षशिलेची कांहीं नवी नवी रणचातुरी–विशेषतः नदीयुद्धासंबंधांतील–शिकविण्याची आवश्यकता होती. त्या करता सेनानींना उल्काचेलला बोलावून घ्यावें हेच आम्हांला योग्य वाटलें. पण त्याच्या अगोदर महीचे दुर्ग पहाणें जरूरीचे होते.

सेनानायक रोहण आतां वैशालीला जाणार होते. त्यांना मी भामा व रोहिणी यांना उत्साहित करीत रहा असे म्हटले तर ते म्हणाले—" मन लागत नसेल तर कुठलंहि काम वरवर करण्यापेक्षां न केलेलं बरं. मी लिच्छवि स्त्रीसेनेच्या संबंधीं नुसता उत्साहच वाढवून थांबणार नाहीं तर त्यांत त्यांना हर प्रकारची मदतच करीन.

भामा व रोहिणी यांना या कामांत मदत करतां येईल अशाच तयारीनं मी वैशालींत राहीन. वैद्य अग्निवेश यांना चिकित्सा-विभागांत सामील होण्याबद्दल मी प्रोत्साहित करीन. त्यांत मला हमखास यश येईल असं वाटतं. वज्जीच्या आगामी विजयात लिच्छवि स्त्रियांचा मोठा स्पृहणीय वांटा राहील."

अगदीं निघायच्या वेळी काकी म्हणाली—"बाळ, रोहिणी नसल्यामुळं तुला फार त्रास होईल नाही? तूं म्हणत असलास तर भामाला पाठवून देईन."

मी—"काकी, शिपाई माणसानं हर तऱ्हेचा त्रास सोसायला तयार राहिलं पाहिजे. आतां तर मी तरुणच आहे. अन् शिवाय जिथं इतके सैनिक अन् सेनानी आहेत, तिथं मला त्रास कसला? पण हो, कालीचा मुलगा शुक याला ठेवून गेलीस तर बरं होईल. म्हणजे मला माझ्या घोड्याची काळजी नको. पोरगा हुशार दिसतोय. इतरहि कामाला त्याचा उपयोग होईल."

काकी शुकाला ठेवून गेली.

आता त्या एवढ्या मोठ्या घरात मी, कपिल व शुक अशी तीनच माणसे राहिलों.

दुसऱ्या दिवशी आम्ही नावेतून मही नदीकडे रवाना झालो. दीर्घवाह येथील संगमाच्या वरच्या बाजूला प्रवाहाचा जोर जास्त होता. म्हणून नावेला दोरीने ओढून न्यावे लागले. महीच्या पूर्वेचा किनारा म्हणजे हिरवेगार गवताचें मैदानच आहे. तेथे गवळ्याच्या हजारो गाई चरत असतात. एक दिवस आम्ही एका गौळीवाड्यात गेलो. माणसांना राहण्यासाठी तेथे लहान लहान झोपड्या होत्या. त्यांत दुधाला विरजण लावणें, लोणी काढणें, वगैरेंची व्यवस्था होती. त्या गवळी लोकांत लिच्छवि व अ-लिच्छवि असे दोन्ही तऱ्हेचे लोक आहेत. सगळ्या वज्जीभूमीशी युद्ध करायला सजलेल्या मगधराजाला ते शिव्यांची लाखोली वहात होते.

मही-तटावरच्या दुर्गाची पहाणी करण्यास आम्हाला चार दिवस लागले. आम्हीं शंतनु व त्याचे आठ जोडीदार याना त्या दुर्गावर नेमले. त्यानी नाविकांना खास शिक्षण देण्याचे काम आपल्या हाती घेतले. नंतर मी उल्काचेलला कपिल बरोबर निघून आलो. तेथून कपिल गेला वैशालीला नावांमध्ये कांहीं युद्धोपयोगी सुधारणाचे प्रयोग करण्यासाठी. मी आपले सेनानी नदी-युद्धाच्या कांही रीती शिकवण्यासाठी मजकडे बोलावून घेतले. त्यात आठ दिवस निघून गेले.

शिक्षण संपले त्याच दिवशी सेनापति सुमन येऊन पोचले. मी केलेले दुर्गनिरीक्षण व युद्धाच्या नव्या पद्धती या विषयांवर माझें त्याच्याशी बोलणे झाले. पूर्वेच्या सरहद्दीवरील सैन्याला देखील या नव्या पद्धती शिकवाव्या असे त्यांनीं आपलें मत दिलें. त्या कामाकरतां मी शंतनूला पाठवण्याचे ठरवले. सेनापतींच्या सांगण्यावरून हेहि कळले की लिच्छवि स्त्रियाचे सैनिक-शिक्षण मोठ्या जोरांत

चाललें आहे. सेनानायक रोहणकाका या बाबतींत खूपच तत्परता दाखवीत आहेत. वैद्य अग्निवेश व त्यांचे पन्नासांवर शिष्य आमच्या सैनिक-चिकित्सा विभागांत सामील झाले आहेत. जखमांना मलमपट्ट्या कशा बांधायच्या वगैरे गोष्टी ते स्त्रियांना शिकवीत आहेत. त्यांना गणाची सैनिक स्थिती पाहून आनंद वाटला असें त्यांच्या बोलण्यावरून समजून आलें.

मी गुप्तहेरांची संख्या वाढवली होती. शोण व गंगा यांच्या किनाऱ्यावर शत्रु आणखी काय काय नवनवी युद्धतयारी करीत आहे याबद्दल मला माहिती पाहिजे होती. तसेंच पाच पर्वतांमध्यें असलेली मगध-राजधानी राजगृह व तिच्याकडे जाणारे रस्ते यांच्या संरक्षणाचा बंदोबस्त काय केलेला आहे, हेंहि मला कळायला हवें होतें; त्याकरतां मी कांहीं सेनानींना व इतर चतुर माणसांना परिव्राजक, निगंठ [ जैन-साधू ] आजीवक, भिक्षु इत्यादि वेषांत व कांहींना व्यापारी व ज्योतिषीहि बनवून पाठवलें होतें. त्यांच्याकडून कळलें कीं राजा बिंबिसार राजधानीच्या दुर्गाचीहि दुरुस्ती करीत आहे. गंगेच्या तीरापासून तेथपर्यंतच्या मार्गावर त्यानें कित्येक ठिकाणीं सैनिकाचे मोर्चे बांधले आहेत. विशेषतः नालंदा, अंबलष्टिका [ सिलाव ] या-ठिकाणांच्या दोन योजनें भूमीवर ज्यास्तच जोराचा बंदोबस्त आहे याचा अर्थ असा की लिच्छवि यावेळीं राजगृहापर्यंतहि मजल तर मारणार नाहीत ना अशी बिंबिसाराला धास्ती वाटते. मगध-सेनेच्या गुप्त मसलतींसंबंधांत असें समजलें कीं तिचे सेनापति व सेना-नायक हे जुन्या विचाराचे लोक आहेत. त्यांच्यांत सर्वच जण एकमेकांना कमी प्रतीचे समजतात. त्यांची आपसातील भांडणे मिटवण्याकरता वर्षकार महामात्य यांना खूपच खटपट करावी लागते. राजा बिंबिसार सर्वच बाबतीत आपल्या मुलाच्या हातांतील बाहुले झाला आहे असें वाटत नाही. पण वज्जीभूमीवरील आक्रमणाच्या बाबतींत मात्र तो पुत्राच्या विचारांनीच प्रभावित झाला आहे. तो म्हणतो—" माझे किती दिवस राहिले आहेत ? नंतर अजातशत्रूलाच राज्य संभाळायचं आहे. " असें असू-नहि बिंबिसारला या युद्धांत काही विशेष आशा वाटत नाही. अजातशत्रु हा चतुर तरुण आहे यांत शंका नाही. पण तो अतिशय अभिमानी व हट्टी आहे. तो युद्ध, राजनीति या सगळ्या बाबतीत स्वतःला सर्वज्ञ समजतो. अन् ही त्याची समजूत चुकीची आहे. राजनीतीत तो वर्षकारचा योग्य शिष्य आहे. ब्राह्मण वर्षकारचा आपल्या शिष्यावर पूर्ण भरोसा आहे त्यांत शंका नाहीं. त्याची राजपुत्राला अशी शिकवण आहे कीं मगधानें आता आपलें राज्य व बलविस्तार वाढवण्याकरतां हत्यारा-पेक्षां कूटनीतीवर अधिक भर दिला पाहिजे. पुढें संधि मिळाल्यावर मगध आपल्या तलवारीच्या बळावरहि यशस्वी होईल. ब्राह्मण वर्षकार लिच्छवींची शक्ती जाणून आहे. म्हणूनच त्याचें म्हणणें असें होतें कीं प्रथम कोसल राज्य मगधराज्यांत सामील

करायचें. त्याला वाटतें ते अगदी सोपे आहे; कारण त्याच्या मतें काशीवासी अजू-नहि आपले स्वातंत्र्य हरण करणाऱ्या कोसलांचा तिरस्कार करतात. ती घृणा दूर करण्यासाठी प्रसेनजित्नें आपला सख्खा भाऊ काशीराज म्हणून वाराणशीत ठेवला आहे; पण ही एक आपली थट्टाच आहे असे काशीवासी समजतात. वर्षकारच्या मतें कोसल राज्याच्या काशी प्रांतावर आपण हल्ला केला तर तेथे खात्रीने यश मिळेल; कारण तेथील प्रजा प्रसेनजित्ला न मिळतां मगधाना सहाय्य करील व काशीच्या जनपदाची संपत्ति आपल्या हातीं येईलच. अशा रीतीने अंग मगध व काशीचे संयुक्त धन जन-बल याच्या मदतीनें विस्तृत कोसल जनपद आत्मसात करायला वेळ लागणार नाही. परंतु याहि गोष्टी मान्य करायला राजा बिंबिसार काही केल्या तयार होईना. तो आपला मेहुणा प्रसेनजित् याच्याशी गाढ मैत्री राखून आहे. लिच्छवी-बरोबर युद्ध करण्याचे बाबतीत बिंबिसारने जी संमति दिली तिचे एक कारण असेहि आहे की याच्या योगाने प्रसेनजित्बरोबर तरी लढाई करावी लागणार नाही.

आमचे नवे हेरमंडळ मोठ्या तत्परतेने आपले काम करीत होते. त्याच्यांत एक नन्दक नावाचा जैन धर्मावर मोठी श्रद्धा असणारा असा हेर होता. त्याने एक दिवस आपले गुरु निगंठ ज्ञातृपुत्र [ वर्धमान महावीर ] याची मोठी प्रशंसा केली. मी एक दोन वेळा निगंठ ज्ञातृपुत्र याच्या विषयी ऐकले होते, पण त्यावेळी मला त्यात काही विशेष वाटले नाही पण यावेळी नंदकने सांगितले की हल्ली ते उल्काचेलच्या बाहेर एका बागेत विहार करून राहिले आहेत. या बातमीनें त्यांच्या दर्शनाची उत्कट इच्छा माझ्या मनांत जागृत झाली.

तीर्थंकर निगंठ ज्ञातृपुत्र आपल्या बऱ्याच शिष्य मंडळी समवेत उतरले होते त्या बागेंत मी संध्याकाळचे वेळी नन्दकाबरोबर गेलो त्याच्या शिष्यात सौम्य व गौरमुखवाले बहुतेक नव्हतेच. ते सर्व अगदी नग्न होते, त्यामुळे त्यांना पहाताच मला चमत्कारिक वाटलें. मी तीर्थंकराच्या दर्शनाला आलों आहे असे कळताच आम्हांला एका निगंठानें एका झाडापर्यंत पोचवले. त्या झाडाखाली निगंठ ज्ञातृ-पुत्र जमिनीवर खालीं मान घालून चिंतामग्न स्थितीत बसले होते. त्याच्या लहान लहान मिशांचे केंस पांढरे होते व शरीरावरहि म्हातारपणाचीं लक्षणे दिसत होतीं. तरी देखील त्याचे गौर व तेजस्वी शरीर पाहून मन आकर्षित झाल्या-शिवाय राहात नव्हते. आमच्या पावलाची चाहूल ऐकून त्यानीं मान वर करून माझ्याकडे पाहिलें. " ज्ञातृपुत्र सिंह ! ये बैस ! " असें म्हणून त्यांनीं माझें स्वागत केलें. मला त्यावेळीं खरोखर ते सर्वज्ञ व सर्वदर्शी आहेत असे वाटलें. नाही-तर त्यांना न सांगतां त्यांनीं माझे कुळ व नांव कसे सांगितलें ? मी त्यांना वंदन करून एका बाजूला बसलो व म्हटलें--

" भगवान् ! आपण मला ओळखतां ? "

महावीर--" ओळखतो तर ! सिंह, तूं आमच्या ज्ञातृकुळांतील योद्धा आहेस. तुझा पिता अर्जुन यांच्याशी माझी चांगलीच ओळख होती. ते माझ्याहून बरेच लहान होते. "

त्यांच्या बोलण्यांत फारच साधेपणा होता. पण त्याच बरोबर त्यांत पुष्कळ माधुर्यहि होते. त्यांच्या विषयीं ऐकलेल्या गोष्टींवरून माझे त्यांच्या विषयीं झालेले वाईट ग्रह हळूं हळूं नष्ट होत आहेत असें मला वाटलें. ते माझ्याशीं फारच थोडे बोलले अन् तेहि मधे मधें बराच वेळ थांबून. पण ते गप्प बसत त्यवेळीं त्याच्या विशाल पिंगल नेत्रातून अखंड करुणेचा वर्षाव होत आहे असे वाटे. त्याच वेळी माझ्या लक्षात आले कीं निगंठ ज्ञातृपुत्र हे करुणा धर्माचे महान् प्रचारक आहेत. खरोखर त्यांच्या प्रत्येक अवयवावर करुणेची चमक होती; विशेषतः चेहऱ्यावर तर जास्तच. माझी खात्री झाली की हे जे कांहीं बोलतात ते त्यांच्या अंतःकरणापासून निघालेले आहे. ते एकाएकी चटकन उठून म्हणाले-- " सिंह, चल त्या झाडाखाली जाऊं. " एका हातांत मोरपिसाचा पंखा व दुसऱ्या हाताने जवळच पडलेला कापडाचा लहान तुकडा तोंडापुढे अडकवून ते निघाले. तेथे गेल्यावर त्यांनी कोमल मोरपिसांनी जमीन झाडून कृमि-रहित केली. नंतर मला बसण्यास सांगून आपणही बसले.

मी जीवनाचा पक्षपाती आहे. जीवन हे पाषाणमय तटामधून वेगानें वहाणाऱ्या महासिंधूच्या धारेप्रमाणे कल्लोल व कलरव आवाज करीत पुढे जात असतें. त्यात निरंतर हास, मान आणि आवेग असतो, पण मी इथे जें जीवन पहात होतो तें गतिशून्य, प्रशांत आणि अथाह असे होते. दोन्ही जीवनात श्रेष्ठ कोणते हें ठरवणें ही त्यावेळी तरी माझ्या शक्तीबाहेरची गोष्ट होती. तरीहि काही शंका माझ्या मनांत उत्पन्न होऊ लागल्याच. बराच वेळ मूक अवलोकन केल्यावर मी विचारलें—

" आपण मनःशुद्धीचं शिक्षण देतां, मग शरीर शुद्धीला विरोध कां करतां ? "

महावीर—" तूं माझ्या शरीरावरील मळ पाहूनच म्हणतोस ना ? "

मी—" हो. आपलं हें सुंदर गोरंपान लिच्छवि शरीर, अन् त्यावर बसलेलीं मळाचीं पुटं. "

महावीर—" सिंह ! शरीर हें मलमय असतं. कितीहि शुद्ध केलं तरी ते अंतर्बाह्य अधिकच मलीन राहील. पण म्हणून तें मुळींच धुवूं नये असं मी म्हणत नाहीं. पण माझं म्हणणं इतकंच आहे कीं तें धुणं ही एका माणसाची हौसेची गोष्ट होईल, पण तेंच जीवनासाठी आसावलेल्या हजारों प्राण्यांच्या मृत्यूला कारण होईल.

तेव्हां आपण ही सावधगिरी ठेवली पाहिजे कीं आपल्या यत्किंचित् हौसेपायीं आपण दुसऱ्यांच्या मरणाचे धनी होऊं नये. ”

मी—“ तर मग आपल्याला हिंसा पूर्णतया टाळतां येणं शक्य आहे ? ”

महावीर—“ पूर्ण प्रयत्नाअंतीं जितकी जास्तींत जास्त हिंसा आपण टाळूं, तीच पूर्ण अहिंसा आहे. ”

त्यावेळीं माझ्या सैनिक कर्तव्याची गोष्ट माझ्या मनांत आली. मी विचारलें—

“ आपण हिंसा टाळण्यासाठी शक्तीप्रमाणं जास्तींत जास्त प्रयत्न करण्याची गोष्ट सांगतां आहात ना ? ”

महावीर—“ होय, पण तूं आपल्या सैनिक कर्तव्या विषयीं दुग्ध्यांत पडला असशील, होय ना ? ”

मी—“ होय भगवान् ! आपण बरोबर ओळखलं. ”

महावीर—“ कोणत्याहि गोष्टीवर एकान्तिक विश्वास ठेवा असं ज्ञातृपुत्र सांगत नाहींत. कारण हरएक गोष्ट एकान्तिक स्वरूपांत असतच नाहीं, तिचं स्वरूप संमिश्रच असतं, म्हणून अहिंसा देखील एकान्तिक शुद्ध रूपांत सांगतांहि येत नाही व पाळतांहि येत नाहीं. म्हणूनच मी अशी आशा मुळीच बाळगत नाही की सगळे निगंठ–श्रावक [ जैन ] एकान्तिक अहिंसक व्हावेत. पण प्रत्येक माणसाचा प्रयत्न प्राणिमात्रावर करुणा करण्याच्या दिशेनंच जरूर झाला पाहिजे. सिंह ! तुला सुद्धा आपलं सैनिक–कर्तव्य पालन करीत असतांना असा प्रयत्न करता येईल मांसाहार केलाच पाहिजे असं तुझं सैनिक–कर्तव्य म्हणणार नाही. तूं मनात आणलंस तर तुला तो सोडता येणार नाही का ? मृगया केलीच पाहिजे असा सैनिक–कर्तव्याचा आग्रह नाही. तेहि जर तूं मनात आणलंस तर ती तुला सोडता नाही येणार ? निगंठ साधूंच्या जीवन–चर्येचं एक राहो. प्रत्येक गृहस्थाला ती पालन करतां येण्यासारखी नाहीं, हे मला मान्य आहे. तरीहि मनुष्य आपल्या भोंवतीं प्राणि–दयेचे श्यामल मेघ बरेच लाब पर्यंत पसरवूं शकेल. सिंह ज्ञातृपुत्र ! मी आज पंचवीस वर्षं हाच उद्योग करीत आहे. ”

इतके बोलून निगंठ ज्ञातृपुत्र गप्प बसले. मी त्यांच्या शांत चेहऱ्याकडे पहात होतों; पण माझ्या मनांत अशान्तीचा समुद्र खळबळत होता. असे वाटले की मर्मस्थानी कोणी तरी तीर मारला. करुणा–प्रसाराकरितां मी जितका प्रयत्न करूं शकलों असतों तितका मी कधीच केला नाहीं हें या वेळीं माझ्या चटकन् लक्षांत आलें. इतकेच नाहीं तर उलट मी करुणेला–दयेला–इतकें महत्वच दिलें नाही. अन् शिवाय श्रमण महावीरांनी मला कोणत्याहि प्रकारें सैनिक–कर्तव्यापासून विमुख व्हायला सांगितलें नाहीं. श्रमण महावीर आमच्या भावना पूर्णपणे ओळखून आहेत. त्यांनीं

थोड्याच शब्दांत जीवन-पथाची संपूर्ण आलोचना करून दिली. मधून मधून माझें लक्ष त्यांच्या करुणापूर्ण पिंगल नेत्रांकडे जात होतें. अन् त्यावेळीं माझ्या सर्व शंकांच्या डगरी धडाधड कोसळून पडत होत्या.

मी त्यांच्या समोर बसून बराच वेळ विचार करीत होतों. शेवटीं मी असा निष्कर्ष काढला : श्रमण महावीर तेंच सांगत आहेत कीं जें मनुष्य या नात्यानें आम्हीं करायला हवें. माझ्या सर्व शंका नष्ट झाल्या असें नाहीं मी म्हणत; पण माझ्या मनांत त्यांचा अभाव मात्र जरूर जाणवला. नंतर करुणे संबंधीं विचार करतांना मी जो निष्कर्ष काढला तो व्यवहारांत आणण्याचा मीं बेत केला. या बाबतींत काय काय अडचणी आहेत त्याहि मला समजत होत्या. हा सगळा विचार केल्यावर मला कळून चुकलें की हा निष्कर्ष अमलांत आणण्यांत मी यशस्वी होईनच; पण केव्हां ? पावलों पावलीं माझ्यावर बंधनें राहतील तेव्हाच. अन् बंधनें घालून घ्यायची म्हणजे मी स्वतःला श्रमण महावीर यांचा गृहस्थ-शिष्य असें जाहीरपणें म्हणवून घेतलें पाहिजे. म्हणजेच मला " मांसाहार मृगया इत्यादि करताहि हिंसा करणार नाहीं " असें म्हणतां येईल. शेवटीं मी मौनभंग करून म्हटलें—

" भगवान् ! मी आपल्या उपदेशानं संतुष्ट झालों आहे. आपण मला योग्य मार्ग दाखवला. आज पासून मी आपला गृहस्थ-शिष्य झालों आहे. "

श्रमण महावीरांनीं मला धन्यवाद दिले. नंदक खुष झाला, व आम्ही दोघे घरीं परत आलो.

कपिल गेल्यापासून मी व शुक दोघेच घरांत होतों. तसे पाहिलें तर सैनिक, सेनानी, हेर व इतरहि पुष्कळ लोक जाऊन येऊन असत, पण त्यांना घरांतले कसे म्हणायचे ? मी त्याच दिवशी शुकाला सांगितलें कीं माझे जेवण तूं स्वतः तयार कर. त्यांत मांस मासे वगैरे बिलकुल घालूं नकोस. रस्त्यानें चालतांना उंच सखलाचा विचारहि न करणारा मी आतां पावला पावला गणिक जमिनीकडे पाही; किडा मुंगी यांना वांचवून चालण्याचा प्रयत्न करी. स्नान वगैरे सोडलें नव्हतें पण त्यासाठीं कमींत कमी पाणी वापरीत असे. रोहिणी यावेळी घरांत नव्हती म्हणून मला किती आनंद वाटला. कारण नाहींतर या सुरवातीच्या वेळीं निगंठ-व्रत पाळतांना फार त्रास झाला असता. मीं शुकाला सक्त ताकीद दिली होती की माझे व्रत षट्कर्णी करूं नको. हेहि एक सुदैवच म्हणायचे की मला त्या दिवसांत फार लांबवर प्रवास करायचा नव्हता; सर्वजण आपापल्या कामांत मग्न होते; वैशालीहून कोणी आप्त-मित्रहि एवढ्यांत यायचा संभव नव्हता.

मी श्रमण महावीर यांजकडे आणखीहि गेलों असतों पण ते दुसऱ्याच दिवशीं उल्काचेलहून निघून गेले होते. इतर निगंठ मजकडे येत असत पण माझ्या मनांत

स्वतःबद्दल श्रद्धा उत्पन्न करण्या इतके ते सामर्थ्यवान नव्हते. मी शुकाला सांगून ठेवलें होतें कीं कोणी निगंठ ( जैन साधू ) घरीं आल्यास त्याला खाऊं पिऊं घालून त्याचा आदर सत्कार कर.

## ( २० )

# मगधांशीं युद्ध व विजय

हिंवाळा संपला. वसंत ऋतुहि येऊन गेला. आता ग्रीष्म ऋतु चालू होता. हा तीन महिन्यांचा अवसर देऊन बिंबिसारनें स्वतःचे भले केले नाही. कपिलने आपल्या अर्ध्या नावांना एक तऱ्हेचें लोहकवच बसविलें इतकेंच नव्हे तर प्रहार करण्यासाठीं बहुतेक सर्वांना तीक्ष्ण अशीं शिंगे लावलीं. आणखीहि बऱ्याच सुधारणा केल्या होत्या. कपिल व त्यांचे सवंगडी यानी नाविक व नौ–सैनिक याच्या शिक्षणाकडे विशेष लक्ष दिलें होते.

हेरानीं आणलेल्या बातमीवरून असे कळले कीं मगधराजाची तयारी थोडेच दिवसांत पूर्ण होईल, त्यानंतर ते चढाई करणार आहेत. आमची तयारी पूर्ण झाली होती व आम्हीच प्रथम आक्रमण करायचे हें निश्चित ठरले होते. आता दुपारचे वेळीं चांगलाच उन्हाळा भासूं लागला होता. पण उन्हाळ्यांत युद्ध टाळणें आमच्या हातांतील गोष्ट नव्हती.

मला वेळोवेळी बातम्या मिळत. मी त्या सेनापति व गण-पति यांना वरचेवर पाठवी. एक दिवस सेनापतीकडून एक मनुष्य आला व त्याने सेनापतींनी मला ताबडतोब वैशालीला बोलावलें आहे असें सांगितले. माझे उपनायक अमरू, आतां तीन महिन्यांपूर्वींचे अमरू राहिले नव्हते. त्यांनीं तक्षशिलेच्या ताज्या नव्या युद्ध-ज्ञानाचा फायदा उचलला होता. ही अशी वेळ होती कीं रोजच्या रोजच काय, क्षणा-क्षणाला शत्रूच्या हालचालींची वार्ता आम्हांला कळायलाच हवी. आणि मी या बाबतींत अमरूवर पूर्ण विश्वास ठेवूं शकत होतों.

मी फक्त एक दिवस व दोन रात्री वैशालींत राहिलों. त्यांपैकीं बहुतेक वेळ युद्ध-परिषद व अमात्य-परिषद यांच्या बरोबर सल्ला मसलत करण्यांत गेला. युद्ध-परिषद माझ्या मताशीं सहमत होती पण अमात्य-परिषदे पैकीं कांहीं अमात्य आपण चढाई करूं नये व उन्हाळा जाऊं द्यावा या मताचे होते. पण मी व सेनापतींनीं सर्व

परिस्थिती समजावून सांगितली. मी हेंहि सांगितलें कीं बिंबिसारची सर्व आशा आपल्या हत्तींच्या जिवावर आहे, आणि जर त्यांना गंगेच्या या तीरावर हत्ती आणतां आले तर मात्र आमच्या अडचणी आणखी वाढतील. कारण आमच्या जवळ इतके हत्ती नाहींत. शेवटी गणाने युद्ध लौकर सुरू करण्याचा ठराव केला, व दिवस, तास वगैरे ठरवणे मी व सेनापति याचेवर सोपविलें.

आमच्या घराला रोहिणीनें फौजी छावणीचें रूप आणलें होतें. भामा व रोहिणी यांनीं वज्जींत तीस हजार व वैशालीत वीस हजार स्त्री-सेना संघटित केली होती. तीपैकीं सुमारें एक तृतीयांशांचे शस्त्र-शिक्षण पूर्ण व्हायचें होतें. पण बाकींचें शिक्षण झालें होतें. सर्वांना एक सर्वांत मोठें शिक्षण हे मिळाले होतें कीं त्या स्वतःला लिच्छवि सेनेचाच एक भाग समजत होत्या. म्हातारे अग्निवेश जणुं दहा वर्षांनीं लहान झाले होते. आतां ते अंगावर सुरकुत्या पडलेले वैद्य राहिले नव्हते. ते दुसऱ्यांचा कायाकल्प करीत होते व स्वतः देखील पिकलेल्या आंब्यासारखे होऊं लागले होते. मी त्यांचा चिकित्सा-विभाग पहायला गेलों तेव्हां त्यांनी हत्यारें व औषधे दाखवून म्हटलें--

"सेनानायक ! कोमलांगी स्त्रियांना अशा प्रकारचे कठिण परिश्रम करतांना पाहून माझी मलाच लाज वाटली. मींहि घोड्यावरून आठ-आठ दहा-दहा योजनाचा प्रवास औषधाचा संचय करण्याकरता सुरूं केला. भिन्न भिन्न शस्त्रांचे विषारी घाव ओळखणें, चिकित्सा करणे, रक्तस्राव थाबवणे, पोटांत देण्याच्या औषधांची माहिती करून देणें या गोष्टी विद्यार्थी व मुली याना शिकवण्यांत मी रात्रंदिवस मग्न होतों. एक महिना होत आला आणि माझी भूक वाढूं लागली. माझ्या शरीराचा थंडपणा नाहीसा होऊं लागला. आणि आता या पांढऱ्या केसांमुळं मला कोणी म्हातारा खुशाल म्हणो, पण मला तसं वाटत नाही व माझ्या या मताशीं ब्राह्मणीहि सहमत आहे.

"युद्ध ज्या दिवशीं सुरू होईल त्या दिवशी कित्येक परिचारिकांना घेऊन मी उल्काचेलला हजर राहीन. कारण जखमेची चिकित्सा जितकी लौकर होईल तितकी ती लौकर बरी होते." सामान व कांहीं माणसे आतां पुढें पाठवावीत; बाकी निश्चित दिवसासंबंधीं नंतर मी एक रात्र आधीं सूचना देईन असें मी अग्निवेश वैद्यांना सांगितलें.

भामा व रोहिणी यांना मी त्यांच्या यशस्वी कामगिरीबद्दल धन्यवाद देत असतां भामानें एकदम उठून म्हटलें—

"पण भाऊजी ! मला कांहीं तुम्हांला धन्यवाद देतां येणार नाहींत."

"का बरं वहिनी ? सिंहाच्या हातून असा अपराध तरी कोणता झाला सांग ना ?"

भामा—“ फार मोठा अपराध केला आहांत. ”

मी—“ फार मोठा ? ”

भामा—“ होय ! तुम्ही नंगटांचे शिष्य कां बनलांत ? ”

मी—“ भगवान् महावीर निगंठ ज्ञातृपुत्र यांच्या धर्मावर माझी श्रद्धा बसली म्हणून का तू म्हणतेस ? ”

भामा—“ होय, तेच. ”

मी—“ पण मी महावीरांचं प्रत्यक्ष दर्शन घेतलं. त्यांच्या तोंडून उपदेश ऐकला आणि तो मला पटलाहि. ”

भामा—“ मग सेनानायकाचं कर्तव्य तुम्ही कसं पार पाडणार तेंच कळत नाहीं. ”

मी—“ त्यांनीं मला कर्तव्य-पालनाला मनाई नाहीं केली. ”

भामा—“ अस्सं ! हें तरी काय थोडं झालं ? ”

मी—“ जर तसं नसत तर माझी श्रद्धा त्यांच्यावर बसली नसती. कारण गणा-करतां युद्ध करणं हे मी माझं सर्वात मोठं कर्तव्य समजतों. ”

रोहिणी—“ पण आर्यपुत्र, तुम्ही म्हणे मास मच्छी खाणं सोडून दिलं आहे. खरं का ? ”

मी—“ कारण मी स्वतःच्या हृदयांत करुणेचा विस्तार करूं इच्छितों. दूध, लोणी, गूळ, इत्यादि पुष्कळ स्वादिष्ट वस्तु आहेत व त्या खाऊन मी जिवंत राहून बलिष्ठ होऊं शकतो. ”

भामा—“ म्हणजे भाऊजी ! तुम्ही रोहिणीलाहि त्या नंगटांची चेली बनवूं इच्छिता कीं काय ? असं असेल तर माझ्याशी भाडण होईल; पहा सांगून ठेवते. ”

मी—“ वहिनी ! बिंबिसार खेरीज मी या वेळी कोणाशींच भांडायला तयार नाहीं. ”

भामा—“ आता या मुद्यावर आपली एकजूट आहे. मग लढाई संपल्यावर पाहीन, तुम्ही किती दिवस त्या जोगड्या निगंठांच्या फेऱ्यांत सांपडून राहतां तें.”

रोहिणी—“ पण आर्यपुत्र ! मी तर रोजच मांस खात्यें. मग तुम्ही माझ्या ओठांचं चुंबन घ्यायला अनमान तर नाहीं ना करणार ? ”

मी—“ प्रिये ! बाकीच्या सर्व गोष्टी सध्यां तरी पूर्ववतच राहतील. ”

आईला, सोमाला व काकींना भेटलों. आई व काकी दोघीहि आचार्य अग्नि-वेश यांजकडे शिक्षण घेत होत्या. वैद्यराजांचे बरोबर आम्हीहि उल्काचेलला येणार असें त्या सांगत होत्या. ”

मी उल्काचेलला परत आलों तेव्हां मगधा कडील बातम्या विशेष भयावह येत होत्या. राजगृहापासून गंगा किनाऱ्या पर्यंतचा रस्ता म्हणे सैन्यानें गजबजलेला होता. हत्तींची जमवाजमव गंगातटीं खूप जोरांत चालू होती. आतां जास्त वेळ थांबण्यांत अर्थ नाहीं हें मला कळून चुकलें.

दुसऱ्या दिवशीं वज्जीच्या एका नागरिकाचे व मगध सैनिकाचे पाटलिग्रामाच्या घाटावर भांडण झाले. सैनिकानें त्याला धक्का दिला तेव्हां तो मनुष्य पाय घसरून जवळच्या अथांग पाण्यांत पडून मेला. मला हें कळतांच मीं त्यावेळीं उल्काचेल मुक्कामीं हजर असलेल्या सेनापतीशी विचार विनिमय केला. आणि त्याचवेळीं घोड्याशा टपालाने अशी सूचना वैशालीला पाठवून दिली कीं आज पहांटे युद्धारंभ करा. आणि थोडी रात्र असतांनाच आमची फौज–पायदळ, स्वार वगैरे नावांतून घालून गंगापार करून ठिकठिकाणी गुपचुपपणे उतरवून ठेवले. ही फौज किनाऱ्यावर उतरतांच तिच्या एका भागानें जमिनी वरून व आमच्या नौ–सेनेने नदीच्या मार्गानें असा मगधांच्या नौ–सेनेवर एकदम हल्ला केला. चहूंकडून घेरलेले मगध नौ–सैनिक घाबरून गेले. त्यांनीं एकवेळ खूप जोर दाखवला; परंतु ज्ञात शत्रूपेक्षां अज्ञात शत्रु भयंकर असतो. उजाडतां उजाडतां मगधांची नौ–सेना व त्यांच्या बऱ्याचशा नावा नष्ट झाल्या अगर आमच्या हातीं सांपडल्या.

मी गंगेच्या मधोमध नावेंत उभा राहून युद्धाचें संचालन करीत होतों. पाटलिग्राम घाटाच्या आसपासचा गंगातट आम्ही शत्रुशून्य करण्यांत गुंतलों होतों. त्याच वेळीं शोण नदाच्या जंजिऱ्यांतील रणतरी आमचा प्रतिकार करण्यास येऊन पोंचल्या. पण त्यांच्या बरोबरच उपनायक कपिलच्या नावांची एक तुकडी येऊन थडकली. यामुळें आमची संख्या वरचढ होऊन शत्रूच्या नावा आमच्या नावांच्या घेऱ्यांत सांपडल्या. कपिलच्या एका नौका–तुकडीनें शोण नदाकांठच्या नदीदुर्गावर हल्ला चढवला. तेथें फारच थोडे सैनिक शिल्लक होते; कपिलनें हे दुर्ग सर करून त्यांवर लिच्छवि सेनांची शिबंदी ठेवली.

उजाडल्या बरोबर गंगेच्या प्रवाहाच्या खालच्या भागांतून व शोण नदांतून आलेल्या नौ–सेना, त्याचप्रमाणें पाटलिग्रामा नजीक असलेले हत्ती, घोडे, व पायदळ सैन्य या सर्वांनीं मिळून एकदां जोराचा हल्ला केला; परंतु आतां गंगा–तटावर आमचीं पावलें मजबूत रोंवलीं होतीं. लढाई चालू असतांहि आमच्या फौजा जमिनीवर एक सारख्या उतरत होत्या. कपिलच्या शिंगवाल्या नावांनीं तर कमाल करून सोडली. शत्रूच्या नावांवर या नावा भर वेगांत चालून जात होत्या व त्यांच्या मजबूत व तीक्ष्ण शिंगांच्या प्रहारांमुळें चरचर आवाज करीत शत्रूच्या नावा पाहतां पाहतां नदींत बुडून जात होत्या. मागधांनीं हत्तींच्या मदतीनें

गंगा ओलांडून उल्काचेलवर हल्ला करण्याचा विचार केला होता. पण या शिंगवाल्या नावांनीं हत्तींची व मागध सैनिकांची हिम्मत एकदम खचवली.

घाटावर आमचें पुष्कळ सैन्य उतरलें होतें. त्याच्याच बरोबर शोण व गंगा यांच्या खालील बाजूसहि आमचे सैन्य भराभर उतरत होतें परंतु शत्रूच्या नावांचा निकाल लावून आम्ही समोरचा घाट पूर्ण मोकळा करीपर्यंत मला जबरदस्त धास्ती वाटत होती. आणि वरून शत्रूचा जोर वाढत असलेला मला दिसत होता. दोन घटका दिवस वर आला तेव्हां कुठें घाट मोकळा करण्यांत आम्ही यशस्वी झालों. छातींवरचे एक मोठें ओझें उतरल्यासारखें मला वाटलें.

गंगेच्या खालच्या अंगाकडील सैन्याचें नेतृत्व अमरूच्या हाती होतें. व वरच्या म्हणजेच शोण नदाच्या वरच्या भागाचें नेतृत्व होतें कपिलच्या हातीं. मी मधल्या सैन्याच्या पिछाडीला होतों. कपिल व अमरू दोघांनी पहिल्या ठाण्यावरून शत्रु सैन्याच्या डाव्या उजव्या बगलांवर हल्ला सुरू केला. नंतर घाट मोकळा होतांच मी पाटलिग्रामांत लढणाऱ्या आपल्या सैन्याच्या मदतीला ताज्या दमाची फौज घेऊन पोंचलों. मधल्या वेळात शंतनूनें शत्रूच्या बऱ्याचशा नावा एकमेकींना जोडून वासे व गवत घालून पूल बांधायचें काम चालू केलें होतें.

खरें पाहिलें तर पाटलिग्रामाच्या समतल भूमीवर शत्रुसैन्याला पाय रोंवतां आले असते. पण कपिल व अमरू याचे सैन्य शत्रूच्या आघाडीच्या मागें केव्हांच येऊन पोचलें होतें. त्यामुळें त्यांना सर्व आघाडीच मागे घ्यावी लागली. तिसरे प्रहरीं पाटलिग्रामाच्या पिछाडीकडील एक योजन पर्यंतची भूमी आम्ही सर केली. मी पाटलिग्रामांत आमची छावणी उभारली. कपिलच्या सैन्यानें शोण नदीचा उजवा किनारा पुष्कळ लांब पर्यंत नि:शत्रु करून टाकला. संध्याकाळपर्यंत आमच्या व अमरूच्या सेनेसाठीं नावांच्या पुलावरून कुमक येऊं लागली. प्रहरा- प्रहरानें युद्धाच्या प्रगतीच्या सूचना मी डेंगी द्वारा सेनापति सुमन यांना पाठवीत होतों. तसेच माझे उपनायक स्वाराहातीं आपल्या प्रगतीच्या सूचना मला पाठवीत होते. आमचें सारे सैन्य व्यवस्थितपणें आपापल्या जागेवर आपापले काम चोख बजावीत होतें. परंतु शत्रुसेना पहिल्याच दिवशीं पराजय झाल्यानें हवालदिल झालेली होती; आणि याचा फायदा घेऊन आमच्या सैनिक तुकड्या शत्रुसेनेवर लहान लहान छापे घालून गोंधळ माजवीत होत्या.

रात्रीं पाटलिग्रामच्या विजयाबद्दल सेनापति व गण-पति यांचेकडून अभिनंदनपर संदेश आले. आणि दुसरे दिवशीं गणानें माझ्या या यशस्वी कामगिरीबद्दल मला उपसेनापतीची जागा दिली.

आमची सेना पाटलिग्रामांत पोंचली त्यावेळीं बहुतेक घरें रिकामींच होतीं. उल्काचेलमध्यें मिळालेल्या शिक्षणामुळें कोणाहि सैनिकानें येथील प्रजेवर कोणत्याहि तऱ्हेची जुलुम जबरदस्ती केली नाहीं; कुणाचीहि कोणतीहि वस्तु जबरदस्तीनें घेतली नाहीं. आचार्य अग्निवेश यांचें चिकित्सा-शिबिर उल्काचेलला उघडलें होतें. नावांमधून व खाटांवरून जखमी लोकांना तेथें नेण्याचे काम भामाची सेना करीत होती. या जखमी सैनिकांनीं गजबजलेलें युद्ध-क्षेत्र जेव्हां मी बघायला गेलों तेव्हां तिथें मला असे कितीतरी जखमी शत्रुसैनिक दिसले कीं त्यांना स्वतःला तर हालचाल करणे शक्य नव्हतें आणि त्यांची विचारपूस करणारेहि कोणी नव्हते. पाटलिग्रामांतील कांही घरे मी जबरदस्ती न करतां घरमालकांच्या विनवण्या करून व बक्षिसांची लालूच दाखवून रिकामीं करवलीं. नंतर त्या सर्व जखमी लोकाना तेथें आणवलें व आचार्य अग्निवेश यांना त्याची चिकित्सा करण्यास लिहिले. मी हे सर्व स्वतःच्या करुणा-विस्ताराप्रीत्यर्थ केले होतें तरी त्याचा सर्वात जास्त परिणाम पाटलिग्रामाच्या लोकांवर झाला. त्यामुळें जवळच्या जंगलांतून पळून गेलेले लोक त्याच रात्रीं परत आले. कारण त्यांना असें कळले कीं शत्रूचीहि मलमपट्टी आपल्या हातांनीं करणारा हा लिच्छवि तरुण सेनापति दयेचा सागर आहे. मी ग्रामजेठ्ठांना [ प्रमुख लोकांना ] बोलावून धीर देऊन सांगितलें की फक्त जखमी लोकांकरताच तुमची घरें घेतली आहेत व त्यांत बहुतेक तुमचे जखमी मागध बंधूच राहतील, चुकून एखाद्या सैनिकानें तुमच्याशीं वाईट वर्तन केलें तर ताबडतोब आमच्या सेनानायकाना किंवा मला स्वतःला कळवा.

शत्रूनें पहिल्याच सलामीत हार खाल्ली खरी; पण तो आमचा विजय आहे असें आम्हांला म्हणता येण्याजोगें नव्हतें.

रातभर आमची लिच्छवि चतुरंग सेना —पायदळ, घोडे, रथ, हत्ती-गंगापार होऊन मगध तटावर उतरत होती. तिकडे पाटलिग्रामाचे दक्षिणेला तीन योजनांवर शत्रु आपले विखुरलेले सैन्य एकत्र करून व नवी कुमक आणून प्रतिकाराच्या तयारीत होता. रात्री मी व माझे दोन्ही उपनायक—दुसऱ्याच दिवशीं माझ्या शिफारशीवरून त्यांना सेनानायक हें पद मिळणार होते—उल्काचेलला सेनापति सुमन यांजकडे गेलों. युद्धाच्या सर्व परिस्थितीचा विचार करून शेवटीं दुसऱ्या दिवशी सकाळींच चढाई करावी असें आम्ही ठरविले. एक दोन दिवसांत मगधांची तयारी होणें शक्य नाहीं हें आम्ही पूर्ण जाणून होतों. त्याच रात्री आम्ही आपल्या छावणींत परत आलों.

सूर्योदयापूर्वीच आमच्या सैन्याने चढाईला सुरवात केली. अजूनपर्यंत सारी मगध सेना मैदानावर आणतां येणे शक्य झालेलें नव्हतें तरीहि हत्ती व रथ यांचा जमाव फारच मोठा होता. त्यांच्यापुढें आमचे हत्ती व रथ असून नसल्या सारखेच होते.

असो. रथ तर आम्हीं जाणून बुजूनच कमी ठेवले होते. मगधांची लागवडीची जमीन यावेळी जरी रिकामी व कोरडी पडलेली होती तरीहि ती रथांना जाचकच होती. मगधाच्या तुलनेत आमच्या स्वारांची संख्या जास्त होती. पायदळांतहि बरोबरी होती. प्रथम कपिल व अमरू यांच्या फौजानी शत्रूच्या सेनेच्या दोन्ही बगलांवर हल्ला केला, त्यामुळें शत्रूला मध्यभागी असलेले हत्ती काढून बगलेकडे न्यावे लागले. त्याच वेळी माझ्या फौजेने समोरून हल्ला केला. आणखी एक गोष्ट माझ्या लक्षांत आली. इकडे आमची सेना खास ठरविलेल्या योजनेप्रमाणे आपली नेमलेली कामगिरी निर्धाराने करीत होती तर तिकडे शत्रु-सेनेंत कार्यव्यवस्थेचा संपूर्ण अभाव होता. त्याचें एक कारण हेहि होते की, चढाईची सूत्रे आमच्या हातांत होती व त्यांना फक्त बचावाची खटपट करण्याखेरीज काहीच करणे शक्य नव्हतें.

कपिल व अमरू दोघेहि शस्त्रास्त्रांनीं सज्ज होऊन आपापल्या घोड्यांवर स्वार होऊन सैन्याचे संचालन करीत होते दोन्ही सेनानायकाना तक्षशिलेहून आलेले सैधव घोडे मिळाले होते. मागधाचे रथ पिकाच्या वावरात खरोखरच नालायक ठरले. दोन प्रहर पर्यंत आमच्या घोडेस्वारांनी दाखवून दिले की आमचा पाडाव करण्यास रथ अयोग्य आहेत इतकेच नाही तर उलट इतर सैन्याला मात्र त्याच्यामुळे अडथळा उत्पन्न होतो. हो, पण हत्तीचा प्रश्न प्रथमच कठिण वाटला. ते काळ्या पहाडाप्रमाणे आमच्या पुढें पुढे येत. आम्ही समोरून हल्ला केला, पण त्यांच्या रांगा आम्ही मोडूं शकत नाही असे आढळून आलें. नंतर आम्ही त्याच्या दोन्ही बगलांवरहि हल्ला सुरू केला त्यामुळे पिछाडीच्या हत्तीमध्ये गोंधळ उडाला व त्याच्या जोराच्या चीत्काराने इतर हत्तीवर परिणाम झाला. हे जमावाचें युद्ध इतके सोपे नव्हते तरीहि संध्याकाळ पर्यंत आम्ही आपली परिस्थिती पुष्कळच सुधारली. उलट मगध सेनेने सकाळी मिळविलेले यश संध्याकाळपर्यंत अजिबात हातचे घालवून टाकले.

या युद्धांत मागधांची एक मोठी निर्बलता होती. ती म्हणजे धनुर्धारीचा बहुतेक अभाव. आपल्या रथीच्या बाणप्रहारावर त्यांची भिस्त होती तीहि रथांची अडचणच झाल्यामुळे वाया गेली. याच्या उलट आमच्यांतील घोडेस्वार व पायदळहि बाण चालविण्यांत सराईत होते. बाग किंवा वृक्ष वाटेत आले तर आमचे धनुर्धर चटकन झाडावर चढून बाणांचा वर्षाव करीत. मगध-सेनेत आणखी एक उणीव होती. त्यांच्यांतील सैनिकांसाठी कवच, शिरस्त्राण याची पुरेशी व्यवस्था नव्हती. त्यामुळे त्यांना बाण, भाले अगर खड्ग यांच्या प्रहारांपासून आपला बचाव करतां येईना.

दोन प्रहर नंतर शत्रु-सेना एकेक पाऊल मागें हटूं लागली. जखमी व मुडदे यांनीं भरलेल्या परित्यक्त रणक्षेत्रांत, भामाची सेना आपले काम करीत होती. प्रथम खूप घायाळ झालेल्यांना उचलायचें, तहानेल्यांना पाणी पाजायचें, नंतर इतरांकडे पहायचें, असे तिचें काम चालू होतें. मागधी जखमीना औषधपाणी देण्याची व्यवस्था मी याच वेळीं केली.

आज दिवसभर चाललेल्या युद्धांतील आपल्या व शत्रूच्या हानि-लाभाचा विचार करतांना मला असें दिसून आलें कीं, रथांमुळें शत्रूचा कांहींच फायदा होत नाही. हत्तींचा प्रतिकार मात्र अजूनहि आम्हाला जडच होता. पण आमचे घोडे व भाले याना मात्र त्यांचा सराव होत होता. विशेषतः बगलेवर केलेला हल्ला जास्त परिणामकारक होई. मागधी घोडेस्वार मोठ्या हिम्मतीने लढत होते. परतु त्यांची चिलखतें चागली नसल्यामुळें त्यांची जास्त हानी होत होती. पायदळामध्ये तर सकाळ पासूनच आमची सरशी होती. कालच्या प्रमाणेच आजहि हजारो मगध सैनिक कैद केले. दिवस भरांत आम्ही फक्त एकच कोस पुढें सरकलो होतों. यावरून शत्रू त्याच युद्ध क्षेत्रांत अजून लढत आहे हे सिद्धच होतें. तरीहि आता मगधांना मैदानांतहि समोरासमोर लिच्छवि तलवारींचे पाणी चाखण्याची संधी मिळाली. पण ते गोड नव्हते.

आपल्या लढणाऱ्या माणसांना व जनावराना मधून मधून अन्न पाणी कसें पोंचवावे हा एक मोठाच प्रश्न आमच्या पुढे होता. त्याच्याजवळ चामड्याच्या पखालीतून पाणी व पिशव्यांतून भाजलेलें मांस व लाडू होते; पण युद्धाच्या गड-बडींत त्यांना खाण्यापिण्यास वेळ नव्हता. दुसऱ्या दिवशी रात्री अशी बातमी मिळाली कीं, उत्तर-अंग [ अंगुत्तराप ] पासून वज्जीभूमीच्या पूर्व सीमेवर एकत्रित झालेली मागधी सेना फारच कमकुवत ठरली. त्यामुळे एक फायदा झाला. आम्हाला मगध-सेनेशीं फक्त याच मगध-क्षेत्रात लढायचे होतें. आणि यासाठीं फार मोठ्या प्रमाणात लिच्छवि सैन्य नावांच्या पुलावरून गंगा पार होऊन आमच्या पर्यंत येऊन पोंचत होते. सारखी चढाई चालूं ठेवण्यापेक्षां एका मागून एक लाटां-प्रमाणें हल्ले चढवणे बरें असे आम्ही त्या रात्रीं ठरवलें; त्यामुळें नव्या तुकडीशीं शत्रु लढत असतां पहिल्या तुकडीला खाण्यापिण्यास थोडा तरी वेळ मिळेल. आम्ही आक्रमण करीत होतों म्हणून आम्हाला ही सोय करतां येत होती. नाहींतर शत्रूच्या हल्ल्यापासून बचाव करणाऱ्या सेनेला इतका वेळ कुठला मिळायला ?

आमच्या सैन्याला मदत मिळत होती तशीच शत्रू सैन्यालाही मिळत होती. यामुळे तिसऱ्या दिवसाच्या लढाईत शत्रूची संख्या कमी मुळींच नव्हती. तरी-पण आम्हाला शत्रूचे डाव-पेच अगोदरच नीट कळले होते. रात्रीं आमच्या सैन्यानें कांही ठिकाणी छापे घातले पण ते फक्त त्यांना हैराण करण्या पुरतेच होते. दुसऱ्या

देवशीं आम्ही आमची नवनि आलेली ताज्या दमाची सेना प्रथम पुढें पाठ-वली. नंतर शत्रूची थोडी दमछाट झाली तेव्हां कालची अनुभविक व खाऊन पिऊन तयार झालेली सेना येऊन थडकली. अशा तऱ्हेनें लढून आम्ही आपल्या सैनिकांचा सतत दिवसभर लढण्याचा त्रास वाचवून त्यांना मधून मधून विसावा देत होतों इतकेंच नव्हे तर शत्रूचे बळ व हिम्मत कमी करण्यांत देखील यशस्वी होत होतो.

तिसऱ्या दिवसाच्या लढाई नंतर आम्ही पाटलिग्रामापासून चार योजनांवर येऊन पोंचलो. अर्थात दोन दिवसांत फक्त एकच योजन पुढें सरकलों. परंतु इथें किती योजने गेलो हा प्रश्न नसून शत्रु-सेनेचा पूर्ण पराजय करण्याचा प्रश्न होता.

आमची स्त्रीसेना आता अन्नपाणी पोचवणे व जखमी सैनिकाना हालवणें, तसेच संध्याकाळी मुडद्याना मूठमाती देणें या कामा शिवाय रणक्षेत्रात पडलेली शस्त्रास्त्रें जमा करणे हेहि काम करीत होती. भामानें रोहिणीला एक दोन वेळां सांगितले कीं आम्हां स्त्रियानाहि युद्ध-पंक्तीत जाण्याची संधि मिळावी, पण मी त्यांना त्यांच्या आता पर्यंतच्या कामगिरीची जरूरी व महत्व पटवून दिले तेव्हां कुठें तिनें आपला हेका सोडला. शिवाय मी असेहि म्हटले की "वहिनी, आपण सध्यां पुढं चाललो आहोत; पण आपल्याला माघार घ्यावी लागली असती तर तुमच्या सेनेला तलवार उचलण्यासाठी तयार व्हावंच लागलं असतं."

तिसऱ्या दिवशीच्या युद्धांत अपरिमित नुकसान होऊनहि शत्रु मागें हटला नाहीं. आह्माला असें कळलें की, शत्रूनें आपले सर्वात निपुण असलेले योद्धे या दिवशीं रण-मैदानांत पाठवले होते. कुमार अजातशत्रु स्वतः हत्तीवर स्वार होऊन या युद्धात सामील झाला होता. आपल्याला या युद्धात सरळ तरवार चालवायला मिळत नाही याबद्दल मला मनांतून वाईट वाटत होते कित्येक योजनें पसरलेल्या लक्षावधि सेनेचें संचालन करणें हें कामच इतकें अफाट होते की त्यात मी तरवारीचे हात दाखवायला वेळ काढणें कठीणच होतें. पण त्या दिवशीं लढत्या सेनेचें निरीक्षण करीत असतां मला एका असाधारण उंच हत्तीवर चढून लढत असलेला एक योद्धा दिसला. मला वाटले, हा अजातशत्रु तर नसेल? त्याच क्षणीं मी डाव्या उजव्या बाजूंनीं भाला चालवीत आपला घोडा त्या हत्ती-कडे दौडत नेला. माझा घोडा आक्रमण करीत असलेला पाहून लिच्छवि घोडदळ मागधांवर तुटून पडलें. कोणी खड्ग चालवीत होते, कोणी भाला, कोणी परशु, कोणी गदा. हत्ती-जवळ मी पोंचतो तों मागध स्वार व पायदळ याची पांगापाग झाली, आणि मी गजारोहीच्या अगदीं जवळ गेलों. माझ्या भाल्याचे दोन वार त्यानें चुकवले. माहु-तानें हत्तीला माझ्यावर मोहरा करण्याचा इशारा दिला. पण माझा घोडा त्याच्या पेक्षां जास्तच चपळ होता. त्यामुळें दुसऱ्याच क्षणीं मी पाठीमागून हत्तीच्या

दुसऱ्या बगलेकडून भाला चालविला. तो गजारोहीचें कवच फोडून बरोबर मानेंत घुसला. मी भाला खेंचून घेतल्या बरोबर त्याचे शिर लोंबतें राहून तो हौद्यांत कोसळून पडला. त्याच वेळीं एक लिच्छवि तरुण आपल्या घोड्यावर उभा राहून पाल चढावी त्याप्रमाणें हत्तीच्या पाठीवरून सरकत जात असलेला मला दिसला. पहातां पहातां तो माहुताच्या मागें येऊन पोंचला. त्याने चटकन डाव्या हाताने अंकुश हिसकून घेतला. तो घेतांना त्याच्या हाताला जखम होऊन तींतून रक्त वाहूं लागले. पण तिची पर्वा न करतां तो दुसऱ्या हातानें नंगी तलवार दाखवून माहुताला म्हणाला—"हत्ती समोरे चालव." मी त्या तरुणाची चपळाई पाहून गुंगच झालों. पण खरोखरच हत्ती आमच्या छावणी कडे हांकला जात होता तें पाहून मात्र माझ्या आश्चर्याला पारावारच राहिला नाही. आमच्या जवळपास बरेच लाब पर्यंत शत्रु-सेना दिसत नव्हती. याच स्वारांना माझ्या बरोबर चलण्यास सागून मी हत्तीच्या मागोमाग निघालों. त्या लिच्छवि तरुणाचा नुसता घोडाच आमचे मागे येत आहे हें त्यावेळीं माझ्या लक्षांत आलें नाही. छावणींत पोंचतांच त्या तरुणानें माहुताच्या कानात काहीं तरी सागितले. त्याने हत्तीच्या पुढल्या पायांत बाधलेल्या साखळदंडाचे दुसरें टोक सोडून दिले. तरुणानें इशारा केल्यावरून आमच्या एका स्वारानें तो साखळदड एका झाडाला लपेटून बांधला. नंतर तो तरुण पाठीकडच्या बाजूने उडी मारून फुलासारखा अलगद जमिनीवर आला. त्याच वेळी एक रिकामा घोडा तरुणाचें शिरावस्त्रावरणवेष्टित शिर हुंगत असलेला मला दिसला. तरुणानें दुसरीकडे मान फिरवली होती. त्याने माहुताच्या व इतरांच्या मदतीनें त्या गजारोही सैनिकाला खाली आणलें. नंतर माहुतास खाली बोलावलें. माहुत त्या तरुणाचे सर्व हुकूम यंत्रवत् पाळीत होता. माहुतानें हत्तीच्या मागल्या पायातहि काटेरी साखळदंड बाधल्या नंतर तरुणाने माहुताला गंभीर स्वरांत म्हटले--" आता तुला अभय आहे. जा, आमच्या या सेनापतींच्या प्रश्नाची उत्तरं दे. "

यावेळीहि मला त्या तरुणाचा चेहरा नीट दिसूं शकला नाहीं. आणि मी त्याला कांहीं विचारणार होतों इतक्यात माहुताने माझ्याजवळ येऊन सांगितले—" स्वामी! हा मगधराज बिंबिसार यांचा मंगल हत्ती नालागिरी आहे. "

मी- -" महाराजांचा मंगथ हत्ती नालागिरी, अन् मग तो गजारोही ? "

माहुत--" ते मगध सेनापति भद्रिक. त्याना चंड असंहि म्हणतात. "

चंड भद्रिकाचे नाव ऐकतांच माझा आनंद गगनांत मावेना. भद्रिक सेनापति मगधामधील सर्वांत मोठा युद्ध-विशारद होता. आचार्य बहुलाश्व याजकडून मी त्याच्याविषयीं बरेंच ऐकलें होते. तो तक्षशिलेत त्याचा सहपाठी म्हणून राहिलेला होता. भद्रिकाच्याच प्रेरणेनें पुष्कळसे मगध तरुण तक्षशिलेला युद्धविद्या शिकण्यास

जात असत. राजाच्या हांजीखोर सेनानायकांनीं त्याच्या विरुद्ध चुगल्या करून त्याला नामोहरम केलें होतें; नाहींतर त्यानें मगध सेना अजिंक्य करून ठेवली असती.

मी घोड्यावरून खालीं उतरलों. व सैनिकाना झटकन खाट आणण्यास सांगितलें. ती येतांच मी स्वतः भद्रिकाचें शव एका बाजूने धरून ते खाटेवर ठेवलें. यावेळीं आमच्या भोंवतीं आणखी कांहीं सैनिक जमले. मी त्यांना म्हटलें--" हा मगध देशचा सर्वश्रेष्ठ युद्ध-विशारदच नव्हे तर सर्वश्रेष्ठ वीर भद्रिक आहे "

त्याच वेळी मी आमच्या सेनापतींना सूचना देण्याकरतां पाटलिग्रामला स्वार पाठवला.

मी माहुताला आमच्या सैनिकांच्या स्वाधीन केला. हत्तीच्या खाण्या-पिण्याची व्यवस्था करण्यास सागितलें व स्वतः भद्रिकाचें शव बरोबर घेवून आपल्या शिबिरांत गेलो. त्याच वेळीं रणक्षेत्राकडून स्वार धांवत आले. त्यांनी युद्धवार्ता अशी सागितली कीं, शत्रू-सैन्य मैदान सोडून पळत आहे. मी विश्रांति घेत असलेल्या सैन्याला शत्रूचा पाठलाग करण्याची आज्ञा दिली.

जरा शातता मिळताच मला त्या लिच्छवि तरुणाची आठवण झाली. तो माझ्याच बरोबर हत्तीवर चालून गेला असावा बहुधा; त्याचे तलवारीचे हात मात्र मला दिसले नव्हते. पण राजगजाला पकडण्यांत जे कौशल्य त्यानें दाखवले होतें तें मात्र असामान्यच होतें. मी आपल्या पहारेकऱ्यास त्या तरुणाला बोलावून आणण्यास सांगितलें. पण पुष्कळ शोध करूनहि त्याला त्याचा पत्ता लागला नाही. मी त्या वीराला उद्देशून प्रशंसेचा एक शब्दहि बोललो नाही म्हणून मला फार वाईट वाटले. कदाचित तो पुन्हा शत्रूचा पाठलाग करायला परत गेला असेल. कोणजाणे तो तेथून जिवंत परत येईल की नाहीं ? मला स्वतःचाच फार राग आला. वीरतेचा तिरस्कार केल्याचा अपराध आपल्या हातून झाला असे मला वाटलें. पश्चात्तापाने हृदय तळमळूं लागले. झालेल्या घटनेचा विसर पडावा म्हणून मी हत्तीजवळ गेलों. हा खरोखरीच गजराज ऐरावत आहे हे आतां कळून आले. त्याचे ते तीन तीन हात लांबीचे मुसळा सारखे दांत, त्याचें सुंदर विशाल शरीर, त्याची काळीभोर नतोन्नत पीवर दृढ सोंड,—सर्वच अलौकिक होतें. नंतर मी युद्धक्षेत्राच्या संचालनांत मग्न झालों. दिवस अगदीं थोडा राहिला होता. मला एकाएकीं एका गोष्टीची आठवण झाली. मी माहुताला म्हटलें—

" महाराज बिंबिसार यांच्या मंगल हत्तीवर सेनापति कां बसले होते ?"

माहुत—" सेनापतींच्या गुणांची महाराजानांच कदर होती. कुमारांना सेनापति बालबुद्धी म्हणत. त्यावरूनच कुमार त्यांच्यावर नाराज असत. पण महाराज

त्यांना फार मान देत. महाराज सेनापतींकरतां मंगल हत्तीच काय, प्राण सुद्धां देण्यास तयार होते. दोघे सम-वयस्क बालमित्र होते."

मी जरा विचारांत होतों. थोड्या वेळानें मी म्हटलें—

" तुला जर मंगलच्या बरोबर सोडून दिलं तर तूं राजगृहीं परत जाशील ? "

माहुत—" काय मला सोडून द्याल ? "

मी—" महाराजांना आपला बालमित्र सेनापति व मंगल हे दोघेहि हातचे गेल्यानं फार दुःख होईल. मंगल भेटल्यानं त्याचं थोडं समाधान होईल असं मला वाटतं." माहुत गप्प बसलेला पाहून मी ह्मणालो—" तुला रस्त्यांत आमच्या सैनिकांकडून कांहीं त्रास होण्याची भीति वाटते होय ? "

माहुत—" होय स्वामी ! "

मी—" त्याची चिंता नको करूं. मी तुला आमच्या सेनापंक्तींतून सुरक्षित बाहेर पोंचवण्याची व्यवस्था करतों. तुला कुठं जखम झाली नाहीं हे चागलं आहे. जा आतां. आमचे सैनिक तुला व हत्तीला खाऊं घालतील ते खा. तोपर्यंत मी तुमच्या महाराजाना त्यांच्या बालमित्राच्या मृत्यूबद्दल पत्र लिहितो. नंतर तुला राजगृहाकडे चटकन रवाना व्हावं लागेल. "

माहुताला माझ्या बोलण्याचे फारच आश्चर्य वाटत होते हे त्याच्या हावभावांवरून दिसत होतें. मी ताडपत्रावर तीन ओळीची चिठ्ठी लिहिली व तिच्यावर मोहोर करीत होतो तोंच लिच्छवि-सेनापति सुमन येऊन पोंचले. त्यानीं येतांच मला घट्ट मिठी मारली व माझ्या कपाळाचे चुंबन घेतले. नंतर ते ह्मणाले—

" सिंह, माझा बाळ तो !—छे छे. ! लिच्छवीचा विजयी सेनापति—"

मी—" नाही, मला आपला बाळ शब्दच जास्त आवडतो. "

सेनापति—" बरं तर बाळ ! सर्व वज्जी भूमीला, साऱ्या वैशालीला, तुझ्याबद्दल अभिमान वाटतोय. आम्हाला मगधापैकीं जर कोणाची भीति वाटत असेल तर ती कूट-नीतिज्ञ ब्राह्मण वर्षकार व युद्धविशारद सेनापति भद्रिक याचीच. भद्रिकला मारून तूं मगधावर पूर्ण विजय मिळवला आहेस. "

मी—"अन् सेनापति ! मगध-सेना रणक्षेत्र सोडून पळून जात आहे व लिच्छवि त्यांचा पाठलाग करीत आहेत. "

सेनापति—" पळून चालले आहेत ! सेनापति भद्रिकच्या मृत्यूनंतर हेंच होणार."

मी—" मी आपल्यापुढं एका अपराधाबद्दल क्षमा मागूं इच्छितों. "

सेनापति—" मगध-विजेत्याला एक नाहीं शंभर अपराध माफ आहेत. "

मी—" मगध राजाचा मंगल हत्ती—ज्याच्यावर बसून मगध-सेनापति लढायला आला होता तो—मी परत पाठवीत आहे. "

सेनापति—" म्हणजे, तूं मंगल हत्तीहि पकडून आणला होतास ? "

मी—" होय, पण ज्या तरुणानं असाधारण वीरता व कौशल्य दाखवून हत्तीला कैद करून इथंपर्यंत आणलं, त्याचा मी एका शब्दानंहि सन्मान करूं शकलों नाहीं म्हणून वाईट वाटतं. आतां तो मगधांच्या पाठलागांत सामील झाला असेल. "

सेनापति—" कामाच्या गर्दींत अशी एखादी चूक होऊनच जाते. पण मला वाटतं तो तरुण पुन्हां येईलच. तुझी हत्तीला परत पाठवायची इच्छा असली तर पाठवून दे. "

मी—" अन् सेनापति ! मी मगध राजाला हें पत्र लिहिलं आहे—" " राजा मागध बिंबिसार यांस लिच्छवि–सेनापति सिंह यांचे कडून कळविण्यांत येते कीं आम्ही मंगल हत्तीप्रमाणें आपले सेनापति भद्रिक यांना जिवंत पकडूं शकलो नाहीं याबद्दल आम्हांला वाईट वाटतें. वीरांचा गौरव कसा करावा हे लिच्छवि चांगलें जाणतात. आम्ही मगध–सेनापतींना मोठ्या सन्मानाने अग्निसंस्कार करण्यास जात आहों. लिच्छवि–सेनापति स्वतः चितेला अग्नी लावतील. आपल्या बालमित्राचा वियोग थोडासा सह्य व्हावा या हेतूने आपला मंगल हत्ती परत पाठवीत आहों. "

सेनापति—" मीहि तुझ्याशीं सहमत आहे. "

माहुताला मी ती चिठ्ठी दिली. दोन स्वार माझे मुद्रांकित मार्गपत्र घेऊन बरोबर दिले व त्यास निरोप दिला. नंतर बागेच्या एका टोंकाला चिता तयार करण्यास सांगितलें.

आमचे शिबिर पाटलिग्रामापासून तीन योजनांवर एका आंबराईत होतें. त्यांत या वर्षी खूप आंबे लागले होते, पण ते पिकायला अजून अवकाश होता. आंब्याच्या छायेंत सेनापतींना घेऊन मी बसलो होतों. कपिल काही घोडेस्वारांना घेऊन तेथें आला. त्यांनीं एका घोड्यावरून हात बांधलेल्या एका माणसास खालीं उतरविलें. माझ्या जवळ बसलेल्या सेनापतींना पाहून त्यांना अभिवादन करून तो मला ह्मणाला—

" हा मगधचा उपसेनापति उदायी आहे. आज आम्ही सर्वांत जास्त युद्ध-बंदी पकडले आहेत. अजून मोजले नाहींत पण त्यांची संख्या एक लाख तरी असेल."

सेनापतींनीं कपिलचे अभिनंदन केलें. मी कपिलला आलिंगन देऊन म्हटलें—

" कपिल, तूं माझ्याहून भाग्यवान् आहेस. मगधच्या सेनापतीला मी जिवंत पकडूं शकलों नाहीं. "

कपिल—" म्हणजे तुम्ही मगधच्या सेनापतीला ठार केलंत ? "

मी—" होय, पण त्याला जिवंत पकडतां आलं असतं तर मला किती आनंद झाला असता. असो ! शत्रूकडील काय हाल हवाल आहे ? "

कपिल—" आतां शत्रुसेना खतम् झालीच म्हणायची. इतके युद्धकैदी मिळाले आहेत कीं त्यांना संभाळणंहि कठीण."

सेनापतींनीं बंदीजवळ येऊन म्हटलें—

" उपसेनापति उदायी ! तुम्ही मगधच्या सेनापतींच्या अग्निसंस्कार व अंतिम सत्कार-प्रदर्शन प्रसंगीं आमचे सहभागी व्हाल असं मला वाटतं."

उदायी—" जरूर, मी हें माझं मोठं भाग्य समजतों."

मी उदायीचे दोन्ही हात माझ्या हातांत घेऊन म्हटले—

" अन् सेनापति, मी तुमच्या आदर-सत्काराला वेळ लावल्याबद्दल मला क्षमा करा."

उदायी--" पण मी तर कैदी आहे."

मी--" हो, पण तुम्ही वीर आहांत. जय किंवा विजय हा एकतर्फीच असतो. पण वीरतेचे भागीदार दोन्ही पक्ष होऊं शकतात. आपल्याला आमच्या सैनिकानी कांहीं त्रास तर नाही दिला ?"

उदायी--" आपल्या सेनानायकांच्या [ कपिल ] सौजन्याबद्दल धन्यवाद."

कपिल--" पण मी तर आपले हात बांधले होते."

उदायी--" बांधले नसते तर मी इतक्या सरळपणानं आलों नसतों."

मी—" बरं पण आपल्याला कांहीं खायला ?"

उदायी--" नको, फक्त पाणी पिईन."

उदायींचें पाणी पिणे झाल्यावर भद्रिकाची स्मशानयात्रा निघाली. प्रेतयात्रेंत आम्ही सर्वांनी पाळीपाळीने खांदा दिला. शव चितेवर ठेवल्यावर सेनापति सुमन यांनी प्रथम अग्नी दिला. थोड्याच वेळांत अग्नीच्या लाल ज्वाळानी चंड भद्रिकचें शरीर झांकले गेलें. त्या ज्वाळा जणुं वीर भद्रिकाच्या शरीराचा कणन् कण ज्योतिलोंकांत पोंचवीत आहेत असे वाटले.

परत आल्यावर मी सर्वांना खाण्यापिण्याचा आदेश दिला व उदायीला सैनिकांच्या बरोबर उल्काचेलला पोंचविण्याची आज्ञा केली. नंतर मी व कपिल दोघांनीं सेनापतींना युद्धाची सर्व परिस्थिती सागितली. नंतर मी सेनापतीना म्हटलें—'ही सर्व हकिगत वैशालीला पाठवावी.' त्यावर ते म्हणाले--'मी स्वतःच वैशालीला जाऊन हा संदेश पोंचवीन.' ते आतांच घोड्यावरून तीन योजनें दौडत आले होते. म्हणून मी त्यांना विश्रांती घेण्यास सांगितले. पण त्यांना तें मान्य झालें नाहीं. मी त्यांना नवा घोडा दिला. ते थोड्याच वेळांत आमच्या दृष्टीआड झाले.

मी कपिलकडे पाहून म्हटलें--" मित्र कपिल, कार्याची सफलता हेंच त्याचं पारितोषिक आहे."

कपिल—" अगदीं बरोबर बोललांत. तुम्ही आपल्या कौशल्यानं हा महान् विजय प्राप्त केला. लिच्छवि–सेनापतींनीं तुमची प्रशंसा केली. लिच्छवि गण देखील आपला सर्वांत मोठा सन्मान करील. परंतु हा विजय मिळाल्यानंतर तुमच्या मनाला जी श्रमसाफल्याची प्रसन्नता लाभली, तिची बरोबरी या सन्मानजन्य प्रसन्नतेनं कशी होईल ? "

मी—" स्वतः बद्दल जें मी तुला सांगितलं तेच तुझ्या बद्दलहि मला वाटलं. असो, तें जाऊं दे. आतां जरा पोटाकडे बघूं. भामेच्या म्हणण्याप्रमाणं मी तर नंगटांचा शिष्य झालों आहे हें तुला माहीतच आहे, तेव्हां मला कांहीं मांस-मच्छराची वा मद्याची जरूरी नाही. "

कपिल—" पण मला तें पाहिजे. "

मी—" मग तुझे सेनानी आहेतच, त्यांच्याकडून हुकूम फर्माव. "

त्या रात्रीं शुकनें खीर–पुरी बनवली होती ती चांगली झाली होती; पण मला ती गोड लागली नाहीं. माझे इतर सवंगडी मास व मद्य फस्त करून आनंद करीत होते, तिथें मला कोण साथीदार मिळणार ? पण त्या करतां मी कोणाला दोषी ठरवणार ? मीच जाणून-बुजून हा पंथ स्वीकारला होता.

माझे उपनायक व सेनानी रणक्षेत्राकडून येणाऱ्या सूचना एकत्रित करण्यास पुरेसे होते. कित्येक आठवडे मिळालेल्या अल्प निद्रेमुळे माझ्या पापण्या जड झाल्या होत्या. म्हणून मी लौकरच जाऊन निजलों. कोणाचा तरी आवाज माझ्या कानीं आला तेव्हा अर्धी रात्र झाली होती. प्रथम मला वाटलें मी स्वप्नांत आहे. पण दोन तीन वेळां हांक ऐकल्यावर कळले कीं हा कपिलचा आवाज आहे. मी चटकन उठून बसलों—

" कपिलभय्या ! काय आहे रे ? "

कपिल—" तुम्हांला गाढ झोपेची आवश्यकताच आहे. पण मला तुम्हाला नाइलाजानं जागे करावं लागलं. सेनापति सुमन वारले. "

मी—" सुमन वारले ! आत्तां तर ते इथून गेले. पण हा आहे काय प्रकार ?"

कपिल—" उल्काचेलला पोंचतांच सेनापतीनी दूताबरोबर एक पत्र वैशालीला पाठवलं होतं. पण त्यांच्यानं राहवलं नाही. विजयाची वार्ता स्वतःच गण-परिषदेला सांगावी असं त्यांच्या मनानं घेतलं. ते अगदीं उल्काचेलहून निघणार तोच त्यांना मूर्च्छा आली. बरोबरच्या स्वारांनीं पाहिल तों त्यांचा प्राण निघून गेला होता. त्यांनीं एक स्वार इथं बातमी द्यायला पाठवला व बाकी सर्वांनी सेनापतींचं शव घेऊन वैशालीला प्रयाण केलं. "

मी एकदम सुन्न झालों. जरा वेळ मी बोलत नाहीं असें पाहून कपिल म्हणाला—

" सेनापति उल्काचेलमध्यें नाहींत. पूर्वेकडील सरहद्दीवर युद्ध बंद झाल्यासारखं आहे. तरीहि तिकडून ज्या सूचना वगैरे येतील त्या कोण पहाणार ? "

मी लिच्छवीचा उपसेनापति आहे, हें मी विसरलों नव्हतों. मी कपिलला म्हटलें—

" ठीक, जोंपर्यंत गणानं दुसरा सेनापति नियुक्त केलेला नाहीं तोंपर्यंत त्यांच्या कामाची जबाबदारी माझ्यावर आहे. मित्र कपिल, दक्षिणेकडील युद्धक्षेत्राचा भार तुझ्यावर. मगधांचे दूत शांति-भिक्षा मागायला जोपर्यंत येत नाहींत तोंपर्यंत शत्रु-सैन्याचा पाठलाग सोडतां कामा नये. युद्धबंदी उल्काचेलला पाठवीत जावं. अमरूला मी पत्र लिहितो. माझा घोडा मागवा. "

मी दिव्यापुढे बसून पत्र लिहिले. कपिलने घोडा आल्याची खबर दिली. पत्रावर मोहोर केल्यावर कपिलला गाढ आलिंगन देऊन मी म्हणालो—" मित्रा ! आजकाल कोणाचं आलिंगन अंतिम होईल याचा नेम नाहीं. मी चाललों. परिस्थिती पाहून जसं वाटेल तसं कर. अन् शिवाय मी येथून तीन योजनांवर तर आहेच. "

रात्र निःस्तब्ध होती. रातकिडयांच्या किर-किर आवाजा शिवाय चोहोंकडे जी शांतता पसरली होती ती आमच्या पांची घोडयांच्या टापाच भंग करीत होत्या. आदल्याच दिवशीं जिथे रक्ताचा चिखल माजलेला होता, त्याच भूमीवरून आम्ही जात होतों. एकमेकांशी शब्दहि बोलतां येणार नाहीं इतक्या वेगानें आम्ही जात होतो. मधून मधून पहारेकरी आम्हांला थांबण्याकरतां आवाज देई, मशाल उचलून पाही, नंतर ओळख देऊन किंवा अभिवादन करून सोडून देई. पाटलि-ग्रामांत सेनानीला बोलावून सांगितले की मी उल्काचेलला जातो आहे, इकडचा सर्व भार सेनानायक कपिल यांच्यावर सोंपवला आहे. तीन योजनांचा पल्ला गांठून घोडे थकले होते; म्हणून आम्ही पाटलि-ग्रामांत थोडी विश्रांती घेतली. नंतर नावांच्या पुलावरून हळूहळूं जाऊन उल्काचेलला पोंचलों. बरोबर आलेल्या स्वारांनी परत जाण्याची परवानगी मागितली. त्यांना जायला सांगून मी सेनापतीच्या सहाय्यक सेनानीकडून आलेल्या नवीन कांहीं सूचना वगैरे बद्दल वाटाघाट केली व मग झोंपी गेलों.

# ( २१ )

# तह

सकाळीं उठलों तों गण-पतीचें पत्र घेऊन आलेला दूत माझी वाट पहात आहे असें कळलें. मी पत्र घेऊन वाचले. गण-पतींनीं विजयाबद्दल मला धन्यवाद दिले होते व जोंपर्यंत गण कुणाला सेनापति म्हणून निवडून देत नाहीं तोंपर्यंत, सेनापतीचे काम संभाळण्याबद्दल आदेश दिला होता. मी आदेश-पालनाची स्वीकृती देऊन दूताला परत पाठवलें.

उल्कचिलकडे टोळ्यां टोळ्यांनीं युद्धकैदी येत होते. त्यांची रवानगी सरहद्दी-पासून पुष्कळ आंत असलेल्या प्रांतांत केली जात होती. जखमी लोकांची व्यवस्था पाहून मला आनंद वाटला. मी तो आचार्य अग्निवेश यांना बोलून दाखवला तेव्हा ते म्हणाले--

" व्यवस्था दिवसेंन् दिवस सुधारत गेली. शेवटी कामच कामाला शिकवितं. आम्हांला इतक्या जखमी लोकांची चिकित्सा एकाच वेळीं करायची कधीं वेळच आली नव्हती. पण आमच्या पुढं जसजशा अडचणी येत गेल्या तसतशे त्यांतून सुटायचे मार्ग सांपडत गेले. आम्ही वेगवेगळ्या जखमींना वेगवेगळया जागी ठेवलं आहे. ज्यांच्या जखमा भयंकर स्वरूपाच्या आहेत त्या सर्वांना एकत्र ठेवलं आहे. "

मी मधेंच बोलणें थांबवून म्हटले--

" अन् आपली स्त्रीसेना कसं काय काम करते ? "

अग्निवेश—" लिच्छवियानी व अलिच्छवियानी या सर्वच स्त्रियांच्या अंगीं अवर्णनीय उत्साह संचारला आहे. त्या तर पुरुषांची बरोबरी करताहेत. त्याची नायिका भामा हिच्याबद्दल तर कांही विचारूंच नका. तिचा हुकूम म्हणजे जणूं लिच्छवि-सेना-पतीची आज्ञाच. "

मी—" तिचा हुकूम अशा रीतीनं मानला जातो असं का आपलं म्हणणं ? "

अग्निवेश—" होय तसंच. "

मी--" भामा आहे कुठं ? "

अग्निवेश—" पहिल्या दिवशीं तेवढी इथं राहिली. नाहीं तर तिचा मुक्काम आपला कायमचा पलिकडच्या तीरावर. मधून मधून कधींतरी ती इकडे येऊनहि जाते. आज सकाळींच येऊन ती रोग्यांना पाहून गेली."

मी—" जर भेटली तर सांगा मी इथंच आहे म्हणून."

अग्निवेश—" अन् सेनापति! या युद्धानं आम्हां वज्जीनिवासी लोकांत एका नव्या जीवनाचा संचार केला आहे. बुढे–बुढिया सुद्धां यांत कुठल्या ना कुठल्या तऱ्हेनं मदत करूं इच्छितात. कमीत कमी माझ्या माणविकेकडून तरी अशी आशा मी केली नव्हती. तिचा सारा जन्म मला हुकूम सोडून तंग करण्यांतच गेलाय."

मी—" तंग करण्यांत?"

अग्निवेश—" होय फारच. ती पहिलेपणीं गरोदर होती त्यावेळीं तर तिनं माझा जीव खाल्ला. ती म्हणे–' एक माकड आणा, माझा बाळ खेळेल त्याच्याशीं.' "

मी—" जिवंत माकड?"

अग्निवेश—" नाही, खेळांतलं लांकडी माकड. माकड आणल्यावर ती म्हणाली. ' आतां तें लाखेच्या रंगानं रंगवून आणा.' नंतर म्हणाली–' शूर शिपाई आणा, त्याच्याशी माझा बाळ खेळेल.' "

मी—" आचार्य, अन् तुम्ही सर्व खेळणीं आणीत गेलांत?"

अग्निवेश—" मग काय करणार सेनापति! माणविका तरुणी होती, तिच्या रागाचं भय वाटे मला. मुलाला खेळणीं हवींत म्हणून खेळणीं घेऊन एक सबंध घर भरून ठेवलं."

मी—" एक सबंध घर?"

अग्निवेश—" होय तर अन् पुढं काय झालं ठाऊक आहे? मुलगी झाली मुलगी!"

मी—" मग खेळण्यांचं काय केलंत?"

अग्निवेश—" पुढें मुलगा होईल या आशेनं ठेवून दिलीं. त्यानंतर तिच्या पांच खेपा झाल्या, पण पांची मुलीच. माझी माणविका कशी होती याचा हा एक नमुना आहे. देहाची हालचाल तिला पसंत नव्हती. माझ्या जवळ दास-दासी व नोकरचाकर पुष्कळ आहेत, म्हणून कांही विशेष हरकत नाहीं; नाहीं तर माणविकेनं मला जिवंत राहूं दिलं नसतं. परंतु तिनं जेव्हां तुझी आई मल्लिका देवी हिला कांच्या मारून जखमी लोकांच्या मलमपट्ट्या बांधतांना, बिछाने घालतांना, दूध प्यायला देतांना पाहिलं, तेव्हां मात्र तिच्यांत एकदम बदल झाला."

मी—" माझी आई कांच्या मारते?"

अग्निवेश—" होय, अन् माणविकासुद्धां वज्जीभूमींतील स्त्रियांमध्यें अगदीं नवीन असं परिवर्तन झालं आहे म्हणून मी अगोदरच नाहीं का सांगितलं ? अन् ज्या प्रकारचे जखमी झालेले आमच्याकडे येतात त्यांना पाहून गजगतीनें चालणं कोणालाहि खरोखरच शक्य होणार नाहीं. अन् कांच्या मारला नाहीं तर स्त्रियांच्या अन्तरवासकांत पाय अडकायची धास्ती कायमचीच राहते."

मी—" आचार्य ! आई आहे कुठं हल्लीं ? "

अग्निवेश—" अजून ती आली नाहीं. पण येईलच इतक्यांत. माझी माणविका व देवी मल्लिका या बाल-मैत्रिणी आहेत. तिला ठाऊक असेल मल्लिका कुठं राहिली आहे ते. "

मी—" आचार्य ! मग आईला व भामालाही सांगा कीं मी दोनप्रहरीं इथं येईन. "

अग्निवेश—" अन् आमच्या गांधारी सूनबाईला सुद्धां ? "

मी—" हो. "

अग्निवेश—" माझ्या माणविकेला तिचं फार कौतुक आहे. माणविका म्हणते, ' मैत्रिणीची सून म्हणजे माझीच सून.' पण भामा व गांधारी यांचं दर्शन इकडे फार क्वचित होतं. "

मी—" काम पुष्कळ असेल ? "

अग्निवेश—" सेनापति, कामाचं कांहीं विचारूं नका. जखमी लोकांची नुसती रीघ लागलेली असते. मी आपल्या वैद्य शिष्यांना पैलतीरावर पाठवलं आहे. मला तिकडे जायला वेळच मिळत नाहीं. रणक्षेत्र किती दूर आहे याचा देखील मला पत्ता नाही. परंतु जखमा अगदीं ताज्या असतांनाच जखमी आमच्यापर्यंत येऊन पोंचतात. "

मी—" आचार्य ! रणक्षेत्र दुसऱ्याच दिवशीं इथून तीन योजनांच्या पलीकडे गेलं. "

अग्निवेश—" तर मग आमच्या मुली जखमी लोकांना घेऊन दौडत येत असतील. "

मी—" रणक्षेत्रांतून तर दौडत यायलाच हवं. शिवाय रथ व डोल्या यांचीहि व्यवस्था आहेच. तरीहि मी पाहतों आहे, लिच्छवियानींना ना दिवस, ना रात्र, ना ऊन, ना तहान. बाणांच्या वर्षावांत देखील उडी घालायला त्या मागं पुढं पाहात नाहींत. एकहि जखमी सैनिकाला थोडा वेळ सुद्धां रणक्षेत्रांत राहूं देणं आवडत नाहीं त्यांना. "

अग्निवेश--" सेनापति ! म्हणूनच तर मी सांगत होतों कीं नुकत्याच झालेल्या जखमा अगदीं ताज्या असतांनाच जखमी आमच्यापर्यंत येतात. जखम जितकी ताजी असते तितकी ती बरी व्हायची जास्त आशा असते."

मी—" बरं तर आचार्य ! आईला सांगा दुपारीं मी येईन म्हणून."

अग्निवेश--" सेनापति ! अन् माणविकेलाहि सांगेन. ती पण तुम्हांला बघायसाठीं फार उत्सुक आहे."

मी 'बरं' म्हणून निघालों. पुन्हां एकदां मला त्या नालागिरि हत्तीची आठवण आली. त्याच्या मस्तकावर जणूं पलंगावरच चढल्याप्रमाणे सहजतेनें चढलेल्या त्या तरुणाची आठवण आली मला. त्याच्याशीं मी एक शब्दहि बोललों नाहीं म्हणून मला राहून राहून वाईट वाटूं लागलें.

दोन प्रहरी जेवण होण्याच्या अगोदर मी पुन्हां अग्निवेशांच्या चिकित्सालयांत आलों. आई जिथें जखमी लोकांची व्यवस्था करीत होती त्या खोलींत वैद्याचार्यांनीं मला नेलें. त्यावेळी आईचे तोंड दुसरीकडे होतें व तिचा पोशाखहि अगदींच वेगळा होता. त्यामुळें मी तिला ओळखलं नाही. तिच्या डोक्याला पुरुषी पगडी होती. अंगांत अंगरखा व खालीं दुहेरी काच्या मारलेले धोतर असा तिचा वेष होता. आचार्यांनीं हांक मारली तेव्हां तिची नजर माझ्याकडे वळली. आईनें जवळ येऊन मला जणूं कडेवर घ्यायचा आविर्भाव केला. तिच्या लेखी मी अजूनहि बाळच होतों. मग ती माझ्या कपाळाचीं, केसाची, भिवयांचीं सारखी चुंबनेच घेत राहिली. मी म्हणालो—

" आई ! तूंहि भामाच्या सेनेंत भरती झालीस ?"

आई--" अन् रोहिणीच्याहि. या मुली लिच्छवि-स्त्रीसेनेच्या गोष्टी बोलत होत्या त्यांवेळीं सुरवातीला मी तिकडे विशेष लक्ष दिलं नाहीं. पण मग जेव्हां त्या गंभीरपणानं खूप मेहनत घेऊन साऱ्या गोष्टी शिकताहेत असं मला दिसलं तेव्हां मला वाटलं की ही कांहीं गम्मत नव्हे. अन् शिवाय ज्याच्या घरावर नंगी तलवार लटकत आहे, त्यांना जास्त विचार करायला वेळ तरी कुठं असतो ?" याच वेळीं तिच्या परिचयातली अशी आणखी एक समवयस्क स्त्री आलेली पाहून तिचा हात धरून आई म्हणाली--" ही माझी मैत्रिण सूर्या; आचार्य अग्निवेश याची पत्नी."

अग्निवेश--" होय सेनापति ! हीच माझी माणविका."

ब्राह्मणीनें माझ्या नत मस्तकाचें चुंबन घेऊन म्हटलें--"अन् ब्राह्मण ! तुम्ही ती माकडाची गोष्ट सांगितली कीं नाहीं ?"

अग्निवेश हात जोडून म्हणाले—" भवती ! रागावूं नकोस. हे आपले सेनापति आहेत."

ब्राह्मणी—" सेनापति तर आहेच. अन् माझी बाल-मैत्रीण मल्लिका हिचा पुत्र असल्यामुळं हा माझाहि पुत्रच आहे. होय कीं नाहीं बा–सेनापति ? "

मी—" नाहीं आचार्याणी, मला बाळच म्हणा. मी लहाणपणीं तुमच्या मांडी-वर खेळलेलों आहे. "

ब्राह्मणी—" अन् बाळ ! मी तुला अंगावर पाजलंय देखील. हो कीं नाहीं ग मल्लिका ? "

आई—" होय सखी ! त्या वेळीं उमा व सिंह यांच्यांत आपण भेद थोडाच मानीत होतों ! "

ब्राह्मणी—" काय फरक हा ? वैशालींत मी याला जातांना दुरून पाहिलं होतं. परंतु नांव ऐकूनहि चेहरा पाहिल्यावर माझा विश्वासच बसेना. "

आई—" बाई ग ! तूं या बारा वर्षांत सिंहाला कुठं पाहिलंस ? तूं तर आचार्यां-बरोबर वाराणशीला गेली होतीस. "

ब्राह्मणी—" होय, त्यावेळीं ब्राह्मणांना वाटलं कीं आपण वैशाली सोडून एखाद्या राजधानीला गेलों तर आपल्याला मान्यता मिळेल, जीवक कौमारभृत्य यांच्या सारखा गौरव होईल आपला. वाराणशींत मान्यता मिळाली हे खरं. पण सखि ! मला मात्र तिथं परमुलुखच वाटत होता. "

अग्निवेश—" अन् सेनापति ! माणविकेनं इकडे यायसाठीं माझ्यामागं सारखा लकडा लावला ! "

मी—' मग त्यांत तिनं वाईट काय केलं आचार्य ? "

अग्निवेश—' हो; वाईट नाही केलं; आपली जन्मभूमि कोणाला आवडत नाहीं ? "

मी—" अन् आचार्य ! काकी सुकुला पण तुमच्याच चिकित्सालयांत काम करते आहे असं ऐकलं मी. "

अग्निवेश—' पहिल्या दिवशीं तेवढी इथं होती. नंतर ती भामाबरोबर पली-कडच्या किनाऱ्यावरील रुग्णालयांत काम करायला गेली. "

मी—" अन् भामाचा तर पत्ताच नाहीं आचार्य ? "

अग्निवेश—" नाहीं आली अजून. अन् आज जखमी लोक तर थोडेसेच आहेत."

मी—" आतां जास्ती येणारच नाहींत ! "

आई—' येणार नाहींत बाळ ? "

मी—" होय आई. मगधांचा पूर्ण पराभव झाला. काल पासूनच आपले सैनिक पांगापांग झालेल्या मागध सेनेचा पाठलाग करीत आहेत. "

अग्निवेश—" हा विजय स्वतःच्या डोळ्यांनीं बघायला सेनापति सुमन हयात नाहींत ही किती दुःखाची गोष्ट आहे ! "

मी--" आचार्य ! त्यांनीं बघितला ना विजय ! तीच बातमी वैशालीला सांगायसाठीं ते उतावळे झाले होते. त्यामुळंच त्याचा अंत झाला. मात्र विजयी सेनेवर हा दुःसह प्रसंग गुदरला आहे खरा. आपला सेनापति आपलं कौतुक करायला व आपल्याला प्रोत्साहन द्यायला हजर नाहीं या गोष्टीचं तिला फार दुःख होतंय. "

चिकित्सालय पाहिल्यानंतर मी शस्त्रागाराची पाहणी करायला गेलों. तेथें मागधांचीं हिसकावून घेतलेलीं हत्यारें जमवलीं जात होतीं. उपनायक शंतनु या वेळीं इथं हजर होते. पूल बांधायला सुरवात झाली त्या दिवशींच ते दीर्घवाहपासून खालच्या अंगाकडील गंगा प्रवाहांतल्या नाविकदलाचे नायक झालेले होते. त्यांच्या नावा शत्रूकडून जिंकून आणलेली युद्धसामुग्री एकत्र करण्यांत गुंतल्या होत्या. आम्ही परस्परांना आलिंगन दिले व त्यांनीं युद्ध-विजया बद्दल माझें अभिनंदन केलें. मी म्हटलें—" या विजयांत तक्षशिलेचा फार मोठा वांटा आहे. "

शंतनु—" तक्षशिलेला आपली बहिण वैशाली हिची थोडीशी सेवा करायची संधी मिळाली हें पाहून मला आनंद वाटतो. "

मी--" अशी तशी सेवा नाहीं ! आपली सेवा चिरस्मरणीय राहील. आपण संघटित केलेल्या आरमारांत पहिल्याच हल्ल्यांत शत्रूचा दम जो उखाडला, तो त्याला पुन्हां कांहीं सांवरतां आला नाहीं. अन् आज मित्र कपिल हे नदीपलीकडील सगळया युद्धाचं संचालन करीत आहेत अगर करीत होते. कारण युद्ध आतां जवळ जवळ संपल्यासारखंच आहे. मगध राजानं स्वत.च्या तोंडानं पराभव कबूल करायला हवाय आम्हांला. "

मुक्कामीं पोंचल्यावर पुन्हां आलेल्या सूचना ऐकणें व नव्या आज्ञा करणें यांत गुंतलों. दिवस थोडा राहिला असतांना कपिल कडून संदेश आला–" शत्रु युद्ध बंद करावं म्हणत आहे. " मी उत्तर पाठवलें की पाठलाग बंद करावा, बाकीच्या सूचना उद्यां पाठवीन. त्याच वेळीं मी घोड्यावरून वैशालीकडे रवाना झालों. थकलेल्या घोड्यांना वाटेंत टप्प्याटप्प्यांवर सोडून देत सूर्यास्तानंतर थोड्या वेळानें वैशालीला पोंचलों. गण-पति सुनंदांची आज कित्येक महिन्यांनीं भेट झाली. ते मोठ्या उत्साहानें मला भेटले. त्यांनीं मला अनेकवार धन्यवाद दिले. नंतर मी कपिलकडून आलेली सूचना त्यांना सादर केली. त्यांनीं त्याच वेळीं अमात्य–परिषद बोलावली.

प्रश्न असा होता : युद्ध बंद करावें कीं नाहीं, बंद केलें तर कोणत्या अटीवर. महानाम अमात्यांचे म्हणणें होतें—

" आम्ही मागधांचे कित्येक हल्ले आतां पर्यंत सहन केले आहेत. त्यांच्या बरोबर केलेला कुठलाहि तह कायमचा होत नाहीं. तह करायचा म्हणजे मगधांना पुन्हां तयारी करून आक्रमण करायला आम्ही अवसर मात्र देतो. म्हणून मला वाटतं या वेळीं आपण हीं नेहमींचीं भांडणं कायमचीं मिटवून टाकावींत. "

गण-पति--" म्हणजे मगधराज्यच खतम् करावं ? "

महानाम—" होय. "

गण-पति--" म्हणजे पाठा, मगध, उत्तर-अंग, दक्षिण-अंग या सर्वांना वज्जी-भूमींत सामील करायचं असंच ना ? "

महानाम—" अर्थातच ! कां नाहीं ? "

गण-पति--" मग आपलं हे शासन गणशासन होणार का राज-शासन ? "

महानाम—" गणशासन. जसं वज्जी भूमीत आहे तसंच. "

गण-पति—" वज्जी भूमीत लिच्छवींचीच संख्या फार मोठी आहे, व त्यांनी इथल्या शासनाला गणशासनाचं रूप दिलं आहे. पण मगध किंवा अंग यात लिच्छवि प्रजा नाहीं. "

महानाम--"अ-लिच्छवि प्रजेवर इथं जसं आपण शासन करतों तसंच तिथं करूं."

गण-पति--" आमच्या सेनापतीनी तक्षशिला, उत्तरापथ [ पंजाब ] येथील गणांसंबंधीचे आपले विचार प्रकट करावेत. "

मी--" भन्ते गण-पति ! मी एक शिपाई आहे. म्हणून राजनीतीविषयी–विशेषतः गणतंत्राच्या राजनीतीविषयी–मी जे विचार प्रकट करीन ते एखाद्या राजनीतिज्ञाचे नसून एका योद्धयाचे आहेत हें आपण लक्षात ठेवा. उत्तरापथाकडील गांधारसारख्या गणांतून दासप्रथा नाही. तिथं वर्णभेदाचा हा प्रश्नच उद्भवत नाही. कारण तिथं सगळेच आर्य आहेत. अन् थोडीशी कुटुंबं सोडली तर बाकी सर्व गंधारच आहेत. यामुळं तिथं गण जास्त शुद्ध स्वरूपांत आहे. गंधारवासी मंडळींत जो आपसातला बंधुभाव दिसतो तो इथंहि नाही दिसत. माझ्या मते तक्षशिलेची [ गंधार ] गण-प्रणाली आपण आदर्श म्हणून मानायला हरकत नाहीं. आपल्याकडे दास-प्रथाहि आहे; आर्यांशिवाय भिन्न प्रजाहि पुष्कळ आहे. अन् अलिच्छवि आगंतुकांची संख्याहि फार आहे. याचा परिणाम अलिच्छवि प्रजेला आपली शासन-पद्धति कठोर नसूनहि गण-शासना सारखी नाही. कारण आमचं शासन अगर आमचे ठराव यांवर दडपण आणायचं कांहीच साधन अ-लिच्छवि प्रजेजवळ नाहीं. यामुळं वज्जीभूमींत लिच्छवि प्रजा स्वतः राहात असूनहि आपल्याला आदर्श शासन चालवायच्या मार्गांत फार अडचणी आहेत. याचाच एक परिणाम असा झाला आहे कीं लिच्छवींमध्यें कांहीं श्रीमंत व कांहीं गरीब अशीं कुटुंबे आहेत. लोकांना आपल्या

धनाच्या अनुरोधानं गणामध्यें प्रभुता गाजवावीशी वाटते. त्यामुळं गरीब लिच्छवि श्रीमंत लिच्छवींपासून दुरावताहेत.

" वज्जीभूमींत जर ही गोष्ट आहे तर आपण अंग, मगध यां सारख्या अलिच्छवि देशांना आपल्यांत सामील केलं तर त्याचा प्रभाव गण-प्रणालीवर आणखी अधिकच पडेल. आपण इथून कुणाला तरी राजाची पदवी देऊन मगधादिकांवर राज्य करायला पाठवणार नाहीं. पण दुसरं कसलं तरी नांव देऊन एखादा शासक तर जरूर पाठवूंच. मग तिथं तो शासक मन मानेल तसा कारभार करायला लागला तर त्याला अडवायला तिथं लिच्छवि गण असणार नाहीं. एकाच लिच्छवीला तिथं आपण शासक म्हणून जास्त दिवस ठेवला तर तिथं दुसरा मगध-राजा तयार होईल हें लक्षांत असूं द्या. तो संपत्तीबरोबर प्रभुत्वाचाहि संचय करील. तिथून त्याला काढून टाकायचं म्हणाल तर ते त्याला पसंत पडणार नाहीं. यामुळं पुढं एखादे वेळी मोठ्या कुरापतीचा हा पाया होऊन राहील. "

महानाम--" अन् समजा, आपण कोणाला जास्त मुदतीकरितां न पाठवता तीन वर्षांकरता पाठवावं असं ठरलं तर ? "

मी--" तीन वर्षं सुद्धा जास्तच होतात. एखादा हुशार मनुष्य तेवढ्या काळांत आपलं बस्तान बसवूं शकतों. अंग-मगधांमधील प्रभुताशाली व्यक्तींचा कट रचून व त्यांत प्रवासी लिच्छवींपैकी काही फितुरांना सामील करून घेऊन तो बंड उभारूं शकतो. "

महानाम--" अन् एकच वर्षाकरतां पाठवला तर ? "

मी—" तर त्याला त्या देशाचे रीति-रिवाज, तेथील राजनैतिक व दुसऱ्या इतर व्यवस्था, परिस्थिती वगैरे समजून घ्यायला तेवढा वेळ पुरणार नाहीं. "

महानाम--" सेनापति ! अंग मगधाना आपल्या गणांत सामील करून घेतलं तर आपल्या गण-शासन-प्रणालीला फारच मोठा धक्का बसेल असं का आपलं मत आहे ? "

मी—" होय; पश्चिमेकडील गणांच्या अनुभवावरून आपल्याला हें स्पष्ट दिसत आहे. "

महानाम—" पण मगधांशीं आपल्या प्रत्येक पिढीला कांहीं वर्षांनीं जी ही लढाई करावी लागते ती थांबवायला उपाय काय ? "

मी—" भन्ते अमात्य ! एवढ्यानंच भागत नाही. याहून फार मोठं संकट आहे. अजून पर्यंत जीत आपलीच आहे. पण त्यामुळं मगधांच्या शासनाचं अस्तित्व कांहीं संकटांत सांपडलेलं नाहीं. पण जर का एकदांहि मगधांचा विजय झाला तर ते आमच्या गण-प्रणालीचा कायमचा नाश करतील. आपल्या इथं अलिच्छवि प्रजा पुष्कळ आहे. त्यांना

ग्राम-शासनांत अधिकार नाहीं. ते आपणां सर्वांशीं समदृष्टीनं वागायचा बहाणा करून लेच्छवींचे व अलिच्छवींचे [ राजनैतिक ] अधिकार सारख्या दर्जाचे – म्हणजेच दोघांना समान रूपेण परतंत्र—करून ठेवतील."

महानाम—"होय सेनापति ! आपण बरोबर सांगितलंत. आमच्या प्रत्येक विजयानं त्यांच्या केंसाला थोडासा धक्का लागतो; पण त्यांच्या एका विजयांतच आमच्या गण-प्रणालीचा सर्वनाश होईल. अशा सर्वनाशकारी शत्रूला जिवंत राखणं हें काय बुद्धिवानाचं काम म्हणायचं ?"

मी—"मी आपल्याशीं सहमत आहे. पण बिंबिसारला दूर करून दुसऱ्या लेच्छवि बिंबिसारला येऊं देण्यांनं संकट आणखी वाढतं. बिबिसार हा फक्त बिबिसारच होता, लिच्छवि बिबिसार हा अंग-मगधचा स्वामी तर होईलच; अन् शिवाय तो लिच्छवींचाहि असणारच. त्याचा परिणाम असा होणार की तो आम्हां लिच्छवींमध्ये फूट पाडण्यांत यशस्वी होईल. श्रेणिक बिंबिसारशी लढायसाठीं सर्व लिच्छवि सहमत होते. तशी या नव्या लिच्छवि बिंबिसारशी लढायच्या बाबतीत एकी राहाणार नाही. अन् त्या परिस्थितीत लिच्छवि गणावरील संकट कमी होणार नाही. पहिला प्रश्न हा आहे की आपल्या शत्रूला दूर करण्या करतां आपण लिच्छवि संघाची एकी नष्ट करायला तयार व्हावं की काय ?"

महानाम—"मला वाटतं दुग्ध-पितं लिच्छवि मूल देखील हे पसंत करणार नाही."

मी—"मग असा प्रश्न आहे कीं आपल्या एकीचं नुकसान होऊं न देतां आपण आपल्या शत्रूचं अस्तित्व कसं नष्ट करायचं ?"

महानाम—"होय, यातूनच आपल्याला काहीं तरी मार्ग काढायचा आहे. सेनापति ! यावर आपल्याला काहीं मार्ग सुचतो आहे ?"

मी—"भन्ते महानाम ! आपल्याला शत्रूचं अस्तित्व कायमचं नाहीसं करायचं असेल, तर मी या बाबतीत अगदी सपशेल अंधारातच चांचपडतोय बघा. पण त्यांतहि आपल्याला आशा ठेवायला थोडशी जागा आहे. मात्र तो रस्ताहि संदेह-रहित नाही."

गण-पति--"सेनापति ! तो कोणता ?"

मी—"अंग व मगध या देशांच्या प्रजाना त्यांची स्वतंत्रता परत दिली तर."

महानाम—"बिंबिसारच्या सेनेचा पराभव केल्यावर आपल्याला ही गोष्ट सहज करतां येईल."

मी--"पण अंग व मगध प्रजांना त्या स्वतंत्रतेचा स्वीकार करायची इच्छा होईल का ?"

महानाम—" स्वतंत्रता कोणाला नकोशी झाली आहे ? "

मी--" याचं प्रत्यंतर आपल्या परिवारांतल्या एखाद्या जुन्या आवडत्या गुलामाल मुक्त केल्यानं आपल्याला येईल. "

महानाम—" तो अदास होणं पसंत करणार नाहीं असं का आपल्याला वाटतं ?'

मी—" कारण स्वतंत्रता ही आपल्या बरोबर पुष्कळशा जबाबदाऱ्या, चिंता स्वार्थत्याग, इतकंच काय पण स्वेच्छेनं प्राणत्यागहि करणं, इतक्या गोष्टी आमच्य पुढं उपस्थित करते. अन् हे गुण चिरदासानी बहुतेक घालविलेले असतात. "

महानाम--" म्हणजे जी प्रजा एकदां गुलाम झाली ती कायमची गुलाम राहील असं का आपल्याला वाटतं ? "

मी--" बहुतेक असं असतं असं मी म्हणालों. प्रजेला स्वातंत्र्य परत दे याचा अर्थ तिचं एक गणतंत्र स्थापन करणं. मगध-गण, अंग-गण असे ग कायम करायचे. "

महानाम--" उदीचीमध्यें [ पंजाब ] आहे त्याप्रमाणं पूर्वेकडेहि आपण गणांचं संख्या वाढवावी ही कल्पना खरोखरच चांगली आहे. "

मी--" असं करण्यानं कधीं कधी युद्धं होतील खरी, पण आपल्या गण-प्रण लिला धोका राहणार नाहीं. गणाचा घातक शत्रू राजतंत्र आहे. "

महानाम--" अगदीं बरोबर. "

मी—" बरोबर खरं, पण बोलतां आलं तरी करणं तितकं सोपं नाहीं. कार करण्यापेक्षां बोलणं नेहमीच सोपं असतं. "

महानाम--" म्हणजे आम्ही अंग-मगध यांना त्यांची स्वतंत्रता परत दे शकत नाही ? "

मी--" ती स्वतंत्रता एखाद्या मगधराजाला किंवा अंग राजाला देणं सो आहे. "

महानाम—" नाही, आम्ही प्रजेला ती परत देणार. "

मी--" म्हणजेच मगध-गण अंग-गण स्थापायचे ? "

महानाम-- " होय. "

मी—" मग त्या करतां लिच्छवींच्या प्रमाणं एका रक्तांनीं संबद्ध अशी आर्य गोऱ्या वर्णाची, एखादी मोठी मगध जात, अंग-जात, तयार व्हायला पाहिजे. "

महानाम--" मग तशी जातच नाहीं कीं काय ? "

मी—" मगध क्षत्रिय-जात मिळेल, मगध ब्राम्हण-जात मिळेल, मगध-शिल्पी मगध-चांडाळ, मगध-गृहपति मिळतील; परंतु त्या आम्हां लिच्छवीं सारख्या बहुसं ख्यांक किंवा एकजातीय जाती नाहींत. "

महानाम--"त्यांच्यांतल्या आर्य गौरवर्ण जाती--ब्राह्मण व क्षत्रिय--एकत्र करून आपण मगध गण कां स्थापूं नये ?"

मी--" ब्राह्मण याकरता तयार होणार नाहींत. ब्राह्मण ह्मणतात कीं आपलं काम यज्ञ, पूजा, हे आहे. शासन करणं हें क्षत्रियांचं काम."

महानाम--" गणाची स्वतंत्रता व प्रभुता मिळवायसाठीं ते आपलं पुरोहितत्व सोडायला तयार होतील."

मी--" त्यांच्या तीन्ही वेदांचे सारे मंत्र लुप्त होतील, कोणतंहि मूल कुठल्याच मंत्राचं स्मरण करीत नाहीं अशी स्थिती होईल तेव्हांच ते तयार होतील."

महानाम--" असं कां ह्मणून ?"

मी--" कारण अष्टक, वामक, वामदेव, जमदग्नी, भृगु, वशिष्ट, अंगिरा, विश्वामित्र, भरद्वाज इत्यादींनी जे तीन वेद बनवले आहेत, तेच ब्राह्मण क्षत्रिय असे भेद उत्पन्न करायला मुख्यतः कारणीभूत आहेत. उदीचीच्या [ पंजाब ] आर्यांनी वेद बनवले नाहीत ह्मणून आजहि तिथं ब्राम्हण ह्मणजे नांवाचेच ब्राह्मण जरूर मिळतील. कुरु-पंचालमध्ये अष्टक, वामदेव, इत्यादि मिळणार नाहींत - प्राचीवाल्यानी वेद तयार केले ह्मणून तिकडच्या आर्यलोकामध्ये ब्राम्हण-क्षत्रिय हे भेद जास्तच सापडतात."

महानाम--" आह्मीहि प्राचीवालेच आहोंत, मग आमच्यात हे ब्राम्हण-क्षत्रिय भेद कां नाहींत ?"

मी--" उत्तरपथा [ पंजाब ] कडील गण जातीकडे बघून मी असा निष्कर्ष काढला आहे की आर्य किंवा गौरवर्णीयाचे मूळ पूर्वज कोणत्याहि प्रकारचा ब्राह्मण-क्षत्रिय असा भेद मानीत नव्हते. गंधार, कम्बोज व उत्तर कुरूंत आज देखील तशीच प्रथा आहे. आगंतुक अलिच्छवि आर्य सोडले तर आम्हां लिच्छवीमध्येंहि अशीच प्रथा आहे. हत्यारं चालवणं व शासन करणं यात समानता असल्यामुळं बाहेरचे लोक आम्हांला लिच्छवि क्षत्रिय म्हणतात. ते क्षत्रिय म्हणतात त्याअर्थी त्यांच्या मनांत ब्राह्मणाचा विचारहि येतोच. अर्थात् ब्राह्मण म्हणजे श्रेष्ठ पुरोहित जात. क्षत्रिय म्हणजे तिच्या खालची शासक योद्धयांची जात. आपण त्याच्या या विचारांशीं सहमत आहांत ?"

महानाम--" छेः, मुळीच नाही ! ब्राह्मणाना आम्ही आपल्या बरोबरीचे समजत नाहीं. जिथं रक्ताच्या शुद्धतेचा व वर्णाचा संबंध आहे तिथं ते आमच्याहून खालीं आहेत. म्हणून ब्राह्मण कुमारी किंवा कुमार यांना लिच्छवि कुमार किंवा कुमारी यांच्या संततीच्या बरोबरीचा दर्जा किवा लिच्छवि-अभिषेक द्यायला आम्ही तयार नाहीं. लिच्छवि कन्येपासून आपल्याला झालेली संतति ब्राह्मण आपल्यांत

सामील करून घेतात, तिला यज्ञ, भोजन इत्यादींमध्यें समान अधिकार देतात. त्याच बरोबर आपल्या कन्येला लिच्छवि जांवयापासून झालेल्या पुत्रालाहि ते आपलीं नाना गोत्रं व वंश यांच्यांत सामील करून घेतात. ”

मी—“ म्हणजे यावरून आमचे ब्राह्मण शेजारी ज्या अर्थानं आम्हांला क्षत्रिय म्हणतात तसे आम्ही नाहीं. वस्तुतः कुरु, पांचाल इत्यादि देशांतील आर्यांमध्यें ब्राह्मण क्षत्रिय आदि भेद झाले तिथं आमच्या गण-जातींनीं या भेदाचा स्वीकार केला नाहीं. आम्ही पूर्वी सारखेच आर्य जन [ जाति ] राहिलों. आम्ही कुरु पांचालां-सारखं राजतंत्र स्थापन केलं नाहीं. तर आपल्या पुरातन आर्य पूर्वजांप्रमाणं आपलं गण-शासनच कायम ठेवलं. लिच्छवि ब्राह्मण आहेत कीं क्षत्रिय असा पुढं कदाचित वाद उत्पन्न होईल. दुसऱ्यांच्या सांगण्यावरून आम्हीहि स्वतःला क्षत्रिय म्हणवतों पण ते शस्त्रधारी शासक या अर्थानं; ब्राह्मणा पेक्षां खालच्या दर्जाचा एक वर्ण या अर्थानं नव्हे. वस्तुतः आम्ही ब्राह्मण ऋषींनीं बनवलेल्या वर्णव्यवस्थेंत अजून पर्यंत सामिलहि झालों नाही. इतकं सर्व सांगण्याचा मतलब एवढाच की गण स्थापन करायला ज्या प्रकारची एक जाति, एक परंपरा लागते, ती अंग-मगध यांच्यांत नाही. तिथले क्षत्रिय, ब्राह्मण अगर गृहपति वैश्य हे लिच्छवी प्रमाणं एका जातीचे नाहींत. ”

महानाम—“ त्यांच्यांतल्या क्षत्रियांनाच गण-जाति कां मानूं नये ? ”

मी—“ क्षत्रियांना—अर्थात् मागध क्षत्रियांना—गण-परंपरेची आठवण सुद्धां नाही. ते स्वतःला एखाद्या पूर्वज राजाचे वंशज म्हणवतात. ते स्वतः एखाद्या सर-दाराला किंवा योद्ध्याला आपला मुख्य मानतात. ते गणाचं पुढारीपण मानीतच नाहींत. मग त्यांना गण-प्रणाली बद्दल आपुलकी कशी वाटणार ? ”

गण-पति—“ होय सेनापति ! मलाहि असंच वाटतं कीं बिंबिसारच्या वंशाचा उच्छेद करून मगधांचं शासन मगध क्षत्रिय जातीला दिल्यानं तिथं गणाची स्थापना होणार नाहीं. लिच्छवि आज जी गण-स्वतंत्रता भोगत आहेत ती नुसतं क्षत्रिय म्हणवून घेतल्यानं मगध क्षत्रियांना मिळाली असं म्हणतां येणार नाहीं. ते राजाच्या हुकुमाचे ताबेदार मात्र राहिले आहेत. आणखी एक गोष्ट आहे; दासता—परतंत्रता—ही मगधच्या सर्व जाती नाइलाजानं समानतेनं भोगत होत्या परंतु गण-स्वतंत्रता समानतेनं भोगायच्या बाबतीत त्या सहमत होणार नाहींत. म्हणून त्यांतल्या कांहीं जातींना एकत्र करून मगध-गण किंवा अंग-गण तयार करणं शक्य नाहीं. वस्तुतः जिथं जातींची इतकी खिचडी आहे तिथं गण-स्थापना करणं आपल्या मनांतहि आणून चालणार नाहीं. ”

मी--" म्हणूनच मी पहिल्यानंच सांगितलं कीं तिथं लिच्छवि गणाचं शासन कायम करणं हें लिच्छवींच्या एकीला जबरदस्त घातक अतएव गणालाहि घातक होईल."

इतर अमात्यांनीहि या विषयावर आपले विचार प्रगट केले व ते माझ्या मताशींच सहमत होते. महानाम यांचा पुन्हां असा आग्रह होताच की बिंबिसारचा राजवंश तरी कमींत कमी नष्ट करावा. यावर मी म्हणालों—

" भन्ते महानाम ! आतां आपण जो प्रश्न उपस्थित केला आहे, त्याचा माझ्या स्वतःच्या विषयाशी--युद्ध व सैनिक ज्ञानाशीं--संबंध असल्यामुळं मला जरा जास्त अधिकारानं बोलतां येईल. परंतु त्याच्या अगोदर मी हे सांगूं इच्छितों कीं मनुष्य-शरीराप्रमाणंच राजवंशालाहि तारुण्य व म्हातारपण असतं. तारुण्य जास्त धोक्याचं व म्हातारपण कमी धोक्याचं असतं. बिंबिसारचा राजवंश तारुण्याच्या पलीकडे गेला आहे. कोणताहि राजवंश आपलं तारुण्य तीन-चार पिढ्यांपेक्षा जास्त काळ टिकवूं शकत नाही. नंतर त्याला म्हातारपण येतं. त्याला नष्ट करून नवा राजवंश आपलं तारुण्य घेऊन येतो. आपण आपल्या हातांनी मगध देशाला एक नवा तरुण राजवंश द्यावा अशी आपली इच्छा आहे काय ? "

गण-पति--" ही विचार करण्यासारखी गोष्ट आहे खरी. आपण लांडग्याच्या तोंडांतून सुटून सिंहाच्या गुहेंत शिरायची खटपट करता कामा नये."

मी--" आणि शिवाय एक योद्धा या नात्यानं विचार केला असतां मला असं दिसून येतं कीं मगध राजवंशाचा पराभव करणं व त्याचा उच्छेद करणं या दोन्ही गोष्टी एकच नव्हेत. पराभव तर आपण केलाच, पण उच्छेद करणं ही फार लांबची गोष्ट आहे. आमच्या सेना गंगा ते राजगृह याच्या दरम्यानच्या अंतरापैकी अर्धे अंतर तोडून पुढं गेल्या आहेत. आपल्याला हेहि कळलं आहे की नालंदाच्या पुढं मगधांनीं जबर-दस्त मोर्चेबंदी करून ठेवली आहे. ते मोर्चे आपण तोडून टाकूं शकूं ही मला खात्री आहे. पण त्या करतां आपल्याला कित्येक हजार लिच्छवि तरुणांचे बळी द्यावे लाग-तील. कित्येक महिने वज्जीला आपलीं सारी कामं बंद ठेवून फक्त युद्धांतच सारी शक्ति खर्च करावी लागेल. कोणीहि लिच्छवीच नव्हे, तर कोणीहि लिच्छवियानी देखील या सर्वस्वत्यागांत मागं हटणार नाहीं असा मला विश्वास वाटतो."

सुप्रिय—" याचं प्रत्यंतर तर लिच्छवियानीनीं आजकाल तत्परता दाखवून प्रत्यक्षच आणून दिलं आहे."

मी—" मग आपल्या सेनेला राजगृहाचा दुर्ग सर करावा लागणारच ? "

कांहीं अमात्य एकदम उद्गारले –" राजगृहाचा दुर्ग ? "

मी—" होय, कारण राजगृहाचा दुर्ग जोंपर्यंत आपण सर करीत नाहीं तोंपर्यंत बिंबिसारच्या राजवंशाचा उच्छेद आपणाला करतां नाहीं येणार."

गण-पति—" सेनापति! साऱ्या जंबुद्वीपांत प्रख्यात असलेला राजगृहाचा दुर्भेद्य दुर्ग तुम्ही पाहिला आहे?"

मी—" पाहिला नाहीं, पण त्याचं सैनिक-महत्व मी चांगलं जाणतों."

गण-पति—" सेनापति! नालन्दाच्या पुढील मोर्चे सर करायला जर कित्येक महिने लागले तर राजगृहाच्या दुर्गावर ताबा मिळवायला कित्येक वर्षं लागतील."

मी—" भन्ते गण-पति! हें मलाहि ठाऊक आहे. दक्षिणे कडील एक लहानशी गल्ली सोडली तर वैभार, विपुल, पांडव, इत्यादि पांच पहाडांच्या श्रृंखलांचा घेरा राजगृहाभोवती आहे. त्या पहाडांच्या शिखरांवर मोठमोठ्या शिलांचे प्राकार—विशाल दगडांची चिनी भित—अगदी लहानशा बोळाच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत उभे आहेत. या प्राकारांवर ठिकठिकाणीं सैनिक बसलेले असतात. तिथल्या एका मगध सैनिकाला मारण्याकरतां कित्येक लिच्छवींना प्राण द्यावे लागतील. बाहेरून वेढा देण्या-करतां एक तर आपल्याजवळ इतकं सैन्यहि नाहीं अन् असलं तरी बिंबिसारला कित्येक वर्षं राजगृहांत राहून काढतां येतील. या गिरिदुर्गाच्या आवारांत सुमागधा-सारखं विशाल सरोवर आहे. त्याच्या पाण्यावर पिकणारी हजारोंहजार करीष शेती आहे. म्हणून आपण राजगृहाला वेढा देऊन बिंबिसारच्या सैन्याला उपाशीं मारूं शकत नाही."

महानाम—" सेनापति! अन् आपण आक्रमण केलं तर? मला सैनिक दृष्टीनं या प्रश्नाची माहिती नाही म्हणून विचारतो."

मी—" अतोनात प्राणहानि होईल. पांची पर्वतांवर बांधलेल्या भिंती फोडायला आपल्याजवळ आतां कांहीच साधन नाहीं. आणि असलं तरी प्रथम तर पायथ्यापासून वर पर्यंत पहाड चढावे लागतील. आणि वरून एखाद्या दरडीच्या अगर झाडाच्या आड बसलेले धनुर्धर आमचं किती नुकसान करतील हें तुमचं तुम्हांला सहज कळूं शकेल. पुन्हां प्राकार ओलांडून जातांना दुर्गरक्षकांच्या प्रहारांनीं आपले कित्येक योद्धे मरतील हेंहि लक्षांत घ्या."

सुप्रिय—" इतक्या लिच्छवींचा बळी वैशाली देऊं शकते?"

मी—" द्यायची तयारी पुष्कळ असेल, पण आपल्याजवळ इतके बळीच नाहींत. तीन पिढ्या पूर्वीपासून प्रत्येक लिच्छवियानीनं वीस-वीस पुत्रांना जन्म दिला असता तर हें शक्य होतं."

महानाम—" अन् तितक्याच मुलींनाहि."

मी—" होय. हें तर खरंच. नाहींतर दुसऱ्याच पिढींत अ-लिच्छवि कुमारिकांशीं विवाह करून पुढची संततीच अ-लिच्छवि झाली असती. म्हणून भन्ते परिषद! आम्ही राजगृह सर करायचा संकल्प केला, तर तें सर करणं तर संदिग्ध आहेच. शिवाय आंधळे, लुले व पांगळे यांच्या जोडीला पंचावन्न साठ वर्षांच्या वरचे म्हातारे व पंधरा वर्षा खालचीं मुलं येवढाच लिच्छवि परिवार शिल्लक राहील यांत मात्र संदेह नाहीं."

सुप्रिय– " अन् लिच्छवियानींच्या बाबतींतहि तीच गत होईल."

मी—" अगदीं तीच गत नाहीं होणार. कारण लिच्छवियानींच्या सेनेत चाळीस पंचेचाळीस पेक्षां कमी वयाच्या स्त्रिया पंचवीस हजारां पेक्षां जास्त नाहींत. हो, पण युद्धानंतर बरीच मोठी संख्या अशा तरुण स्त्रियांची राहील कीं त्यांना लिच्छवि पती मिळण्याची आशा राहणार नाहीं."

महानाम—" सेनापति! ही तर फारच वाईट गोष्ट होईल."

मी—"होय, कारण आमच्या तरुण लिच्छवियानी पुरुषसंगाशिवायच आजन्म घरीं बसून राहतील अशी अपेक्षा आपण करूंच शकत नाही. मग त्यांचा संबंध अ–लिच्छवि आर्य, दास-कर्मकर यांच्याशीं येईल. त्यामुळं लिच्छवि रुधिराची तर हानी होईलच पण लिच्छवि-गणाच्या अस्तित्वालाहि धोका येईल. कारण अगोदर या लिच्छवियानींची संख्याच आमच्याहून जास्त असणार; अन् या बहुसंख्य लिच्छवियानीं आपली व आपल्या मुलाबाळांची हीन अवस्था चुपचाप सहन करणार नाहीत."

गण पति–" आपत्काली आपल्या लिच्छवि धर्मानुसार आपण विवाह बंधन शिथिल करूं शकतों. त्या मुळं एक पुरुष वीस स्त्रियांपासून संतति उत्पन्न करूं शकतो. पण हा संबंध फक्त संततीपुरताच असावा लागतो."

मी—" होय, गणपति! पण वीस लिच्छवियानी एका पुरुषाला पति मानून संतुष्ट राहायला तयार होणार नाहींत."

महानाम—" तर मग सेनापति! आपल्या मतानं बिंबिसारच्या राजवंशाचा उच्छेद करायला समर्थ होईल इतकी लिच्छवीची संख्याच नाहीं म्हणायची."

मी—" उच्छेदहि करायचा व त्याच्याच बरोबर लिच्छविगण बळकटहि करायचा."

गण-पति—" तर मग सेनापति! आपण काय करावं याबद्दल तुमचं मत तरी सांगा!"

मी—" आपली शक्ती अफूट राखून शत्रुसैन्याचं बळ खच्ची करावं व शत्रूची अवस्था अशी करून ठेवावी कीं जर त्यानं पुन्हां डोकं वर काढलं तर त्या वेळीं लिच्छवींची स्थिति चांगली असावी."

सुप्रिय—" लिच्छवींच्या पुढल्या पिढ्यांना शत्रुभयापासून मुक्त करायचा मार्ग आपल्याला ठाऊक नाहीं हें तर आम्हांला मान्यच आहे. "

मी—' बरोबर आहे. आपणच काय, पण कोणतीहि जाति किंबहुना देवतासुद्धां आपल्या साऱ्या पुढल्या पिढ्यांना दुष्मनाच्या भयापासून मुक्त करूं शकणार नाहींत."

सुप्रिय—" बरं, मग ? "

मी—" तात्पुरत्या तहाचीं बोलणीं होण्याचे आधी तलवारी म्यान करायसाठीं आपण मगध राजाला अशी अट घालावी कीं आमच्या सरहद्दीच्या नद्यांच्या पैलतीरापासून चार योजनां पर्यंतच्या हद्दीत शत्रु सेना राहूं नये व कायमचा तह होईपर्यंत आम्ही आपल्या सेना तिथंच ठेवाव्यात. "

यानंतर बराच वेळ आणखीहि बोलणी झाली पण शेवटी परिषदेनें माझ्या मताला मान्यता दिली.

त्याच रात्री संस्थागारांत गण-संस्थेची बैठक झाली. गणाने तात्पुरत्या तहाची माझी अट मान्य केली. माझे अभिनंदन करून मला लिच्छवि गणाचा सेनापति म्हणून नियुक्त केलें व परिषदेला कायमच्या तहाच्या अटी ठरविण्याचा अधिकार दिला.

दुसऱ्या दिवशी सकाळीं मी उल्काचेलला सेनानायक कपिल याला लिहिलें कीं मगध राजाला ही अट मंजूर असेल तर लढाई थांबवावी व संधिदूतांना माझ्याकडे घेऊन यावें.

राजा बिंबसार आपल्या सेनापतीचा मृत्यू व उपसेनापतीची कैद यांमुळें फारच शोकाकुल व चिंतित झाला होता असें मला मागाहून कळलें. या युद्धालाच मुळीं तो तयार नव्हता त्यामुळं युद्धाचा हा परिणाम पाहून तो कुमार अजातशत्रु व त्याचे सल्लागार यांच्यावर फारच नाराज झाला. ब्राह्मण वर्षकारानें चलाखी करून राजाची मर्जी आपल्यावरून कमी होऊं दिली नाही माहुत नालागिरीसमवेत माझें पत्र घेऊन तेथे गेला व त्याने लिच्छवि सेनापतीची—मी त्यावेळीं उपसेनापति होतों—प्रशंसा केली. त्यावेळीं बिंबिसारनें म्हटलें, ' अशा लोकांशी लढणं फारच गैर. ' तात्पुरत्या तहासंबंधांतील आमच्या अटी कुमाराचे चाललें असतें तर त्यानें मान्यच केल्या नसत्या. पण राजाने मान्यता देऊन आपले महामात्य वर्षकार व अमात्य ( मंत्री ) सुनीथ यांना कायम तहाच्या वाटाघाटी करण्यासाठीं नियुक्त केलें. सैन्याला युद्ध बंद करून सरहद्दी पासून चार योजनें मागें हटण्याची आज्ञा केली. पाटलिग्रामाच्या [ पाटणा ] युद्ध क्षेत्रांत चार योजनांची अट पुरी करण्याकरतां आम्हांला जरी मागें हटावें लागलें, तरी परंतु दक्षिण सरहद्दीचा अधिकांश भाग व सबंध पूर्व सरहद्दीवर आम्हांला आमच्या सेना चार योजने पुढे नेऊन आपला अधिकार स्थापन करावा लागला. "

विजयाची वातमी ऐकतांच वज्जीभूमींत ठिकठिकाणीं विजयोत्सव सुरू झाला. उल्काचेलमध्यें मला आपल्या कामांतून वेळ काढून आसपासच्या लिच्छवि महल्लकांचे [ वृद्धांचे ] धन्यवाद घेण्यासाठीं बाहेरच्या आंगणांत कित्येक दिवस येरझारा कराव्या लागल्या. गणानें सात सात दिवसांनीं साऱ्या वज्जीभूमींत विजयनक्षत्र जाहीर केले. त्या दिवशीं सारी वैशाली तोरणें, व ध्वजा-पताकांनी सजविण्यांत आली होती. रस्त्यांतून सडे घालून रांगोळ्या काढल्या होत्या. दरवाजांतून पाण्यानें भरलेले कलश ठेवले होते. वैशाली आपल्या विजयी पुत्राचे स्वागत अंतःकरणापासून करूं इच्छीत होती. मी युद्धक्षेत्रावरून कित्येक वाहिनींना व सेनानायकांना बोलाविले. त्यांत पायदळ, घोडेस्वार, रथी, गजारोही होते. शिवाय डाव्या खांद्यावर वल्हे व उजव्या हातांत भाला घेतलेले नौ-सैनिक ( खलाशी ) होते. त्याचप्रमाणें भामाच्या नेतृत्वाखालीं लिच्छवियानींची सेना व वैद्यहि होते.

आमच्या सैनिक मिरवणुकीत अग्रभागीं गण-पति, नंतर मी, नंतर हत्ती, मग घोडेस्वार, मग पायदळ, नंतर रथी, मागून नौ-सैनिक, त्यांच्या मागून लिच्छवियानींची सेना—स्वार व पायदळ दोन्ही—जखमी लोकांच्या पालख्या, नंतर आचार्य अग्निवेश यांच्या नेतृत्वाखाली वैद्य असा अनुक्रम होता. या मिरवणुकींत सामील होण्याकरतां कपिल, असरू, शंतनु, वैद्य अग्निवेश, व भामा देखील आली होती हें सांगायला नकोच. जखमी लोकांच्या सोईसाठी, आम्ही चिकित्सा-विभागांतील थोड्याच लोकाना मिरवणुकीला बोलावूं शकलों; आणि याच कारणामुळें रोहिणी येऊं शकली नाहीं असें मला वाटलें. या मिरवणुकीने सूर्योदयाबरोबर वैशालीच्या दक्षिण द्वारात प्रवेश केला; व शहरांतील सगळ्या मोठमोठ्या रस्त्यातून ती फिरली. शहरांत राहिलेल्या स्त्री-पुरुषानीं व बाल-वृद्धांनी सैन्यावर फुलांचा व लवंगांचा वर्षाव केला. वैशालीचे कित्येक पुत्र या युद्धांत मारले गेले होते. पण या विजयानंदांत त्यांच्या आप्तेष्टांना आपल्या साऱ्या शोकाचा विसर पडलेला होता.

रात्रीं दीपोत्सव होणार होता. परंतु मी, कपिल, अमरू तसेंच इतर कित्येक सेनानी दोन प्रहरीच अगोदर उल्काचेलला व तेथून पाटलिग्रामला परत गेलों.

कायम तहाची काळजी आम्हाला नव्हती, पण मगधांना होती. आम्हीं आतां निश्चित होतों. सगळीकडून बातम्या आल्या कीं शत्रु-सेनेनें तहाच्या अटी अक्षरशः पाळल्या आहेत. वस्तुतः पंचवीस वर्षांपूर्वीच्या युद्धातहि मगधाची इतकी मनुष्यहानी नव्हती झाली व इतकी जबरदस्त हारहि खावी लागली नव्हती त्यांना.

युद्धांत संलग्न होण्याच्या आधी तीन महिन्यांपासून मी जेवण-झोंप विसरलों होतों. या मुदतींत रोहिणी माझ्या जवळ फार तर दोन चार दिवस राहिली असेल. परंतु ती माझ्या जवळ नाहीं अशा तऱ्हेच्या एकांततेचा अनुभव घ्यायला सुद्धां मला

फुरसद नव्हती. आतां ती महान् कार्यसंपन्न झाली होती. या पिढीच्या लिच्छवींच्या बाबतींतील माझ्या कर्तव्याचे पालन मी केले होतें. आतां कामहि थोडें उरलें होतें. त्यामुळें रिकामा होतांच मला रोहिणीची आठवण होऊं लागली. परंतु ही काळजी मला सारी एकच दिवस-रात्र करावी लागली. दुसऱ्याच दिवशी सकाळीं मी अंथरुणांतून बाहेर येऊन तंबूच्या दारांत उभा होतों तोंच रोहिणी समोरून येतांना दिसली. मी धांवत जाऊन तिला उचललें व माझ्या हार्दिक भावांना वाचा फुटली —" माझी उषा ! उषे सारखीच लाल, उषे प्रमाणंच आनंदाचा प्रकाश फैलावत तूं ह्या अरुणोदयकाळीं आलीस. काल पासूनच मी तुझा वियोग सहन करायला असमर्थ झालों आहे. रोहिणी ! इतका व्याकुळ मी कधींच झालों नव्हतों ग ! "

रोहिणी—" आर्यपुत्र ! हें स्वाभाविक आहे. आम्ही ज्या कार्यांत मग्न होतों त्यांत इतर गोष्टीची आठवण येणं शक्य नव्हतं. मी काल आईच्या जवळ होत्ये म्हणून येतां आलं नाही. आर्यपुत्रांना अ-क्षत-शरीर पाहून मला किती आनंद होत आहे. आणखी एक खूप आनंदाची बातमी सागूं ? "

मी—" प्रिये, सांग ना ! "

ती जरा लाजून गप्प बसली.

मी—" प्रिये ! आनंदाची गोष्ट लपवायची ? "

" माझं वजन वाटलं आहे. " असे म्हणून रोहिणीनें लाजून खालीं मान घातली.

मी तिच्या मुखाचें वारंवार चुंबन घेऊन स्वतःचे हर्षाश्रु पुसून म्हणालों— " प्रिये, लिच्छवीची आम्हाला गरजच आहे आम्ही पुष्कळच वीर गमावून बसलों आहोत पण बिंबिसारनं किंवा आम्ही पंचवीस वर्षा पूर्वीच्या युद्धात जेवढे गमावले तेवढे नाहीं गमावले या वेळीं. प्रिये, किती दिवस झाले ? "

रोहिणी—" आपण मागल्या वेळी केव्हां भेटलो होतों आर्यपुत्र ? "

मी—" एक महिना झाला असेल. "

रोहिणी—" मग तितकेच दिवस. "

तिचा डावा हात मी आपल्या हातांत घेतला त्याच वेळीं तिनें स्स् केलें. मी हात सोडून घाबरून म्हणालों—

" प्रिये, काय झालं ? "

" हाताला जखम झाली आहे. "

मी हात धरून पाहिलें. त्याला चार बोटें लांबीची चीर पडली होती व तीवर पट्टी चिकटवली होती.

मी—" ही जखम अजून बरी झाली नाहीं ? "

रोहिणी--" आतां पुष्कळ बरी आहे; पण दाबल्यावर दुखणारच."

मी--" ही जखम कशी झाली?"

रोहिणी--" जखमी शिपायांना उचलून आणतांना झाली. आह्मी मागध घायाळांनाहि उचलीत होतों. एक घायाळ बहुतेक वातांत असावा किंवा त्याला वाटलं असावं की मी त्याला मारायलाच आल्यें आहे म्हणून त्यानं भाला चालवला."

मी--" घायाळांना उचलणंहि धोक्याचं काम होतं तर?"

रोहिणी--" विशेषतः शत्रूच्या घायाळांना उचलणं तर होतंच."

रोहिणी आतां माझ्या जवळ होती. म्हणून माझ्या जीवनांतील एकांतता--नीरसता जाऊं लागली.

मला जास्त दिवस वाट पहावी लागली नाहीं. बिंबिसारचे संधिदूत वर्षकार व सुनीथ आले. त्यांनी मंगल हत्ती परत पाठवल्याबद्दल बिंबिसारच्या वतीनें कृतज्ञता प्रगट केली व सांगितलें कीं लिच्छवि गणांबरोबर कायमची मैत्री जोडायला मगधराज तयार आहे."

मी मागध अमात्यांना वैशालीला घेऊन आलों. परिषदेने मला व गण-पतींना बोलणीं करण्यासाठीं नियुक्त केले. आह्मी संधिदूतांशी बोलणी करायची; मग परिषदेत विचार करायचा; असें झाल्यावर संधिदूतांना दोन वेळां राजाकडे मनुष्य पाठवावा लागला. शेवटी आमच्या अटी अशा ठरल्याः--

( १ ) दहा वर्षे पर्यंत गंगा, कमला व वल्गुमुदा [ वाग्मती ] या नद्यांचा किनारा व त्याच्या लगतची एक कोस वरची जमीन यांवर लिच्छवीचा अधिकार राहील.

( २ ) जी युद्ध-सामुग्री लिच्छवींच्या हातीं आली आहे, ती त्यांच्याकडेच राहावी व जी लिच्छवींची सामुग्री मगध-सेनेला मिळाली आहे ती ताबडतोब लिच्छवीकडे परत पाठवावी.

( ३ ) उभय पक्षाचे युद्धबंदी सोडून दिले जातील. प्रथम मगधराजाने सोडावेत.

( ४ ) लिच्छवि प्रजेवर मगधमध्ये जो अत्याचार झाला आहे, त्याची नुकसान-भरपाई द्यावी लागेल.

( ५ ) वरील अटी अमलात आल्या नंतर लिच्छवि सेना मागें घेतली जाईल.

आमच्या परिषदेच्या या अटी घेऊन मगध अमात्य राजगृहाला परत गेले.

म्हाताऱ्या बिंबिसारनें कुमार अजातशत्रूला देखील सल्ला देण्याकरतां बोलाविलें, व लिच्छवींच्या तहाच्या अटींवर विचार करण्यास सांगितलें. प्रथम तर तो म्हणाला कीं आपण राजे आहांत, आपणच या स्वीकारायच्या का नाकारायच्या तें ठरवा. यावर बिंबिसारनें समजूत घालण्याच्या हेतूनें म्हटलें-- " मुला! लिच्छवि आपले शेजारी आहेत. त्यांच्याशीं आपल्याला नेहमीं संबंध ठेवावा लागेल. मी आतां

म्हातारा झालों आहे; नंतर तुलाच राज्य सांभाळावं लागेल, लिच्छवि शेजाऱ्यांशीं निभावून घ्यावं लागेल. "

अजातशत्रु—" महाराज ! माझी वेळ येईल तेव्हां माझं मी पाहून घेईन. "

बिंबिसार--" म्हणजे तूं पुन्हां लिच्छवींशीं अशाच प्रकारचं युद्ध उभं करणार व आपल्या राजवंशाची प्रभुता धोक्यांत घालणार? "

अजातशत्रु—" महाराज ! मी लिच्छवींचा सत्यानाश करून सोडीन. पण ती माझ्या वेळची गोष्ट आहे. यावेळीं आपल्या मर्जीला वाटेल तें आपण करा. "

बिंबिसार--' मग तुला लिच्छवींशीं मैत्री नको आहे ? बाळ, हें फार वाईट आहे. लिच्छवि हा गण आहे; तो परक्या देशाचं अपहरण करूं इच्छीत नाहीं. नाहींतर यावेळीं त्यांची तयारी अशी होती कीं त्यांनीं मनांत आणलं असतं तर सर्व अंग, मगध व पाठा आपल्या आधीन करून आमच्या राजवंशाचा संहार केला असता.

" मला हें पटत नाही. गिरिव्रज [ राजगृह ] जिंकणं इतकं सोपं नाहीं. पण मी यांत लक्ष घालूं इच्छित नाहीं. " असे म्हणून अजातशत्रु उठून चालता झाला.

राजा बिंबिसारला तऱ्हाच्या अटी स्वीकारणें भागच होते.

पावसाळयाच्या शेवटीं शेवटीं आमचे सामरिक जीवन समाप्त झालें. फक्त सर-हद्दीवरील फौजा तेवढ्या राहिल्या. आम्ही लोक वैशालीला परत आलों.

## ( २२ )

# बुद्धाचा अनुयायी

आता मी सेनापति होतों; म्हणून सैन्याच्या व्यवस्थेसंबंधांतील कार्यात मला पुष्कळ वेळ घालवावा लागे. पण आतां तितकी गडबडहि नव्हती व काळजीहि नव्हती. पावसाळा सुरू झाल्यानंतर जास्तच वेळ मिळे. कपिल, शंतनु, अमरू इत्यादि माझे वीर मित्र व भामा, क्षेमा आदि स्त्रियांबरोबर गप्पा गोष्टी करायला रोज वेळ मिळत असे. आतां भामाने खरोखर माझ्या जैनव्रतावर मधुर प्रहार सुरू केले होतें. शरीराला ताप देऊन पापाचें परिमार्जन करणें व अहिंसा यांच्या पुरस्कारार्थ जें कांहीं सांगायचें होतें तें सर्व एक दोन दिवसांतच संपलें. नंतर फक्त गप्प राहून तिचे आक्षेप ऐकून घेणें भाग होते. घरांत माझ्या समोर तऱ्हेतऱ्हेच्या मांसाचा स्वाद सर्वजण घेत व मद्यपान करून नृत्यांत मग्न होत असत; व मला जाति-बहिष्कृताप्रमाणें चुपचाप

वेगळें बसून टकमकां बघत राहावें लागे—ही परिस्थिति तिच्या आक्षेपांपेक्षांहि अधिक असह्य होती.

एक दिवस आम्ही गणाच्या कामाकरतां संस्थागारांत जमलों होतों. काम संपल्यानंतर नेहमीं प्रमाणें सभासदानीं अवांतर गोष्टी सुरू केल्या. एकानें म्हटलें– " आज काल वैशालीचं मोठं भाग्य आहे. एक नव्हे दोन-दोन महान धर्माचार्य, गणाचार्य, तीर्थंकर आपल्या परिषदे बरोबरच इथं वर्षावास करीत आहेत ;—– श्रमण गौतम महावनांतल्या कूटागारांत आपल्या पांचशें शिष्यांना घेऊन उतरले आहेत. अन् निगंठ ज्ञातृपुत्र, बहुपुत्रक चैत्य याच्या घरीं उतरले आहेत. "

दुसरा म्हणाला—" वैशालीवासींना लाभ आहे, सुलाभ आहे हा. म्हणूनच त्यांना अशा महान धर्माचार्यांचा उपदेश ऐकायला मिळतो आहे. "

तिसरा म्हणाला—"बंधूंनो ! श्रमण गौतम याची प्रतिभा व ऋद्धिमत्ता यांबद्दल काय सांगावं ! आज साऱ्या जंबुद्वीपांत त्यांची ख्याती आहे. त्याच्या शिष्यांत कुठले लोक नाहीत असं नाहीच. "

यावर गण-पति म्हणाले—" धर्माचार्य व त्यांचे धर्म याबद्दल मला कांहीं विशेष आवड नाहीं. तरीहि गौतमांची मावशी [ प्रजापती गौतमी ] व त्यांची पत्नि [ यशोधरा किंवा भद्रा ] पायी चालत येऊन वैशालीला पोंचल्या तो दिवस मला आठवतो. गौतमांची पत्नी यशोधरा त्यावेळीं ऐन तारुण्यांत होती. तिच्या सौंदर्या-बद्दल तर सांगायलाच नको. ती एकाच जनपदाची नव्हे तर अनेक जनपदांची कल्याणी झाली असती. कपिलवस्तुपासून येथपर्यंत पायीं चालत आल्यामुळं तिचा चेहरा उतरलेला होता. तिच्या लाल ओठांना चिरा पडल्या होत्या तिच्या पायाना जखमा झाल्या होत्या. ज्या लोकांनीं नुसतं ऐकलंच होतं कीं गौतमानं शाक्यगणांतला आपला पिता शुद्धोदन याच्या समृद्ध कुलाचा त्याग करून भिक्षाचर्येचा स्वीकार केला आहे, त्यांनीं यशोधरेच लावण्य पाहिलं तेव्हां गौतमाचा महान् त्याग त्यांना मूर्तिमंत दिसला. मला शाक्य गण-पति शुद्धोदन यांचं नांव व त्यांची योग्यता चांगली ठाऊक होती. म्हणून मी गौतमांचा धर्म ऐकायची कधीं उत्सुकता दाखवली नसली तरी त्यांच्या व्यक्तित्वाबद्दल मला फार आदर आहे. शिवाय आम्हां लिच्छवींचे ते परम मित्र आहेत. आमच्या इथं महामारीचा रोग पसरला होता तेव्हां त्यांनींच येऊन आम्हांला धीर दिला. आतां मगधराजाकडून आमच्यावर आक्रमण होणार होतं त्यावेळीं त्यांनीं आमची अजेयता दाखवून मगधराजाला समजावण्याचा प्रयत्न केला. पण या युद्धाचा प्रवर्तक बिंबिसार नसून अजातशत्रु होता. जर बिंबिसारनं त्याचं म्हणणं ऐकलं नसतं तर त्यानं आपल्या पित्याला बंदीगृहांत टाकलं असतं, हे बिंबिसार पक्कं जाणून होता. "

पहिला लिच्छवि—" श्रमण गौतम यांच्यांत मोठं आकर्षण आहे. त्यांचे विरोधीहि म्हणतात कीं गौतमांच्या जवळ आवर्जनी माया आहे. तिच्या जोरावर ते दुसऱ्यांचीं मतं बदलवतात. त्यांची आवर्जनी माया म्हणजे कांहीं जादूटोणा नव्हे. त्यांच्या बोलण्याची पद्धतच फार गोड आहे. लहान मुलापासून म्हाताऱ्यापर्यंत व गरिबापासून प्रसेनजित किंवा बिंबिसार पर्यंत त्यांचा व्यवहार समानतेचा व स्नेहपूर्ण आहे. त्यांच्या प्रतिभेबद्दल तर बोलायलाच नको. आमच्या इथं एक नंगटा सच्चक होता. वाद करण्याकरितां तो सर्व जंबुद्वीप फिरून आला होता; पण त्याचा कोणींहि पराजय करूं शकला नाही अशी त्याची ख्याती होती. त्यानं वैशालीला येऊन अपरिमित पाखंड पसरवलं. एका थोडयाशा क्षेत्राच्या बाहेर न जाण्याची त्यानं प्रतिज्ञा केली होती. शिवाय त्याची आणखी एक अशी प्रतिज्ञा होती कीं भोजनांत फक्त मांस व पिण्यासाठीं फक्त दारू एवढंच त्याला पाहिजे. लोक त्याला महान् सिद्ध मानीत होते. गौतमाचा माझ्यापुढं काय पाड लागणार, अशा तो फार फुशारक्या मारीत असे. पण एक दिवस श्रमण गौतमांशीं गांठ पडली मात्र, मग सच्चकाच्या तोंडून शब्दहि फुटेना. "

बराच वेळ तऱ्हेतऱ्हेच्या गोष्टी होऊन लोक आपापल्या घरीं गेले. त्यावेळी मी रोज संध्याकाळी नियमानें निगंठ ज्ञातपुत्र महावीर यांच्या दर्शनाला जात असे. त्या दिवशीं मी त्यांना विचारलें—" भगवान् ! श्रमण गौतम इथं आले आहेत. लोक त्यांची फार प्रशंसा करतात. पण आपल्यापुढं त्यांचा काय पाड ? त्यांना बघायची मला फार इच्छा आहे. "

महावीर—" नको सिंह ! त्याच्याकडे काय जाणार ? तो नास्तिक आहे, तो नाहीं मानत आत्मा, नाही मानत परलोक. "

माझा उत्साह कमी झाला, व गौतमाकडे जाण्याचा विचार मी सोडून दिला.

पुष्कळ दिवसांनीं पुन्हां संस्थागारात पहिल्या सारखीच अवातर गोष्टींची चर्चा चालू झाली. अनेक राजे व धर्माचार्य याच्या विषयी लोक बोलत होते; त्यांत पुन्हां गौतमाची गोष्ट निघाली.

पहिला लिच्छवि—" श्रमण गौतमांना बुद्ध म्हणतात. ते खरोखरच बुद्ध आहेत. त्यांचा बोध अपार आहे. दुसऱ्यांनाहि ते बोधमार्गाचा--ज्ञानमार्गाचा--उपदेश करतात. त्यांना अंधभक्ती वा श्रद्धा पसंत नाहीं. "

दुसरा लिच्छवि—" केसपुत्रीय कालामा यांना त्यांनीं कसा सुंदर उपदेश केला होता तो आपण ऐकलाच असेल. केसपुत्र हा कोसलमध्यें एक मोठा गांव जंगलाच्या तोंडाशीं आहे. श्रावस्तीला जाणाऱ्या प्रत्येक सार्थाला तिथं एक दिवस थांबावं लागतं. मीहि एकदां दोन दिवस व दोन रात्री आपल्या सार्थाबरोबर तिथं थांबलों होतों.

गांवांतले सारे कालाम बुद्धाचे श्रावक [ शिष्य ] आहेत. कधीं काळीं कालामांचाहि एक छोटासा गण होता. परंतु आतां तो कोसल राज्याच्या पोटांत गडप झाला आहे. फिरत फिरत श्रमण गौतम केसपुत्राला पोचले तेव्हां कालामांनीं त्यांना प्रश्न केला होता कीं ' जितके तीर्थंकर, जितके धर्माचार्य भेटतात, ते सर्व एकमेकांच्या विरुद्ध धर्माचा उपदेश करतात. आम्ही त्यांपैकीं कोणाचं सांगणं खरं समजावं ? ' गौतमानीं काय उत्तर दिलं ठाऊक आहे ? त्यांचं उत्तर फारच सरळ व सुंदर होतं. 'सोन्याच्या खरे-खोटेपणाची गोष्ट दर सोन्याच्या मागं धांव घेऊन कळत नाहीं; तर त्याचा खरें-खोटेपणा आपल्या हातची कसोटी सिद्ध करते, म्हणून कालामहो ! तुम्ही कुठल्याहि धर्माचार्याचं रूप-सौदर्य, भाषा-सौदर्य, त्याची लोक-प्रसिद्धी पाहून त्याचा उपदेश ग्रहण करूं नये. उलट तुम्ही स्वतःची बुद्धि व अनुभव याची कसोटी लावावी. ' रुप-सौदर्य, भाषा-सौदर्य व लोकप्रसिद्धी या सर्व गोष्टी गौतमांना अनुकूल असूनहि त्यांनीं किती खरी गोष्ट सागितली ! "

दुसरा लिच्छवि-" मला गौतमांच्या आणखी एका गोष्टीची आठवण येते. सर्व धर्माचार्य आपल्या शिष्याना सांगतात की आमचा उपदेश बंदरमुष्टी प्रमाणं धरून ठेवा, पण गौतमांचं सागणं याच्या अगदीं उलट आहे त्यानी एकदा उपमा दिली होती : ' कोणी मनुष्य पावसाळ्यांत अचिरवती [ रापती ] नदीच्या किनाऱ्यावर जातो, नदी दुथडी भरलेली आहे. तिथं एखादी नाव किंवा नावांचा पूल नाही. मनुष्याला पैलतीरी जायचं आहे म्हणून तो विचार करूं लागतो. नंतर लाकडं जमवून तो एक तराफा बनवतो व त्यावर बसून काठीनं वल्हवीत नदीपार जातो. हा तराफा त्या माणसाला किती उपकारक झाला हे सागण्याची गरज नाही. पण त्या उपकारामुळं आदर वाटून तो तराफा डोक्यावर घेऊन तो मनुष्य गांवातून हिंडू लागला तर लोक त्याला निव्वळ मूर्ख म्हणतील. तराफा हा पैलतीरीं जाण्याकरता आहे, डोक्यावर घेऊन वहाण्याकरतां नव्हे सूर्खा ! असंच सर्व म्हणतील '. ही उपमा देऊन गौतमांनी आपल्या शिष्याना काय सांगितलं ते ठाऊक आहे ? ते म्हणाले- ' तराफ्याप्रमाणे माझा उपदेश फक्त पलीकडे जाण्याकरतां आहे. तो पकडून राखून ठेवण्याकरतां नाही. ' "

त्या दिवशीं मला पुन्हां गौतमांच्या भेटीची उत्कंठा झाली पण जेव्हां मी निगंठ ज्ञातृपुत्रांशीं बोललों तेव्हा ते म्हणाले—" सिंह ! त्या अक्रियावादी [ चांगली वाईट क्रिया न मानणाऱ्या ] कडे जातोस ? "

आणखीहि पुष्कळ गोष्टी सांगून त्यांनी मला मनाई केली. निगंठ ज्ञातृपुत्रांच्या ठिकाणीं माझी इतकी श्रद्धा होती कीं त्यांचें बोलणें ऐकून मी आपला संकल्प पुन्हां सोडून दिला.

दोन्ही धर्माचार्य पावसाळ्याचे तीन महिने वैशालीत घालवण्यासाठीं राहिले होते व आम्हांला वेळोवेळीं संस्थागारांत जमावेंच लागत असे. संस्थागारांत बसून बोलणारे पुरुष सर्वसाधारणपैकीं नसून मोठमोठे संभावित लिच्छवि असत. एक दिवस गोष्टी निघतां निघतां पुन्हा गौतमांचा विषय निघाला.

सुप्रिय म्हणाला—" भाई ! साधू गौतम यांचा आम्हां गण-क्षत्रियांना फार अभिमान आहे. आजपर्यंत ब्राह्मण आम्हां गण-वाल्यांना मेंढा नाहीं पण लढाऊ रांडगा म्हणूनच फक्त मानत होते. ते ब्राह्मण आम्हांला विद्या-बुद्धिहीन म्हणून आमचा तिरस्कार करीत होते. परंतु आज अंग-मगचे कूटदंत स्वर्णदंड यांच्या सारखे तिन्ही वेदांचे ज्ञाते महाप्रसिद्ध ब्राम्हण श्रमण गौतमांचे श्रावक आहेत वज्जी-विदेहांमधील अद्वितीय विद्वान व वृद्धब्राम्हण दीर्घायु गौतमांचे श्रावक आहेत. कोसलचे चंकि व पौष्करसाति यांच्या सारखे पांच–पांचशे विद्यार्थ्यांना वेद शिकवणारे राजगुरु महा-शाल ब्राह्मण श्रमण गौतमांना आपले गुरु व एक महान ऋषि मानतात. ब्राह्मण आपले अष्टक, वामदेव इत्यादीना सोडून एखाद्या गण-संतानाला ऋणि मानतील ही कल्पनाहि आली नसती कुणाला. इतकेंच नव्हे तर श्रमण गौतमाचे शिष्य सारि-पुत्र, मौद्गल्यायन, महाकाश्यप, महाकात्यायन यांच्या सारख्या अद्भुत प्रतिभा-शाली ब्राह्मणांनी आपलं ब्राह्म–कुल सोडलं आहे. ते आपली विद्या व प्रतिभा यांत इतके पारंगत आहेत की त्यानीं मनांत आणलं असतं तर त्यांनीं आपलं वेगळं तीर्थ [ मत ] चालवलं असतं. व निगंठ ज्ञातृपुत्र, संजय वेलट्ठिपुत्र किंवा मक्खलि गोसाल यांच्याहूनहि मोठे तीर्थंकर म्हणून त्यांना मान्यता मिळाली असती. परंतु ते श्रमण गौतमांना आपला शास्ता [उपदेष्टा] मानतात. कुरु-पांचाल म्हणजे ब्राह्मणांच्या मतें वेद व ज्ञान याची जणूं खाणच, पण तिथेंहि आज गौतमांचा उपदेश मोठ्या गौरवानं ऐकतात. तक्षशिलेचे प्राचीन गण-पति कप्पिन हे गौतमाचा उपदेश दुसऱ्यांच्या तोंडून ऐकून साठ योजनं चालून शाक्य-पुत्रांच्या श्रमणांत [ बौद्धभिक्षूंमध्यें ] शामील झाले हें आपणां पैकीं किती तरी जणांना ठाऊकच असेल. "

महानाम—" हातांतल्या मधुगोलकाच्या गोडीची प्रशंसा शब्दांनीं करायची गरज नाही, तो जिभेवर ठेवल्यानं ती कळतेच आजकाल दररोज संध्याकाळीं हजारों स्त्री-पुरुष महावनांतील कूटागरशाळेंत जाऊन श्रमण गौतम यांचा उप-देश ऐकतात व सर्वजण त्याची स्तुति करायला कंटाळत म्हणून नाहींत. "

त्या दिवशीं पुन्हा माझें मन गौतमांकडे जाण्याकरतां अत्यंत उत्कंठित झालें. नित्याप्रमाणें आज निगंठ ज्ञातृपुत्र यांच्या दर्शनाला गेलों तेव्हां त्यांना म्हणालों—

" भन्ते ! हे श्रमण गौतम कोण आहेत तें मला माहीत नाही. मी फक्त त्यांचं नांव ऐकलं आहे. पण लिच्छवि त्यांची फार प्रशंसा करतात. आपल्या

सारखं तप-तेज तर त्यांच्या जवळ नसेलच असं मला वाटतं. एकदां जाऊन श्रमण गौतम यांची भेट घ्यावी व त्यांच्याशीं बोलावं अशी माझी इच्छा आहे. ”

महावीर—“ सिंह ! तूं त्या तप-तेज-हीन इसमाकडे जाणार ? तो तर गादीवर निजतो, काशीची मऊ मऊ कौषेय वस्त्रं परिधान करतो. तऱ्हेतऱ्हेचं स्वादिष्ट मांस चवीनं खातो. त्याच्या जवळ तपस्येचा वास तरी सांपडेल का ? ”

मी—“ भन्ते ! येवढ्याच साठीं मी त्यांना एकदां प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहतों आणि मोहांत सांपडलेल्या लिच्छवींना त्यांची चूक दाखवून देईन म्हणतों. ”

महावीर—“ सिंह ! आवर्तनी माया [ जादू ] आहे त्याच्या जवळ. बस्स. आणखी कांहीं नाहीं. तिच्या योगानं तो दुसऱ्यांची मनं आपल्या ताब्यांत घेतो. सिंह ! त्या मायावी इसमाच्या जवळ देखील जाऊं नकोस तूं ! ”

निगंठ ज्ञातृपुत्रांनी आणखीहि अनेक परीनी समजावून मला तिकडे जाण्यापासून परावृत्त करायची खटपट केली, पण त्याचा माझ्यावर उलटा परिणाम झाला. तेथून उठून चालूं लागतांच वाटेत मी मनांतल्यामनात म्हटले-‘मी आपली विद्या-बुद्धि काही निगंठ ज्ञातृपुत्रांना विकलेली नाही. तपास करायसाठीं मला कुठं जायला-यायला अट-काव करायचा यांना काय अधिकार ? मोठमोठे लिच्छवि ज्या गौतमांची इतकी स्तुति करतात ते कसे आहेत तें पाहिलंच पाहिजे. ते आहेत कसे, त्याच्यांत काय गुण आहेत तें मी स्वतःच जाऊन पाहणार. ’

संध्याकाळी पुष्कळसे लिच्छवि-लिच्छवियानी कूटागार शालेकडे गौतमांच्या दर्शनास जात होते. या मंडळीत माझी आई, काकी अन् रोहिणी देखील होती. मीहि त्यांच्या बरोबर सटकलो. भामाची नजर माझ्याकडे वळली तेव्हा ती गपचुप माझ्या जवळ आली व माझा हात धरून म्हणाली—

“ भाऊजी ! आज आहे काय हें ? त्या नंग्या श्रमणाला सोडून इकडे कुठं चाललांत ? आज हें उंबराचं फूल कसं काय उमललं ? ”

मी-“ भामा ! तूं मोठ्या श्रद्धेनं श्रमण गौतम यांचा धर्मोपदेश ऐकायला चालली असशील. मग अशा तऱ्हेनं हास-परिहास करतांना तुला संकोच कसा वाटत नाहीं ? ”

भामा—“ श्रमण गौतमांना शरीर व मन याचं स्वास्थ्य पसंत आहे. त्यांना शरिर कष्टवून मारणं पसंत नाहीं. ”

मी—“ अस्सं, तर मग तुम्ही सगळयाजणी गौतमांच्या पक्क्या श्राविका बन-लांत म्हणायच्या ! ”

भामा—"गौतमांच्या जवळ कच्च्या पक्क्याचा प्रश्न नाहीं. सर्वांनीं आपल्या वर्तमान स्थितीच्या पुढं जावं, आपली उन्नती करून घ्यावी, व उन्नतीच्या मार्गावरील माणसास पाहून खूष व्हावं."

मी—"आपल्या साथी लिच्छवियानी सेनेला गौतमाची सेना करायचा तर तुझा बेत नाहीं ना?"

भामा—"साऱ्या सेनेच्या परिवर्तनाचा इथं प्रश्नच नाहीं भाऊजी. इथं तर प्रत्येकानं स्वतःच्या विषयी स्वतःच निर्णय करायचा आहे."

मी—"वहिनी! आई व काकी कधीपासून उपदेश ऐकूं लागल्या आहेत?"

भामा—"त्या तर कोण जाणे कित्येक वर्षांपासून ऐकत आहेत. मला वाटतं तुम्ही तक्षशिलेला होतां तेव्हांपासून असावं बहुधा. त्यांच्याच सांगण्यावरून मी पहिल्या दिवशीं इथं आल्ये."

मी—"आणि रोहिणी?"

भामा—"तुम्ही त्या नंग्या श्रमणाचा उपदेश ऐकायला रोज नेमानं जात होतां. मी ही इकडे येऊं लागल्ये. बिचारी एकटी घरात बसून राहात होती. मी रोहिणीला म्हणाल्ये, 'चल, तूंहि श्रमण गौतमाचं दर्शन घेऊन ये.'"

मी—"म्हणजे मला समजल्याशिवाय माझ्या घरात श्रमण गौतमांचा अधिकार सुरू झाला म्हणायचा."

भामा—"भाऊजी! असं दिसतंय खरं. एक दिवस तर रोहिणी श्रमणांचा उपदेश ऐकल्यानंतर म्हणाली देखील—'भगवान हा जो माझ्या गर्भात आहे, त्याच्या वतीनं देखील मी बुद्ध-धर्म-संघाला शरण जात्यें.'"

मी—"बुद्ध-धर्म-संघाला शरण?"

भामा—'श्रमण गौतमाच्या धर्माचा जो स्वीकार करतो तो या त्रिरत्नांना—बुद्ध-धर्म-संघाला—शरण जातो. म्हणजेच याना आपला मार्ग-दर्शक मानतो."

मी—"शरण याचा अर्थ समजला. पण ही त्रिरत्नाची काय भानगड आहे?"

भामा—"बुद्ध, धर्म, संघ, यांना त्रिरत्न म्हणतात. कारण जगांत याच रत्ना प्रमाणं सर्व श्रेष्ठ वस्तु आहेत."

मी—"बुद्ध म्हणजे काय?"

भामा—"मी भगवान् गौतमांच्या धर्माची पंडिता थोडीच आहें, तर तुम्हाला त्याच्या बद्दल पूर्ण माहिती देऊं शकेन? दुसरी गोष्ट अशी कीं हें काम व हा समयहि असा नव्हे की मला ठाऊक असलेल्या गोष्टी मी तुम्हाला विस्तारानं सांगाव्यात. थोडक्यांत सांगायचं म्हणजे ज्याला बोधाचं—ज्ञानाचं-सत्याचं दर्शन झालं आहे तो बुद्ध. अर्थात् जो जीवनाच्या प्रगती बरोबरच आपलं ज्ञान, आपली दया, आपली

सहिष्णुता यांचा विकास करीत करीत पराकाष्ठा गांठतो, तो बुद्ध. प्राणी हा आपल्या प्रयत्नानं आणि फक्त आपल्याच प्रयत्नानं–कुणा इंद्राच्या, ब्रह्मयाच्या किंवा कामदेवाच्या कृपेनं वा मदतीनं नव्हे--आपल्या जीवनाचा विकास करीत करीत बुद्ध होतो. आजकाल शाक्यपुत्र गौतम हे असेच एक बुद्ध आहेत. असे बुद्ध पूर्वीहि होत असत व पुढेंहि होत राहतील. अशा बुद्धांचं पथप्रदर्शन प्रवासांत मदत करतं. बुद्ध श्रमण गौतम हे स्वतःला फक्त मार्गाख्यायी [ मार्ग दाखविणारा ] म्हणवतात, हाताला धरून मार्गावर घेऊन जाणारा नव्हे. ”

मी— “ आणि धर्म ? ”

भामा—“ बुद्ध आपल्या चिंतनानं आपल्या प्रयत्नानं जो मार्ग मिळवतात त्याला बोध म्हणतात. परंतु धर्माला शरण जाण्याच्या बाबतीत अंधश्रद्धा नसावी असं बुद्ध सांगतात. ”

मी—“ तुझ्या सांगण्याचं तात्पर्य असं की बुद्ध हे धर्म म्हणजे पैलतीरी जाण्यासाठीं उपयोगीं पडणारा तराफा मानतात; धर्म म्हणजे राखून ठेवायची वस्तु समजत नाहींत ते. ”

भामा—“ भाऊजी ! तर मग तुम्ही बुद्धाचा धर्म ऐकला आहे म्हणायचा. ”

मी—“ वहिनी ! एक दिवस संस्थागारांत चर्चा चालली होती त्या वेळी कुणी तरी हे सागितलं होतं. शिवाय मी असंहि ऐकलं की ते आपल्या धर्माचा स्वीकार इत्यादि गोष्टी माणसानं आपली बुद्धि व आपला अनुभव यांच्या अनुरोधानं ठरवाव्यात असं सांगतात. ”

भामा—“तर मग तुम्ही बुद्धाच्या धर्माविषयीं पुष्कळच ऐकलं आहे म्हणायचं.”

मी—“ बस्स, माझं ऐकलेलं भांडार संपलं. बरं, संघ म्हणजे काय ? ”

भामा—“बुद्ध व धर्म यांना मार्गाख्यायी व मार्ग मानून जे स्त्री-पुरुष भिक्षु-भिक्षुणी, उपासक-उपासिका यथाशक्ति त्याप्रमाणं वागण्याचा प्रयत्न करतात, ते सर्व म्हणजेच संघ. व्यक्तीला आपल्या निर्णयांना सत्यतेची कसोटी लावण्यासाठी एकापेक्षा जास्त बुद्धि व अनुभव यांची सहायता मिळाली, तर तिचं कामहि सोपं होतं व तिला खरा निर्णय उपलब्ध व्हायचा संभव वाढतो.”

मी—“ भामा, मला तर वाटत होतं–”

भामा—“ कीं तूं मनोरथची बायको आहेस, मोठी बाताडी आहेस. थोडी फार उत्साहीहि आहेस--काय हेंच ना म्हणायचं होतं भाऊजी तुम्हांला ? ”

मी—“ पण मला जें सांगायचं आहे, तें मला माझ्याच शब्दांत सांगू दे वहिनी ! ”

भामा--" मग मी असं काय पांडित्य दाखवलं आहे कीं ज्याच्यासाठीं तुम्ही येवढा कौतुकाचा पूल उभारायला निघालांत ते! या तर अशा गोष्टी आहेत कीं ज्या चार दिवसांची बुद्ध-श्राविका देखील समजूं शकते; मं तर दीड महिना उपदेश ऐकल्यें आहे."

मी--" मग वहिनी! तूं मला हें कधीं सांगितल नाहींस अन् कधीं इकडे बोलावलंहि नाहींस."

भामा--" नंगटांचा पंथ कोणत्याहि बुद्धिवंताला पटायचा नाहीं. फक्त कांहीं दिवस वाट पाहावी लागेल, असें मला वाटलंच होतं."

मी--" पण निगंठ पंथ अजूनहि मला थांबवतोच आहे कीं!"

भामा--" तुम्ही आलांत हेंच आश्चर्य आहे; भाऊजी! निगंठ आपल्या श्रावकांना अगर श्राविकांना दुसऱ्या कोणत्याहि धर्माचा उपदेश ऐकायला सक्त मनाई करतात असं ऐकलंय मी. असो. आतां आपण कूटागाराच्या जवळ आलों आहोत. आतां आपल्याला गप्पागोष्टी बंद केल्या पाहिजेत."

फाटकांतून आंत जातांना तेथली शांतता पाहून मी भामाला कानांत विचारलें-- "वहिनी! इथं श्रमण गौतम एकटेच राहातात?"

भामा--" नाहीं, त्याचे पांचशें भिक्षू [ संन्याशी ] अन् आतां तर शेकडों गृहस्थ शिष्य व शिष्यिणीहि आल्या असतील."

मी--" पण शब्दहि ऐकूं येत नाही."

भामा--" बुद्धांना शांतता फार आवडते. त्यांचे शिष्यहि आपल्या बोलण्यानं दुसऱ्यांना त्रास देत नाहींत."

आतां आम्ही बुद्धांच्या दिव्य व सौम्य मूर्तीपुढें येऊन पोंचलों होतों. कूटागारांतली एका बाजूला त्यांची स्वतःची एक कुटी-गंधकुटी-होती. तिच्या पुढे मोठें अंगण होतें. आज पाऊस नव्हता; नाही तर पेंढ्यानें शाकारलेला मोठा मांडव असता इथें. तिथेंच गंधकुटी लगत एका आसनावर बुद्ध बसलेले होते. त्यांच्या पाठीमागें उजव्या बाजूला कावेच्या रंगाची काषाय वस्त्रें परिधान केलेले पुष्कळसे भिक्षू विनीत भावाने बसलेले होते, व डावीकडे कित्येक काषाय-वसना भिक्षुणी बसल्या होत्या. समोरच्या बाजूला गृहस्थ स्त्री-पुरुष अलग अलग बसले होते. प्रत्येकजण जवळून किंवा दुरून श्रमण गौतमांना वंदन करी व आपल्या जागी गपचूप जाऊन बसे. भामा आईच्या बरोबर जाऊन स्त्रियांत बसली. मला ही व्यवस्था फार आवडली. कारण मला गौतमांना कांहीं प्रश्न विचारावयाचे होते. म्हणून मी त्यांच्या जवळ गेलों, त्यांना पुन्हां वंदन केलें. नंतर एका बाजूला जमिनीवर बसून त्यांना म्हणालों-

" भन्ते गौतम! आम्ही बहुकृत्य बहुकरणीय आहों. लिच्छवि सेनापतींचं काम असंच असतं. कित्येक दिवसांपासून आपलं दर्शन घडाव व कांहीं प्रश्न विचारावेत म्हणून येण्याचा विचार करीत होतों परंतु अडचणींमुळं येतां आलं नाहीं."

बुद्ध--" तर मग तुम्ही लिच्छवि सेनापति सिंह आहांत. शत्रुपक्षाकडील घायाळांच्या बाबतीत तुम्ही जी उदारता-दया दाखवलीत ती मोठी प्रशंसनीय कामगिरी होती. आपल्या दयेचं क्षेत्र वाढवलं पाहिजे, व त्या क्षेत्रांत शत्रूलाहि सामील करून घेतलं तर अशा मानवांत देवभाव आला असं म्हणतों मी. "

मी--" भन्ते! पण हें थोडंसंच काम होतं. "

बुद्ध--" काम थोडं नव्हतं. अन् कामाचं महत्व त्याच्या थोडेफारपणावर अवलंबून नाहीं. तें हृदयाच्या लहानमोठेपणावर अवलंबून आहे. असो, मी तुमचे आणखीहि गुण ऐकले आहेत याच युद्धाच्या वेळी. तुम्ही बहुकृत्य बहुकरणीय आहांत हें मला ठाऊक आहे. ठीक आहे. तुम्हांला जो प्रश्न विचारायचा असेल तो विचारा. "

मी—" भन्ते! आपले विरोधी सगळीकडे सांगत फिरतात की श्रमण गौतम नास्तिक आहेत, आत्मा व परलोक मानीत नाहींत. जे लोक आपल्याविषयी असं म्हणतात ते खरं सांगतात का? का आपल्यावर खोटा आरोप करतात ते? "

बुद्ध--" होय सेनापति! त्यांचं म्हणणं खरं आहे, ते माझ्यावर खोटा आरोप करीत नाहींत. मी असा कोणताहि आत्मा मानीत नाहीं की जो दोन पळंभरहि एका ठिकाणीं असतो. मग एक सबंध जन्मभर एका ठिकाणीं राहणाऱ्या अगर एका शरीरांतून दुसऱ्या शरीरात जाणाऱ्या नित्य ध्रुव आत्म्याची तर गोष्टच कशाला? सेनापति! तुम्ही लहानपणीं मातीत खेळत होतांत त्यावेळी तुमचं जे स्वरूप होतं तेंच आतांहि आहे असं वाटतं तुम्हांला? "

सिंह—" भगवान! हे आपलं म्हणणं बरोबर आहे. आपल्या ज्ञानांत, रुचीत व प्रवृत्तींत, परिवर्तन होत आहे हें मला चागलं कळून येत होतं. नंतर तक्षशिलेला जातांना जो मी होतो, तो मी तक्षशिलेहून परत येतांना राहिलों नाहीं अशी मला शंका वाटली. दोन्ही परिस्थितींत मला फार बदल दिसला. इकडे तर नुसतं शरीराकडे लक्ष द्यायचं व लोक आत्मा-आत्मा अशी ओरड करतात म्हणून आपणहि आत्मा मानायचा असं मी करीत आलों. भगवान! जर अशा प्रकारचं परिवर्तन लक्षांत घेतां कोणताहि नित्य ध्रुव आत्मा मानतां येत नसेल तर मला तें अगदीं बरोबर वाटतं. "

बुद्ध—" ह्याच आत्मा न मानल्यामुळं माझे विरोधी मला नास्तिक म्हणतात. मी कुठलीहि वस्तु-जड-चेतन, देव-ब्राम्हण नित्य, ध्रुव मानीत नाहीं. जें आहे

ं उत्पन्न झालेलं आहे; जें उत्पन्न झालेलं आहे तें मरणारं, नष्ट होणारं आहे. नित्य, ध्रुव आत्म्याचा विचार म्हणजे केवळ भ्रमाला व लोभाला कारण होतो. जीवनाचं अस्तित्व मी नाकबूल करीत नाहीं. सेनापति! मात्र जीवन हें नदीच्या प्रवाहासारखं हर क्षणाला नवं होत असतं. जर नवं व्हायला त्याला वाव नसता तर आमचीं सारीं सुकर्मं, आमचे सारे सुविचार, आमचीं सारीं सुवचनं निष्फळ झालीं असतीं. कारण नित्य-ध्रुव जीवनावर त्यांचा कांहींच प्रभाव पडला नसता. माझ्या मते जीवन हें सदा नवीन होत असतं. ब्राम्हण, परिव्राजक, तसेच इतर तीर्थिक यांची जीवनाविषयीं जी दृष्टि असते तशी माझी दृष्टि नाहीं. म्हणून मला ते नास्तिक म्हणतात. परंतु सेनापति मी जीवनाचा इन्कार नाहीं करीत; जीवन हें अधिक उच्च स्वरूपांत विकासित होण्याचा संभव असतो याचाहि इन्कार नाहीं करीत मी. म्हणून माझ्या बाबतींत खरं सांगणारांनीं मला आस्तिकच म्हटलं पाहिजे. ”

मी—“ उलट मी तर म्हणेन कीं खऱ्या अर्थानं आपणच आस्तिक आहांत. कारण जीवन हे नित्य, ध्रुव आहे अशी समजूत करून घ्यायची व त्यांत कोणतीहि सुधारणा होऊं द्यायला वाव ठेवायचा नाही, असं जे करतात त्यांनीं जीवन मानलं काय अगर न मानलं काय, सारखंच.

बुद्ध--“ आत्म्याच्या नांवावर ज्या खोट्या समजुती व जी अकर्मण्यता फैलावते ती पाहूनच मी असं सांगतो कीं आत्म्याचा दृष्टिकोन, आत्म्यासंबंधींचा विचार हा खोटा आहे. जो नित्य समजुतीच्या मागं लागेल तो जीवनांत बदल घडवून आणायचा प्रयत्न कशाला करील? तो केवळ भाग्यवादी, अकर्मण्यतावादीच होऊं शकतो. ”

मी—“ भन्ते! आता मला कळलं ; भगवान यथार्थवादी आहेत, अयथार्थवादी नाहींत. शिवाय मी आपल्या विरोधी श्रमण ब्राम्हणांच्या तोंडून असंहि ऐकलं आहे कीं श्रमण गौतम अक्रियावादी आहेत. असं म्हणणारे लोक भगवानांच्या बाबतींत खरं सांगतात का भगवानांवर खोटे आरोप करतात बरं? ”

बुद्ध—“ सेनापति! एका अर्थी त्यांचं म्हणणं खरं आहे. कित्येक श्रमण ब्राम्हण निराहार राहून शरीर सुकवून प्राण द्यायचीहि तयारी करतात अन् यालाच ते क्रिया म्हणतात, अन् अशा क्रियेनं जुनी पापं नष्ट होऊन मनुष्य निष्पाप होतो असं ते म्हणतात. सेनापति! त्यांच्या या विचारांना मी मूढता हें नांव देतों. आत्मा हा शरीरापासून अलग आहे असं जर ते मानतात तर शरीर सुकवण्यानं आत्मा शुद्ध कसा होईल? जर तसं झालं असतं तर अंगावरचे कपडे धुतल्यानं शरीर धुतलं गेलं असतं. उपाशी मरण्यानं, नग्न राहण्यानं, शरीर कष्टवण्यानं जीवनाची शुद्धि होईल असं जे समजतात, त्यांचं हे मिथ्या ज्ञान आहे, निव्वळ बाल-धर्म आहे हा.

सेनापति ! मीहि वर्षानुवर्ष अत्यंत कडक तपश्चर्या–क्रिया–केली आहे. तिचा जीवनावर प्रभाव पडत नाही हे मी स्वतः पाहिलं आहे. आमचे विचार, आमचा मनावरील संयम, राग द्वेष-मोह हे कमी करायसाठीं यांचीं मूळ कारणें दूर करायचा प्रयत्न –यांचा प्रभाव मात्र जीवनावर पडतोच पडतो. सेनापति ! मी अक्रियावादी हा अशा प्रकारचा आहे. श्रमण–ब्राम्हण जिला क्रिया म्हणतात, तिलाच मी अक्रिया म्हणतों. परंतु त्या बरोबरच मी क्रियावादीहि आहे. कारण मी सुकर्म, सुवचन, सुविचार मानतों. त्यांच्यामुळं जीवन उच्च होतं हें मी मानतों. "

मी—" भन्ते ! भगवानांचा हा अक्रियावाद फारच सुंदर आहे. उन्नति करणारा आहे भगवानांचा अक्रियावाद. मीहि त्या श्रमण-ब्राम्हणांच्या क्रियावादाला मूढ-धर्म बाल-धर्म मानतो. "

बुद्ध––" सेनापति ! मी तरी हेंच म्हणतों. "

मी––" भन्ते ! श्रमण गौतम तप-तेजहीन आहेत असं भगवानांचे विरोधी म्हणतात. हें त्यांचं म्हणणं बरोबर आहे का ? "

बुद्ध—" सेनापति ! ते तप-तेज कशाला म्हणतात ते मला ठाऊक नाहीं. तप म्हणजे शरीराकडे लक्ष न देणं, शरीरालाच सर्वस्व मानून त्याच्याच सेवेंत रत न होणं, असा जर त्यांचा अभिप्राय असेल तर मला हें मान्य आहे. सेनापति ! दोन्ही प्रकारची अंतिम टोकं गाठणं हे वाईट आहे असं मी समजतों. माणसानं केवळ शरीरच सर्वस्व मानून त्याच्याच तैनातीत सर्वस्वी दंग होऊं नये. त्याचबरोबर त्यानं शरीर सुकवून ते अकर्मण्य करून ठेवायच्या नादीहि लागूं नये. मी ही दोन्ही अंतिम टोकं सोडून मध्य-मार्गानं जावं असं सांगत असतों. म्हणूनच श्रमण गौतम तप–तेज–हीन आहे असं ते म्हणतात. "

मी—' भन्ते ! भगवानाचा मध्यमार्ग धन्य आहे ! भन्ते ! भगवानांचा मध्यमार्ग कल्याणकारी आहे ! भन्ते ! मी निगंठ ज्ञातृपुत्र यांना विचारलं होतं––"

बुद्ध––" सेनापति ! जाऊं द्या तें ! निगंठ ज्ञातृपुत्र माझ्या विषयीं तुमच्या जवळ काय बोलत होते ते ऐकून आपल्याला कांहीच लाभ नाही. सेनापति ! तुम्हांला आणखी कांही विचारायचं असेल तर विचारा. "

बुद्धाचा हृदयावर ठसणारा बुद्धिगम्य उपदेश ऐकून मी पूर्णपणें प्रभावित झालों. पण जेव्हां आपल्या विरोधकांनीं केलेली निंदा ऐकण्याच्या बाबतींत त्यांनीं अशा प्रकारें अनिच्छा प्रगट केली, तेव्हां तर बुद्ध म्हणजे खरोखरच अनुपम पुरुष आहेत, द्विपदोत्तम आहेत, हें मला कळून चुकलें.

मी संतुष्ट होऊन म्हणालों—

" भन्ते ! मी भगवानां विषयीं जे ऐकलं त्यापेक्षां कितीतरी श्रेष्ठ आपण आहांत हें मला प्रत्यक्ष दिसलं. मी बुद्ध-धर्म संघाला शरण आलों आहे. भन्ते ! भगवानांनीं आजपासूनच मला आपला श्रावक (अनुयायी) मानावं अशी माझी प्रार्थना आहे. अन् उद्यां माझ्याकडील दोन प्रहरच्या भोजनाचा आपण संघासह येऊन स्वीकार करावा. "

भगवानांनीं मौन धरून माझी प्रार्थना स्वीकारली. त्यावेळीं भगवानांचें वय साठ वर्षाच्या व्रर होतें. पण त्या वयांतहि त्यांच्या मुखावर देदिप्यमान तेज पसरलें आहे असें वाटत होते. त्यांच्या नीलवर्ण डोळ्यांतून मैत्री व करुणा ओसंडून चोहोंकडे पसरत आहे असा भास होत होता. मी भगवानांच्या चरणीं वंदन केलें व फाटकांतून बाहेर पडलों. इतक्यात, रोहिणी, भामा, आई, काकी याहि तेथें येऊन पोंचल्या. आई आनंदित होऊन म्हणाली––

" पाहिलंस बाळ ! आमचे भगवान कसा अर्थ-संगत, बुद्धि-संगत. अशा सुंदर धर्माचा उपदेश करतात तें. "

मी––' होय, आई ! मी संस्थागारांत कित्येक वेळा भगवानांची प्रशंसा केलेली ऐकली होती. मी ज्या ज्या वेळीं इकडे येण्याची इच्छा प्रगट केली, त्या त्या वेळीं निगंठ ज्ञातृपुत्रांनी मला मना केलं. आज मी त्यांचं म्हणणं मानलंच नाहीं. मी बहुतांशी जाति-गौरवाच्या विचारानंच निगंठ ज्ञातृपुत्रांच्या धर्माचा स्वीकार केला होता. "

भामा––" सेनापति ! मग आपण सर्वजण पुन्हा बुद्धांच्या धर्म-मार्गावर एकत्रित झालों तर. "

मी––" होय वहिनी ! अन् उद्या भगवान व भिक्षु-संघ आमच्या घरीं भोजन करणार आहे. त्याची व्यवस्था करावी लागेल. "

आई––" बाळ ! त्याची काळजी करूं नको. "

दुसऱ्या दिवशी आम्ही गो-घातक व शूकर-घातक यांच्या घरचें तयार मांस मागवले व भोजन तयार झाल्यावर भगवानांना सूचना दिली. संघासह भगवान जेवत होते त्यावेळी निगंठ लोक ( जैन साधू ) वैशालीच्या चौकां चौकांतून दोन्ही हात वर करून ओरडत होते–– ' सेनापति सिंह अधर्मी आहे ! सेनापति सिंह पापी आहे ! त्यानं श्रमण गौतमाकरतां गाई मारल्या ! डुकरें मारलीं ! कुठं आहे श्रमण गौतमांचं श्रामण्य ( संन्यास ) ? कुठं आहे श्रमण गौतमाचा धर्म ? जो आपल्यासाठीं खास मारवलेल्या पशूंचं मांस खातो आहे त्याला काय धार्मिक म्हणायचं ! " निगंठांचे हें बोलणें साफ खोटे होतें. मी पशू मारवलेहि नव्हते वा मारलेहि नव्हते व तसलें मांसहि

भगवानांना दिलें नव्हतें. पण मी त्यांच्यांतून निघून गेलों म्हणून त्यांना वाइट वाटत होते, म्हणूनच ते बाल-मूढांप्रमाणें ओरडत सुटले होते.

भगवान बुद्धांच्या धर्म मार्गानें मला आत्मतंत्रता सोडून परतंत्र नाही केलें. उलट स्वतःच्या शक्ती पुरेतेपणीं विकसित करायला मला मदतच केली.

## ( २३ )

# कपिल प्रभृतींचें प्रस्थान

वर्षाऋतु संपत आला होता. त्याच्या बरोबरच माझे गांधार मित्र कपिल, शंतनु, इत्यादिकांच्या सहवासाचा वियोग होणार या विचारानें माझें हृदय व्यथित होत होतें. मी आतां सेनापतीच्या घरांत राहूं लागलो होतो व माझ्या मित्रांचाही वेळ बहुतेक माझ्याच घरी जाई. मी निगंठांच्या फंदांतून सुटलो असल्यामुळे आता मला मित्राच्या सर्व गोष्टींत भाग घेतां येऊं लागला, मासाहार मद्यपान आणि नृत्य या गोष्टींत मी भाग घेऊं लागलों. आणि भामाचा मधुर विनोद आमच्या मनाला उल्हास आणायच्या कामीं चांगलीच मदत करी. एक दिवस मगध सेनापतींच्या गोष्टी निघाल्या होत्या त्यावेळीं मी म्हणालों—

" तो मोठा धाडसी सैनिक होता. बहुतेक सेना कापली गेली होती तरीहि तो आपल्या हत्तीवर बसून तसाच लढत राहिला होता. "

कपिल—" मित्र सिंह ! यावेळीहि तुम्ही पुन्हां सिधु तटावरील गोष्टीची पुनरावृत्ति केलीतच. "

मी—" मित्रा ! ती केवळ पुनरावृत्ति होती असं नाहीं म्हणतां येत. मी केवळ लढण्याची भूक शांत करण्यासाठीं नव्हती तिथं उडी घेतली. त्या हत्तीचं वैशिष्ट्य पाहून मला वाटलं कीं कदाचित् तो कुमार अजातशत्रु असेल; अन् मी त्याला जिवंत पकडून आणणार होतों "

कपिल—" पण तिथं शत्रुसैन्यहि पुष्कळ होतं ना ? "

मी--" आणि आमचे सैनिकहि पुष्कळ होते ना ? "

कपिल—" पण आपल्या उपसेनापतींनीं अशी मध्येंच उडी घेतली आहे हें त्यांना ठाऊक नव्हतं. "

मी—" कधीं कधीं असं साहस करावंच लागत. हं काय बरं! दोन वेळां सेनापतीनं माझा वार चुकवला व वार केलाहि. पण तिसऱ्या वाराला बिचारा वांचला नाहीं. मित्रा! मला आश्चर्य वाटतं तें त्या लिच्छवि तरुणाचं. त्यानं अत्यंत चपळतेनं उडी मारून माहुत व हत्ती या दोघांनाहि काबूंत आणलं व त्याना आपल्या छावणींत यायला भाग पाडलं. त्या तरुणाचं एका शब्दानंहि मी अभिनंदन केलं नाहीं व तो नाहींसा झाला. ही एकच गोष्ट या साऱ्या युद्धांत माझ्या मनाला अतिशय लागली आहे."

भामा—"भाऊजी! तुम्ही त्याला ओळखलं नाही?"

मी—" मला त्याची चेहरेपट्टी कांहीं आठवत नाहीं. बहुतेक त्याच्या ओंठांवर बारीकशा मिशा होत्या; पण खरं म्हणजे त्याचा चेहरा मला नीट दिसलाच नाही. शिरस्त्राण, कवच, खड्ग हीं तर सर्वांचीं सारखीच असतात. होय, पण एक गोष्ट आठवते, अंकुशाच्या ओढाताणींत त्याच्या हाताला जखम झाली होती, रक्त वाहतांना मी पाहिलं होतं."

भामा—" हाताला जखम झाली होती; तर मग भाऊजी, प्रयत्नान्ती तो सांपडेलसं वाटतं."

मी—" नाहीं वहिनी! तो पुन्हां मगध सेनेचा पाठलाग करायला गेला असावा. तो जिवंत परत आला असता तर मला जरूर भेटला असता. मला बोलायची संधि मिळाली नाहीं पण त्याच्या वीरतेचा प्रभाव माझ्यावर किती पडला हें माझ्या चेहऱ्यावरून त्याला कळलं असतं.

भामा—" पण भाऊजी—का सेनापति म्हणूं?"

मी—" वहिनी, तुझं ' भाऊजी ' हें संबोधनच गोड लागतं."

भामा—" बरं तर भाऊजी! कित्येक असे वीर असतात कीं ज्यांना बक्षिसाची आशा न धरतां आपली कर्तबगारी गुप्त राखणंच आवडतं."

मी—" होय वहिनी! असेहि वीर असतात. पण मला मात्र या वीराबद्दल नेहमीं वाईट वाटत राहील."

भामा—" भाऊजी! तर मग शोध करीत नका बसूं. हाताला जखम असणारे थोडेच असतील. बहुतेक सांपडेल तो."

मी—" तर काय सगळ्या योद्ध्यांना मी पुन्हा एकत्र करूं? लोकांना किती त्रास होईल वहिनी?"

भामा—" हो त्रास होईल हें खरंच. बारीक बारीक मिशा तर तुम्हांला आठवताहेत ना भाऊजी?"

मी--" कदाचित् तो भ्रमहि असेल. त्या तरुणाची चेहरेपट्टी मला अगदीं ओझरती दिसली होती, त्यामुळं तिची आठवण माझ्या मनांत पुसटतीच आहे असं दिसतं."

भामा--" मी त्या तरुणाला शोधून काढायचा प्रयत्न केला अन् तो मला सांपडला तर ?"

मी—" तर वहिनी ! मी तुझा फारच उतराई होईन."

भामा--" तुम्ही माझे किती उतराई झालां आहांत हें आम्ही पाहिलंच आहे. आम्ही किती मेहनतीनं तीर-तलवार चालवायला शिकलों होतो. तुम्हांला हात जोडून सांगून सांगून थकलों; पण तुम्ही आम्हांला संधी दिली नाहींत. लिच्छवींच्या रांगेत उभ्या राहायला लिच्छवियानी योग्य नाहीत असं तुम्हांला वाटलं."

मी--" पण जें काम तुम्ही हातीं घेतलं होतं तेंहि कमी धोक्याचं नव्हतं; मी रोहिणीच्या हाताला भाल्याची जखम झालेली पाहिली होती."

भामा—" भाल्याची जखम ?"

मी--" होय, मग तू असं कसं म्हणतेस की आम्हांला तशी संधी मिळाली नाहीं म्हणून ?"

भामा--" भाला वा तलवार यांची जखम होणं व तीं हत्यारं चालवणं या दोन गोष्टी एकच नव्हेत भाऊजी !'

मी—" होय, तें मला कबूल आहे. पण तुमची जितकी संख्या होती तिच्या मानानं दुसरीं कामंहि इतकी खूप होती कीं तुम्हांला लढण्याचं काम सांगण मला योग्य वाटलं नाहीं."

भामा--" पण जें तुह्मी तुमच्या खुषीनं दिलं नाहींत, तें आम्ही आमच्या खुषीनं घेतलं."

मी आश्चर्यानें ह्मटलें—" तुह्मी काय युद्धांत तलवार चालवली ? अन् आपल्या सेनापतीच्या आज्ञेशिवाय ?"

भामा--" आज्ञेशिवायहि करूं शकतों, व आज्ञा घेऊनहि करूं शकतों."

मी--" म्हणजे कसं ?"

भामा—" लढाई चालू असतां बाणांच्या वर्षावांत घुसून जखमींना बाहेर नेणं हें तर आज्ञेविरुद्ध नव्हतं ना ?"

मी--" नाहीं."

भामा--" त्यावेळीं काम करणाऱ्यांच्या रक्षणाकरतां आमच्या शस्त्रधारी दलांच्या दिमतीला राहणं हें तर आज्ञेच्या विरुद्ध नव्हतं ?"

मी—" नाहीं."

भामा--" आणि अशा प्रसंगीं एखादा संकटांत पडलेला पाहिला तर त्याच्या करतां तलवार चालवणं हें आज्ञेविरुद्ध तर नव्हतं ? "

मी—" नव्हतं. वहिनी ! तर मग तुम्ही तलवारहि चालवलीत वाटतं ? "

भामा--" भाऊजी ! ते राहूं द्या. आतां मला एवढंच पाहिजे आहे कीं कोणत्या मर्यादेनंतर आज्ञाभंग होतो. अन् त्या प्रसंगीं लिच्छवियानींचे प्राण वांचवायसाठीं नव्हे तर एका लिच्छवीचे प्राण वांचवायसाठीं आह्मांला तलवार चालवावी लागली असती तर तें आज्ञेविरुद्ध होतं कीं नाहीं ? "

मी--" वहिनी ! तर मग नालागिरी हत्तीला पकडणाऱ्या त्या तरुणाला तूं ओळखतेस होय ? "

भामा---" भाऊजी ! प्रथम माझ्या प्रश्नाचं उत्तर द्या. त्यावेळीं एका लिच्छवीचा प्राण वांचवायसाठीं आम्हांला तरवार चालवावी लागली असती तर आज्ञेविरुद्ध होतं कीं नाहीं ? "

मी--" पण तुम्हीं इतकी दूरची मजल गांठावी असं आमचं मत नव्हतं. "

भामा--" सेनापति ! मी आज्ञेबद्दल विचारते आहे. "

मी—" पण हें आमच्या मता विरुद्ध आज्ञा घेणं होत आहे. "

भामा—" पण आज्ञाभंग तर नाही होत हा? "

मी—" एका अर्थी आज्ञा भंग नाहीं, व एका अर्थी आहेहि. "

भामा—" मला तुमच्या उत्तराचा पूर्वार्धच हवा आहे सेनापति ! "

मी—" वहिनी ! तर मग तुम्ही तलवार चालवलीत ? "

भामा--" चालवली तर ! पण भाऊजी ! तुम्ही जेवढे अपराधी आहांत तेवढ्या कांहीं आम्ही अपराधी नाहीं. "

मी--" तें कसं ? "

भामा--" तुम्ही उपसेनापति होतां ना ? "

मी—" होय. "

भामा--" साऱ्या युद्ध क्षेत्राचं संचालन करायचा भार तुमच्यावर होता ना ?"

मी--" होय. "

भामा—" तुम्ही मगध-सेनापतीवर एकाएकी हल्ला केलांत त्यावेळीं आपल्या गैर हजेरींत युद्ध संचालनांत किती अडथळे येतील याचा तुम्ही विचार केला होता ? उलट मी तर ह्मणेन कीं त्यामुळं विजयाचं पराजयांत परिवर्तन होण्याची भीति जास्त होती. "

मी—" होय. ही माझी चूक मी कबूल करतों. "

भामा--" अशी चूक करणाऱ्या आपल्या सेनापतीच्या रक्षणा करतां जर लिच्छवियानींनीं प्रयत्न केला तर त्याला आज्ञाभंग नाहीं ना म्हणतां येणार भाऊजी ? "

मी—" आज्ञाभंगाबद्दल माझं मत सोडून दे. पण वहिनी ! खरोखरच तुम्ही असं साहस केलंत ? "

भामा—" आमच्या जवळ साहस होतं अन् आम्ही तें केलं होतं. "

मी--" मी मगध सेनापतीच्या हत्तीवर तुटून पडलों त्या वेळीं केलंत ? "

भामा—" होय, त्यावेळीं केलं आणखी दुसऱ्या वेळींहि. "

मी--" त्यावेळीं आणि दुसऱ्या वेळींहि ? "

भामा--" तुम्ही किती तरी वेळां शरीररक्षकाशिवायच युद्ध क्षेत्रांत घुसत होतां कीं नाहीं ? "

मी--" कदाचितच. मी कधीं एकटा होतों असं वाटत नाहीं. "

भामा--" शिबिरांतून निघायच्या वेळींहि ? "

मी--" शिबिरांतून निघतांना पुष्कळ वेळा एकटा असे. "

भामा--" अशा वेळीं लिच्छवियानीनी आपल्या युद्ध-संचालक उपसेनापतीच्या शरीर संरक्षणाचा भार आपल्यावर घेतला तर मला वाटतं याला तुम्ही आज्ञा-भंग म्हणणार नाहीं. "

मी—" वहिनी ! तूं लिच्छवि गण-संस्थेची सदस्य असायला पाहिजे होतीस असं मला वाटतं. "

भामा—" माझ्या वाग्मितेला माझ्या बुद्धीला पुरेसा वाव मिळत नाहीं असं मलाहि वाटतं. पण उदीचीच्या तक्षशिला इत्यादि गणांतूनहि स्त्रियांना जिथं हा अधिकार नाहीं तिथं वैशालीला त्या बाबतीत आशा कुठली ? पण माझ्या प्रश्नाचं तर उत्तर मिळालंच नाही. "

मी—" दिलं तर खरं: तुझं म्हणणं खरं आहे, झालं आतां ? बरं आतां सांग, नालागिरीला पकडायच्या वेळी लिच्छविसेनेंत तुमच्यांतल्या कितीजणी होत्या ? "

भामा—" तींत बहुतेक आम्हीच होतों. लिच्छवि योद्धे थोडेच राहिले होते. "

मी—" वहिनी ! आतां पर्यंत तूं मला कां सागितलं नाहींस ? "

भामा—" लिच्छवि-तरुणाच्या वीरतेचा पुरस्कार करतां न आल्यामुळं तुम्ही इतके उद्विग्न झालेले दिसलां नसतां तर आतांहि सांगितलं नसतं. "

मी—" मग तिथं कोण कोण होतां ? "

भामा—" आमची एक सबंध तुकडी होती. पण तींतल्या सगळ्या लिच्छवियानी भरपूर उंचीच्या होत्या. तिथं होत्या क्षेमा, भामा, रोहिणी. ......"

मी—" क्षेमा ! " जवळ बसून गालांतल्या गालांत हंसत असलेल्या क्षेमाच्या मस्तकावर हात ठेवून मी म्हणालों " आमची जनपदकल्याणी तूं पण होतीस ? '

क्षेमा—"जनपदकल्याणी राहिली नसती तर कांहीं बिघडलं नसतं सिंहभय्या ! सेनापती गेल्यानं काय झालं असतं याचा तुम्हींच विचार करा. "

भामा—" ज्यानं नालागिरीला पकडलं तो तरुण कोण होता सांगूं ? "

मी—" सांग ना. मी तर केव्हांचा विचारतों आहे. "

भामा—" तुमची पत्नी गांधारी होती ती. "

मी—" रोहिणी ! "

भामा—" होय, रोहिणी यावेळी स्वयंपाक घरांत गेली आहे, ती आल्यावर तिला तिच्या वीरतेचं पारितोषिक मिळालं पाहिजे. "

मी—" पारितोषिक ? "

भामा—" होय, पारितोषिक. भाऊजी ! तुम्ही जे देणार होतां तें. "

मी—" तिला बक्षिस देण्यासारखं माझ्याजवळ आहे काय ? "

भामा—" तुम्ही स्वतःला इतके दरिद्री समजतां ? बर तर मी सांगते-चुंबन, आलिंगन; खास या वीरतेची आठवण देऊन हं. अन् भाऊजी ! हत्तीच्या बरोबर जे स्वार छावणींत आले त्यांत भामा व क्षेमाहि होत्या. "

मी—" छावणीत ? "

भामा—" इतकंच नाही तर रात्रीं जे स्वार तुमच्या बरोबर उल्काचेलला आले त्यांतहि या तिघी होत्या. "

मी—" सेनापति सुमनांच्या मृत्यूच्या दिवशीं ? "

भामा—" होय, पण अंकुशाच्या हिसकाहिसकींत झालेली जखम रोहिणीच्या हाताला आहे कीं नाही तें पाहून घ्या हं अन् मग तिला पारितोषिक द्या. "

मी—" आहे तर , ती मी आधींच पाहिली आहे. "

भामा—" भाऊजी, मलाहि कांही बक्षिस मिळेल का ? "

मी—" हो, मिळेल तर. पण वहिनी ! तें तूंच सांगायला हवंस. "

भामा—" माझ्या मनोरथाला आपल्या जवळ ठेवा. म्हणजे मी व रोहिणी निरंतर जवळ जवळ राहूं. "

मी—" ही तर माझ्या हातांतली गोष्ट आहे वहिनी ! मी मनोरथला आपल्या जवळ ठेवीन. पण ही तर माझ्या स्वार्थाचीहि गोष्ट झाली. "

भामा—" चला, तुमच्या स्वार्थात आम्हां दोघींचाहि स्वार्थ होईल. अन् धाकटी बहिण क्षेमा ! तिचं बक्षिस ? "

मी—" वहिनी, तूंच सांग. "

भामा—" ती तुमची दुसरी वहिनी होईल."

मी—" दुसरी वहिनी म्हणजे ?"

भामा—" भाऊजी, घाबरूं नका. मी मनोरथांना सवत आणण्याचा अधिकार नाहीं देणार."

मी—" हे तर मलाहि ठाऊक आहे."

भामा—" समजत होतं म्हणूनच वाटतं डोळ्यांतल्या बाहुल्या येवढ्या मोठ्या केल्या होत्यात त्या ?"

मी—" मग वहिनी ?"

भामा—" पहा, शोधा, तुमचा आणखी कोण मोठा भाऊ आहे ?"

मी—" कपिल ! वहिनी, हें नुसतं पारितोषिकच नाही; तर माझ्या अत्यंत आनंदाची गोष्ट आहे." असे म्हणून मी क्षेमाच्या कपाळाचे चुंबन घेतलें.

भामा—" पारितोषिक ही तर आनंदाचीच गोष्ट असते भाऊजी !"

## समाप्त